


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

## हजार वर्षांनंतरहि हा प्रकाश दिसेल

ज्या तेजाच्या प्रकाशांत आपला देश इतकीं वर्षे उजळून निघाला, तें तेज आपल्या त्या प्रकाशानें आणखी किती तरी वर्षें आपला हा देश उजळवीत राहील ! हजार वर्षांनंतरहि हा प्रकाश आपल्या देशावर फांकत असलेला दिसेल, सगळें जग त्या प्रकाशाचें दर्शन घेईल आणि त्या प्रकाशाच्या दर्शनानें असंख्य हृदयांना धीर वाटेल. कारण, तें तेज केवळ तात्कालिक वर्तमान-काळाचें प्रतीक नसून जिवंत आणि शाश्वत अशा सत्याचें प्रतीक होतें. त्याच तेजानें आमची सन्मार्गाची स्मृति बुजूं दिली नाहीं, आम्हाला चुकीच्या मार्गापासून परावृत्त केलें आणि आमचा हा प्राचीन देश स्वातंत्र्याप्रत नेला.

पं० जवाहरलाल नेहरू

अनुक्रमणिका








# मासिकाचें ध्येय व धोरण

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल, अशा प्रकारें महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणें, हें या मासिकाचें ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनीं स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठीं जें आपलें सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेलें असेल, उच्च वातावरणांतील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेनें संगृहीत केलेला असेल, त्याचें दिग्दर्शन हेंच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊं शकतें, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकांत येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाच प्रचार करण्याचा हेतु नाहीं.

संचालक व संपादक-मंडळांतील सर्व व्यक्ती यांचेंही सर्व विषयांत मतैक्य आहे, असें नाहीं मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यासंबंधी सदृश अशा दृष्टिकोनानेंच त्यांना एकत्र आणलें आहे. तथापि प्रत्येकाचें व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेंच त्यांचें सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ति आपल्या नांवानें प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकांत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणांत सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

---

**वार्षिक रु. ९** **सहामाही रु. ५** **अंकास रु. १**

मुद्रक व प्रकाशक **चिं. य. मराठे** यांनीं हें मासिक **विश्वास छापखाना**, २९१ शनिवार **पुणें** २, येथें छापिलें आणि **नवभारत कचेरी**, २१९ शिवाजीनगर, **पुणें** ५ येथें सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्त मंडळाकरितां प्रसिद्ध केलें.








सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्त मंडळाचे मासिक

# नवभारत



वर्ष पहिलें, अंक सहावा                    मार्च १९४८

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादकमंडळ

आचार्य शं. द. जावडेकर | आचार्य स. ज. भागवत
श्री. हरि कृष्ण मोहनी | प्रो. वि. म. वेडेकर (कार्य. संपादक)

व्यवस्थापक : श्री. चिं. य. मराठे



मुखपृष्ठावरील महात्माजींचें चित्र **श्री. पी. जे. खाडिलकर, पुणें** यांनीं तयार केलेल्या नख-चित्राच्या छायाचित्राचा ठसा आहे. आंतील चित्र **श्री. जे. डी. गोंधळेकर, पुणें** यांनीं मुद्दाम तयार केलेल्या वुड्कट्चा ठसा आहे.










# नवभारत, मार्च १९४८

## या अंकातील लेखक

**राजकवि यशवन्त** ( पुणें )—सुप्रसिद्ध कवि, ' यशोधन ', ' बंदिशाला ' इत्यादि काव्य-संग्रहांचे लेखक.

**प्रा. वा. दा. गोखले** एम्. ए. ( पुणें. )—ना. दा. ठाकरसी कॉलेजमध्यें संस्कृतचे प्राध्यापक, ' स्वराज्यांतील गृहांगना ' व ' मराठी भाषा कशी शिकवावी ? ' या ग्रंथांचे लेखक.

**श्री. शंकरराव देव**—राष्ट्रसभेचे सरचिटणीस, 'उपनिषदांतील दहा गोष्टी' व 'भगवान् बुद्धासाठीं ' या ग्रंथाचे कर्ते. ' नवभारता'चे संचालक.

**श्री. ह. कृ. मोहनी** ( नागपूर )—' तेजस्वी शिक्षण ', ' आमचा सनातन धर्म ' इत्यादि ग्रंथांचे लेखक. ' नवभारता'चे एक संपादक.

**प्रा. नी. र. वऱ्हाडपांडे** एम्. ए. ( नागपूर )—' कूजन ' या काव्यसंग्रहाचे आणि 'सुखदुःख-विवेक' या ग्रंथांचे लेखक. हल्लीं ऑक्सफर्डला Educational Psychology चा अभ्यास करीत आहेत.

**श्री. य. रा. दाते** बी. ए. एल्. एल्. बी. ( पुणें )—प्रमुख संपादक, महाराष्ट्र शब्दकोश; संपादकीय कार्यव्यवस्थापक, महाराष्ट्रीय ज्ञानकोश.

**श्री जयंतीलाल आचार्य** ( अहमदाबाद )—अहमदाबादेंतील शेठ भोलाभाई जेशिंगभाई अध्ययन-संशोधन विद्याभवन—या संस्थेंत बंगालीचे सन्मान्य अध्यापक. रवीन्द्र साहित्याचे एक दीक्षावान् उपासक. श्री. क्षितिबाबूंच्या 'शिक्षणसाधना' इत्यादि पुस्तकांचे संपादक व संकलनकार.

**श्री. ना. ग. जोशी** एम्. ए. ( बडोदें. )— 'जीवनयोग' या काव्याचे व ' विश्वमानव ' काव्य आणि ' पैगंबराचा बगीचा ' या आगामी ग्रंथांचे कर्ते.

**प्रा. वसंत परांजपे** एम्. ए. ( पुणें )—बृहन्महाराष्ट्र कामर्स कॉलेजमध्यें अर्थशास्त्राचे प्राध्यापक.

**प्रा. म. अ. मेहेंदळे** एम्. ए. ( नवसारी )—एस्. बी. गर्दा कॉलेजमध्यें संस्कृतचे प्राध्यापक यांचा "Asokan Inscriptions" यांवरील प्रबंध मुंबई विश्वविद्यालयातर्फे लवकरच प्रसिद्ध होईल.

**श्री. श्रीकृष्णदास जाजू** ( वर्धा )— याच अंकांतील यांच्यावरील परिचय-लेख पहा.

**प्रा. श्रीकृष्ण के. क्षीरसागर** ( पुणें )— महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटीच्या कॉलेजमध्यें मराठीचे प्राध्यापक. ' व्यक्ति आणि वाङ्मय ' ' सुवर्णतुला ' ' राक्षस–विवाह ' इत्यादि ग्रंथांचे कर्ते.

**श्री. वसंत बापट** ( पुणें )— समाजवादी कार्यकर्ते व कवि.

**म. म. द. वा. पोतदार** ( पुणें )— सुप्रसिद्ध इतिहाससंशोधक आणि शिक्षणशास्त्रज्ञ. यांचा लेखसंग्रह " दत्तो वामन पोतदार वाङ्मयदर्शन " या नांवानें प्रसिद्ध आहे.

**श्री. र. ग. जोशी** ( पुणें ) — सुलभराष्ट्रीय ग्रंथमालेचे कार्यवाह, ' पद्मविहारी ' या नांवानें मधून मधून यांनीं काव्यलेखन केलें आहे. ' जीवनदर्शन ' याचे ( खलील जिब्रानच्या ग्रंथाच्या अनुवादाचे ) कर्ते.

**आचार्य शं. द. जावडेकर** ( इस्लामपूर )— सुप्रसिद्ध राज्यनीतिशास्त्रज्ञ—' आधुनिक भारत ' ' हिंदु–मुसलमान ऐक्य ' इत्यादि ग्रंथांचे लेखक आणि 'नवभारता'चे एक संपादक.

**आचार्य स. ज. भागवत** ( पुणें )— शिक्षणशास्त्रज्ञ ' जीवन आणि साहित्य ', ' जीवन-शिक्षण ' इत्यादि ग्रंथांचे लेखक, 'नवभारता'चे एक संपादक.

अनुक्रमणिका






# लोकमातांनो !

[ अस्थिविसर्जनाचे वेळीं ]

—जाति-मुद्रिका—

ह्या अस्थि चिताभस्म हें निरविल्यावरी
घेउनी लोकमातांनो, न्या मिरवित वीचीशिरीं
जे तपुनी गेले साधुसंत भारतीं
आलात आजवर त्यांची दिनरात गात आरती
ती अभंगवाणी, ओंवी ती, श्लोक ते
एकेक वोचि ही त्यांची संथाच नित्य घोकते
उपनिषदें गीता वेद आणि मंत्र ते
तुमाचिया स्वरूपांतूनी जागते आणि वाहते
त्या घेउनि आपोशना
त्या करुनि शिरीं मार्जना
त्यामध्यें करुनि मज्जना
जी पुण्यश्लोकावली इथें नांदली
त्याहुनी ठेव सांभाळा ही त्रिभुवन मोलागळी

२

ह्या अस्थि चिताभस्म हें निरविल्यावरी
घेउनी लोकमातांनो न्या मिरवित वीचीशिरीं
हें अहो-भाग्य मिरवितां आणि नाचुनी
जयघोष महात्म्याचा त्या ह्या उधळुनि कणिकांतुनी
व्रत आचरिलें जें काया-वाचा-मनें
झेलिला मृत्युही अन्तीं ज्या दिव्य व्रताकारणें
तें आकळलें अद्यापि कुठें भारता
अद्यापि जसाच्या तैसा तो रांजण गळका रिता
तो एक तयाचा खुनी
अवतार खुन्याचे जनीं
प्रगटले कसे हे क्षणीं !
तरि चिताभस्ममंडिता तुम्ही वाहुनी
ज्ञा पिकवित शिवसौंदर्या, दुर्मतिंना प्रक्षालुनी

ह्या अस्थि चिताभस्म हें निरविल्यावरी
घेउनी लोकमातांनो, त्या मिरवित वीचीशिरीं
जयघोषें सांगा भारतवासी जनां
हा सत्यव्रत अवतारा घे हरिश्चंद्र हो पुन्हा
स्वप्नांतहि दिधलें राज्य गाधिजा जरी
जागृतींत पूर्ता त्याची पाहिजे कराया तरी
जयघोषें सांगा भारतवासी जनां
हा मंत्रद्रष्टा घेई अवतार शिवी हो पुन्हा
आश्रयार्थ आल्य दीन कपोतास्तव
निज मांस अर्पिणें श्येना हा धर्म खरा वास्तव
जयघोषें सांगा आखिल जगांतिल जनां
हा विश्वकुटुंबी प्रेमी येशूच अवतरे पुन्हा
जे छळतीं घेती प्राण ठोकुनी खिळे
त्या दया क्षमा दावा हो! ते निमित्त भोळे खुळे!
वैराग्नि नको भडकणें.
जगतांतिल समरांगणें
व्हावींत रम्य उपवनें
फुलवुनी स्वप्न हें दुथडीं निज ऊर्मिनीं
ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः हा पाठ करा निशिदिनीं

पुणें
१२।२।४८ — यशवन्त

---

# श्लोकेनैकेन वक्ष्यामि चरित्रं तन्महात्मनः

श्लोकेनैकेन वक्ष्यामि चरित्रं तन्महात्मनः।
लोकसंहतिनिर्माणे येन स्वात्मा[1] समर्पितः।।
आदौ [2]दाक्षिणश्यामदेशगमनं सत्याग्रहालम्बनम्।
चंपारण्यपराक्रमोऽथ जनताराष्ट्रस्य धूर्धारणम्
आश्रित्यासहकारशस्त्रमसकृत् कारागृहे बन्धनम्
आङ्ग्लानामवकर्षणेन सहसा स्वातंत्र्यसंपादनम्।।

बा. दा. गोखले

---
१ सु + आत्मा. २ दक्षिण आफ्रिका.








# गांधीजी

श्री० शंकरराव देव

'गांधी वारले!' ही बातमी कानांवर पडली तेव्हां मनाला धक्काच बसला! 'गांधीजी' आणि 'वारले' हें कसें शक्य आहे? परंतु शेजारीं उभ्या असलेल्या सहकाऱ्यानें ते भयंकर शब्द पुनः उच्चारले तेव्हां हृदयाची कालवाकालव झाली. काय असेल तें असो, या खेपेस उपवासानंतर महात्माजींची प्रकृति झपाट्यानें सुधारली होती व अल्पावधींतच त्यांचे सर्व व्यवहार जवळजवळ पूर्ववत् सुरू झाले होते. उपोषण समाप्त झाल्यानंतर बिर्लाहाउसमध्यें जाऊन मी स्वतः इतर मंडळींबरोबर 'निर्वासितांना साहाय्य', 'कॉंग्रेसची घटना', 'वर्ध्याचें गांधीसेवा-संघाचें संमेलन' वगैरे विषयांसंबंधीं त्यांच्याशीं दीर्घ चर्चा केल्या होत्या. या सर्व प्रसंगीं गांधीजी उपवासाच्या दिव्यांतून नुकतेच पार पडले होते असें त्यांच्या शारीरिक, मानसिक व बौद्धिक चेष्टांवरुन कोणालाहि वाटणें शक्य नव्हतें. जेव्हां त्यांच्या मृत्यूची बातमी समजली, तत्पूर्वीं अर्धा तासच त्यांनीं तयार केलेल्या कॉंग्रेसघटनेच्या खर्ड्याबाबत त्यांचेकडे जाऊन विचारविनिमय करण्याबद्दल सहकाऱ्यांशीं बोलणें झालें होतें. आपण जाऊं तोंपर्यंत प्रार्थनेची वेळ होईल, तेव्हां उद्यां अगोदर वेळ ठरवून मगच त्यांचेकडे जाऊं, असें ठरलें होतें. त्यांच्याकडे जाण्याचें दुसऱ्या दिवसावर न टाकतां मनांत विचार आल्याप्रमाणें त्याच वेळीं आपण जर बिर्लाहाउसमध्यें गेलों असतों, तर प्रार्थनेच्या जागीं जातांना आपण त्यांच्याबरोबर बहुतेक असतों आणि तसें असतों तर कदाचित् ईश्वरानें त्या प्रसंगीं आपणास महात्माजींचे प्राण वांचविण्यासाठीं निमित्तहि केलें असतें हा विचार मनाला पुनः पुनः चटका देतो. पण— !

हृदयक्रिया बंद पडल्यामुळें महात्माजींना असा एकाएकीं व अनपेक्षित मृत्यु आला असला पाहिजे असें मीं जवळच्या माणसांना म्हटलें. इतक्यांत कोणीतरी धावऱ्या धावऱ्या धांवत येऊन म्हणाला, "प्रार्थनेच्या ठिकाणीं कोणीं मारेकऱ्यानें त्यांना गोळ्या घालून ठार मारलें." हे शब्द कानीं पडले तेव्हां प्रकृति तर हादरलीच, पण "न हन्यते हन्यमाने शरीरे" या गीतावचनाचा नादहि अंतःकरणांत उमटला. शरीर मारलें तरी आत्मा मरत नाहीं. महात्माजींच्या श्मशानयात्रेंत मी जवळजवळ पांच तास मागें चालत होतों, तेव्हां भगवंतांचें हें वचन मनांत सारखें घोळत होतें.

## सर्व जगाचा अन्तर्नाद ( Inner voice )

त्या रात्रीं लॉर्ड माउन्टबॅटनना कोणी तरी म्हटलें, "उद्यांचा दिवस सर्व हिंदुस्थान शोकदिन म्हणून मानील." तेव्हां ते म्हणाले, "उद्यां सर्व संसारच शोकदिन मानील." गांधीजींमध्यें असें काय होतें, कीं त्यामुळें सर्व विश्वानें त्यांच्याबद्दल शोक करावा? ज्या वस्तूबद्दल ममत्व वाटतें, आणि 'आपली' या भावनेमुळें जिच्यावर आपलें प्रेम जडतें, त्या वस्तूचा नाश, आपण तिला कायमचें मुकलों ही जाणीव, माणसाला शोकसागरांत बुडविते. गांधीजी गेले तेव्हां आपला प्रियजन गेला असें केवळ हिंदुस्थानच्या लोकांना वाटलें असें नव्हे, तर सर्व जगाला तसें वाटलें यांत मुळींच संशय नाहीं. गांधीजी हिंदु अथवा हिंदी पुरुष होते असें मानणें ही कोती अगर कृपण भावना आहे. ते विश्वपुरुष होते; विश्व आपलें आहे व आपण विश्वाचे आहों या जाणिवेनें त्यांचा सर्व व्यवहार चाले.








ते धर्मानें हिंदु, राष्ट्रीयत्वानें हिंदी व हिंदुस्थान त्यांची कर्मभूमि असली तरी त्यांना सर्व धर्म सारखे असल्यामुळें ते सर्वराष्ट्रीय होते व स्वधर्मानुसार भारत ही त्यांची कर्मभूमि असली तरी त्यांचें कर्म विश्वासाठीं होतें.

गांधीजींना 'राष्ट्र—पिता' असें सार्थ संबोधलें जातें. कारण आजचा हिंदुस्थान त्यांनींच निर्माण केला आहे. आम्ही आज जे व जसे आहों, तें सर्व त्यांचें देणें आहे. गांधींची दृष्टि सर्वोदयी व सर्वव्यापी होती. जीवनाच्या प्रत्येक अंगाबाबत त्यांचे विचार व आचार क्रांतिकारक होते. त्यांनीं भारताला एक नवीन व संपूर्ण जीवन दिलें. आमचें शरीर त्यांनीं आम्हांला दिलें नसलें तरी जीवन, जीवनधर्म तरी त्यांनीं आम्हांला दिला व आत्म्याशिवाय शरीर तसें धर्माशिवाय जीवन ही श्रद्धा त्यांनीं आमच्यांत निर्माण केली. म्हणूनच प्रत्यक्ष जन्म देणाऱ्या पित्याशीं पुत्र ज्या प्रेमानें व भक्तीनें वागतो, त्याच्यापेक्षांहि किती तरी पटींनीं अधिक भक्तीनें व प्रेमानें आम्ही तसेच व जगांतील आणखी असंख्य लोक त्यांच्याशीं प्रेमानें वागत. देह देणाऱ्या पित्यापेक्षां धर्म देणारा पिता श्रेष्ठ होय. धर्मानें देहाचें सार्थक होतें. लोक त्यांच्याकडे धर्मपिता (Spiritual Father) म्हणून पाहत व जेव्हां धर्माधर्माचें कोडें त्यांना पडे तेव्हां तें उकलण्यासाठीं ते नेहमीं त्यांच्याकडे जात.

" जयातें नीतिपंथें चालिजे। सत्यधूत बोलिजे।
देखावें ते देखिजे। शास्त्रदृष्टि ॥ "

या स्थितीला गांधीजी पोहोंचले आहेत, असें आम्ही प्रत्यक्षानुभवानें सांगूं शकतों. आपण जें कांहीं करीत आहों तें धर्म्य आहे, असा निर्णय किंवा कौल गांधीजींनीं दिला आहे हा विश्वास, लोकांना जगांतील कोणत्याहि शक्तीशीं सामना करण्यास समर्थ करीत असे. मी मी म्हणणारे बुद्धिवादी सुद्धां या नीतिदेवतेच्या गाभाऱ्यांत तिला कौल लावण्यांत स्वतःला धन्य मानीत आहेत हें पाहून आम्हां भक्तांचें मस्तक त्या देवतेपुढें भक्तीनें व प्रेमानें अधिकच नमत असे, हें कबूल करण्यास शरम वाटत नाहीं. थोडक्यांत सांगावयाचें तर गांधीजी म्हणजे सत्यासत्य, धर्म्याधर्म्य, शिवाशिव, ठरविण्याची अंतिम कसोटी होती. गांधीजी हिंदुस्थानचा अंतर्नाद (Inner Voice) होते. पण गांधीजींना हिंदुस्थानचा अंतर्नाद म्हणणें म्हणजे पुनः आमचें लघुत्व त्यांच्यावर लादण्याचा दोष पदरीं घ्यावा लागेल. गांधीजी हिंदुस्थानचाच काय पण सर्व जगाचा अन्तर्नाद होते, असें म्हणणेंच रास्त होईल. त्यांच्या जीवनज्योतीच्या प्रकाशांत आजचें जग नीतिपथावर पाऊल टाकीत होतें. ही ज्योत मावळल्यामुळें जग पुनः अंधकारांत पडलें आहे आणि म्हणूनच "सर्व जग उद्यां शोक करील" असें लॉर्ड माउंटबॅटन उद्गारले, तें सत्य होतें.

## लोकसेवाद्वारा जीवनसाधना

पण सर्व विश्वाची नीतिदेवता गांधीजी कां व कसे बनले ? महात्माजी एक महान् साधक होते व ईश्वरप्राप्ति हें त्यांच्या जीवनाचें एकमेव ध्येय होतें. ईश्वराच्या अस्तित्वावरील श्रद्धा हा त्यांच्या जीवनाचा प्राणवायु होता. मानव म्हणजे सर्वव्यापी अमर आत्मा, या ज्ञानाच्या साक्षात्कारासाठीं त्यांची अखंड साधना सुरू होती. आणि त्यांच्या साधनेचा विलक्षण विशेष हा कीं, सामान्य जीवनव्यवहारांतून कसलीहि निवृत्ति त्यांत नव्हती. जीवनाचे सर्व व्यवहार 'आत्मवत् सर्वभूतानि' या भावनेनें झाले म्हणजे ते चित्तशुद्धिद्वारा ईश्वरप्राप्तीला कारण होतात, या सिद्धान्तावर गांधीजींचा संपूर्ण विश्वास होता. असा व्यवहार होण्याच्या मार्गांतील मुख्य प्रत्यवाय म्हणजे 'मी म्हणजे शरीर' ही माणसाची दृढ भावना व तज्जन्य शरीरावरील आसक्ति हा होय. या आसक्तीच्या पोटींच भयक्रोध हीं करटीं कारटीं निर्माण होतात व तींच माणसांकडून असत्य व हिंसा करवितात. 'आत्मवत् सर्वभूतानि' असा व्यवहार हातून व्हावयाचा तर 'आपण हें शरीर नसून आत्मा आहों आणि आपण तसे सर्व' हें ज्ञान दृढ होत जाऊन शरीरावरील आसक्ति सुटली पाहिजे. अनासक्त पुरुषाला 'आत्मौपम्येन सर्वत्र' या भावनेनें पाहणें व वागणें शक्य आहे. राग, द्वेष हे शरीराचे धर्म आहेत व शरीरसुखासाठींच मनुष्य हिंसा करतो व असत्य बोलतो. 'मी शरीर नाहीं, आत्मा आहें,' ही भावना दृढ झाली व त्यामुळें शरीरावरची आसक्ति सुटली, कीं मनुष्य रागद्वेषरहित होतो व सर्व विश्वावर प्रेम करूं शकतो. ही







स्थिति प्राप्त झाली कीं, 'आत्मवत् सर्वभूतानि' असा त्याचा व्यवहार सुरू होतो. अशा व्यवहारांत द्वेष, हिंसा, असत्य यांना स्थान नसतें. म्हणून अनासक्ति ही नैतिक व आध्यात्मिक जीवनाची गुरुकिल्ली आहे. गांधीजींनीं आपल्या गीतार्थाला 'अनासक्तियोग' असें नांव दिलें होतें, तें सहेतुक होतें. अनासक्त माणसालाच 'अहिंसा, सत्य, अस्तेय ब्रह्मचर्य व असंग्रह' या पांच व्रतांची साधना करणें शक्य आहे. आपल्या जीवनांत हीं पांच व्रतें उत्तरोत्तर अधिकाधिक पाळण्याचा गांधीजींचा अहर्निश प्रयत्न होता हें सर्वश्रुतच आहे. त्याचप्रमाणें अनासक्त पुरुषालाच सेवाधर्माचें उत्कृष्ट पालन शक्य आहे. दक्षिण आफ्रिकेंत बोअर युद्धांत काम करीत असतांना, आपल्या हातून खरी सेवा व्हाव-याची तर ब्रह्मचर्याचें पालन केलें पाहिजे असा विचार गांधीजींना प्रथम सुचला, ही गोष्ट त्यांच्या आत्मचरित्राशीं परिचित असलेल्यांना माहीतच आहे.

गांधीजींचें जीवन सेवामय होतें हें सांगणें नकोच. सेवेच्या द्वारा सर्वांशीं समरस होऊन सर्वत्र समवस्तूचें दर्शन घेणें, ही त्यांची जीवनसाधना होती. या सेवेंतून कोणीहि व्यक्ति वा कोणताहि व्यवहार त्यांनीं वगळलेला नव्हता. सर्वांचीच सेवा खरी; परंतु अद्याप या जगांत दीनदुबळे व दारिद्री यांचीच संख्या फार मोठी आहे म्हणून ते आपल्या सेवेला 'दरिद्रीनारायणाची सेवा' असें यथायोग्य रीत्या म्हणत. मातेची माया सर्वच मुलांवर असते हें खरें, पण त्यांतल्या त्यांत जें सर्वांत लहान व अपंग, त्याच्यावर विशेष असते; ज्या मुलाची सर्वांत चाल कमी, त्याच्याच चालीनें आई चालते. जनसेवेच्या बाबतींत महात्माजींची नेमकी अशीच स्थिति होती. सामान्य लोकांची सेवा हाच त्यांनीं आपला मुख्य धर्म केला होता. समाजांतील बुद्धिमान्, कर्तृत्ववान् व धनवान् लोकांचीहि ते सेवा करीत; पण ती अशा रीतीनें व रूपानें कीं, त्यामुळें त्या लोकांची बुद्धि, कर्तृत्व व धन हीं समाजांतील दीन, दुबळ्या व दरिद्री लोकांच्या सेवेला, त्यांची स्थिति सुधारण्याकडे लागावीं. आपल्याबरोबर ते या लोकांनाहि समाजांतील सामान्य लोकांची सेवा करण्याला लावीत. पण ते स्वतः दरिद्री नारायणाचे उपासक होते. त्यांचा सर्व रचनात्मक कार्यक्रम या दृष्टीनें आंखलेला होता. ज्यांत सामान्य लोकांवरील अन्याय व त्यांची पिळवणूक थांबेल व समाजांतील सर्व लोकांना खरें स्वातंत्र्य व सुख मिळतील, असा समाज निर्माण करणें हा या कार्यक्रमाचा हेतु होता. पीडितांना तात्कालिक साहाय्य व्हावें, किंवा स्वातंत्र्यसंग्रामाची शक्ति निर्माण करावी, हा या कार्यक्रमामागील त्यांचा मुख्य हेतु नव्हता. त्यांचा रचनात्मक कार्यक्रम ही एक विशिष्ट 'जीवनपद्धति' होती व जो असें जीवन जगेल, तोच सर्वांशीं समरस होऊं शकेल व सर्वांवर प्रेम करून सत्याची प्राप्ति करून घेऊं शकेल, असें त्यांचें मत होतें.

## प्रेमाचे प्रेषित

समग्र लोकसेवेच्या द्वारा ईश्वरप्राप्ति हा जसा गांधींच्या जीवनांतील अलौकिक गुण होता, त्याचप्रमाणें सत्याचा आग्रह हा एक दुसरा असामान्य गुण त्यांच्यांत होता. जगांत सर्वच सज्जन असते तर जग स्वर्गच बनलें असतें. कोणी कोणाची सेवा करण्याचा प्रश्नच उत्पन्न झाला नसता. पण या अपूर्ण जगांत सज्जनांप्रमाणें दुर्जनहि आहेत, व त्यांची संख्याच अधिक आहे. व असें आहे म्हणूनच जगांत सेवाधर्माला स्थान वा अवकाश आहे. जगाची अशी स्थिति आहे तोंपर्यंत समग्र सेवकाला 'रातदिन आम्हां युद्धाचा प्रसंग' या तुकारामाच्या उक्तीप्रमाणें स्वतःशीं व इतरांशीं युद्ध करणें भाग आहे. आणि गांधीजींच्या सेवाक्षेत्रांतून तर ज्यांत अनृत व हिंसा ओतप्रोत भरलीं आहेत व जेथें सत्तेसाठीं सतत संग्राम सुरू आहे तें राजकारणहि सुटलेलें नव्हतें. गांधीजींचा सर्व जन्म जगांत जें जें म्हणून अशुभ वा दुष्कृत ( Evil ) आहे त्याच्याशीं लढण्यांत गेला. गांधीजी संत होते, मुत्सद्दी होते व वीरहि होते. जगांत या तीनहि वृत्ती एका पुरुषाच्या ठायीं क्वचित्च आढळतात. पण मौज अशी कीं या योद्धयानें तलवार कधींहि हातांत घेतली नाहीं. 'जो तलवार हातांत घेतो तो त्या तलवारीनेंच नाश पावतो', या तत्त्वावर त्यांचा विश्वास होता व तशी त्यांची वागणूकहि होती. हिंसेनें हिंसा वाढते म्हणून हिंसेचा मुकाबला अहिंसेनें केला पाहिजे अशी त्यांची जगाला शिकवणूक होती व स्वतः त्यांनींहि जन्मभर अहिं-

सेचीच आराधना केली. गांधीजी बलाचे उपासक होते, पण आत्मबलाचे. आत्मबल अजिंक्य आहे अशी त्यांची श्रद्धा होती. जो आत्मबलानें लढतो तो 'दुर्जन व त्याची दुर्जनता' यांच्यामध्यें भेद करतो. तो दुर्जनावर प्रेम करतो; परंतु त्याच्या दुर्जनतेला विरोध करून तिचा नाश करतो. दुष्टाच्या शरीराचा नाश म्हणजे त्यांच्या दुर्जनतेचा नाश नव्हे, असें तो मानतो. कारण दुर्जनता शरीरांत नसते तर खरो-खर हृदयवृत्तींत असते. आत्मक्लेशानें व जरूर तर स्वतःच्या शरीराची आहुति देऊनहि ही दुर्जनांची हृदयवृत्ति पालटण्याचा तो प्रयत्न करतो. हृदय पालटण्याच्या प्रक्रियेंत दुर्जनांवरील प्रेम ही एक मोठी शक्ति आहे. त्यांच्यावर बॉंब टाकणाऱ्या श्री. मदनलालांचें मतपरिवर्तन करण्याचा प्रयत्न मॅजि-स्ट्रेटनीं करावा असें गांधीजी सांगतांना मीं स्वतः ऐकिलें आहे. त्यांना संधि मिळाली असती तर श्री. गोडसे यांच्या बाबतींतहि त्यांनीं अशा प्रकारच्या प्रयत्नांचा पुरस्कार केला असता, यांत तिळमात्र संशय नाहीं. आपल्या मारेकऱ्याच्या मनांतहि सत्प्र-वृत्ति आहे व आत्मबलिदानानें ती जागृत होणें शक्य आहे असें मानण्याइतकी विशाल सद्भावना त्यांच्यामध्यें होती. मारेकऱ्याची गोळी हृदयांत घुसल्यानंतर ज्ञानसंवेदनाचे जेवढे क्षण त्यांना लाभले असतील, त्या क्षणांत "परमेश्वरा, आपण काय करीत आहों हें त्याला समजत नाहीं; तेव्हां त्याला क्षमा कर व त्याला सद्भावना दे," अशीच प्रार्थना गांधीजींनीं श्री० गोडसे यांच्याकरितां केली असली पाहिजे, यांत मला मुळींच संशय वाटत नाहीं. कारण ते प्रेमाचे प्रेषित होते व प्रेमानें जग जिंक-ण्याची त्यांची प्रतिज्ञा होती. जगांत शांति व सद्भाव स्थापन करणें हें त्यांचें जीवितकार्य होतें. प्रेम व सेवा हीं त्यांचीं साधनें होतीं. परमेश्वराच्या प्रार्थनेच्या वाटेवर त्यांना मृत्यु आला, तो मंगलच मानला पाहिजे. जेव्हां त्यांचें शरीर पडलें तेव्हां त्यांच्या मुखांतून 'हे राम!' असे शब्द बाहेर पडले. "अन्तकाले च मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम्। यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः ॥"

## पुरुषाचा पुरुषोत्तम

गांधीजी विसाव्या शतकांतील एक चमत्कार होते. अर्वाचीन शास्त्रीय मन चमत्कार मानीत नाहीं; पण मानवी मनाला आज जें ज्ञात आहे, तें जें अज्ञात आहे त्याच्या मानानें, कोणीं सांगावें, कदाचित् रतिभरहि नसेल! गांधीजींचें सामान्य बालपण व पहिलें तारुण्य हीं पाहिलीं तर एका रात्रींत वेलीवरची कळी पूर्ण उमलून तिचें फूल बनावें त्याप्रमाणें एका जन्मांत केवळ पन्नाससाठ वर्षांच्या अवधींत त्यांनीं येवढ्या उच्च कोटीची साधकावस्था स्वयंप्रेरणेनें व प्रयत्नानें प्राप्त करून घेतलीसें दिसतें. गांधीजींचा पूर्व-जन्मावर व पुनर्जन्मावर विश्वास होता. या जन्मांतीलहि दुर्लभ साधकावस्था त्यांनीं अनेक पूर्वजन्मांत केलेल्या तपांचा सुंदर परिपाक असली पाहिजे. "तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम्॥" अभ्यासानें व वैरा-ग्यानें पुरुषाचा पुरुषोत्तम होऊं शकतो, याचें गांधीजींचें चरित्र एक उत्तम उदाहरण आहे. त्यांनीं आपल्या उदाहरणानें आमच्यासारख्या हजारों, लाखों सामान्य जीवांच्या मनांत श्रेष्ठ, नैतिक व आध्यात्मिक जीवन जगण्याची आशा निर्माण करून आम्हांला प्रयत्नवादी बनविलें आहे. सामान्य माणसालाहि आपल्यांतील पशुत्वाचा बळि देऊन देवत्व प्राप्त करून घेणें शक्य आहे, हें त्यांनीं सोदा-हरण सिद्ध केलें आहे. असा देवमाणूस या पृथ्वीतलावर अवतरला होता व त्याचा पार्थिव देह माणसांत वावरत होता, या गोष्टीवर पुढच्या पिढ्या कदाचित् विश्वासहि ठेवणार नाहींत.

रामाचे सहकारी वानर व श्रीकृष्णाचे संवगडी गोपाल यांच्या भाग्याबद्दल आम्हांला केवढी असूया वाटते! अवतारांशीं 'सखेति मत्वा प्रसभं यदुक्तं, हे कृष्ण हे यादव हे सखेति ॥' इतक्या सलगीनें ते वागले म्हणून आम्ही त्यांना धन्य मानतों; पण भारतांतील गेल्या दोन पिढ्यांचें केवढें महद्भाग्य कीं या पुण्यभूमध्यें एका अवतारी पुरुषाच्या जन्मा-बरोबर त्यांचाहि जन्म झाला होता! धन्य आम्ही कीं अवतारी पुरुषाचे शिष्य व सहकारी होऊन आमचें जीवन सार्थ करण्याची संधि आम्हांला मिळाली! आमच्या पूर्वपुण्याईचेंच हें फळ असलें पाहिजे. ही पुण्याई पुढें वाढविणें म्हणजे महात्माजींचें कार्य यथा-शक्ति, यथामति पुढें चालविणें होय. परमेश्वर ती शक्ति व ती बुद्धि आम्हांला प्रदान करो येवढीच प्रार्थना.








# जगाच्या इतिहासांतलि अपूर्व युगपुरुष

श्री० ह. कृ. मोहनी

महात्मा गांधीजींचा मृत्यु ही अगदीं अनपेक्षित आणि अत्यंत भयंकर अशी घटना आहे. आणि हा मृत्यु कोणी खून करून घडवून आणील अशी कल्पना देखील करितां येत नव्हती. त्यांतहि हा खून त्यांच्याच एका धर्मबांधवाकडून घडावा आणि तो धर्मबांधव एक महाराष्ट्रीय ब्राह्मण निघावा, हें दैवदुर्विलसित, अत्यंत विचित्र, भयप्रद, तसेंच चिर-परिणामी आहे.

गांधीजी १२५ वर्षे जगण्याची इच्छा करीत होते, येवढेंच केवळ नाहीं, तर तशी शास्त्रीयज्ञान-पूर्वक कसोशीनें खटपटहि करीत होते. हिंदुस्थान देश लवकरच सुसंस्कृतीच्या कसोटीनें व धर्माच्या प्रकाशानें, वैभवशाली राष्ट्रांच्या मालिकेंत शिरो-भागीं तळपत राहावा, सद्गुणांच्या बळावरच त्यानें जगांत आपलें उच्च स्थान विलसत ठेवावें, अशी चिंता ह्या महात्म्यानें रात्रंदिवस बाळगली; आणि आपले प्राण नित्य पणास लावून हिंदुस्थानचा उद्धार करण्याचें महत्कार्य केलें.

## ' अजातशत्रू 'चा वध !

गेलीं २५ वर्षे हिंदुस्थानचें राजकारण सात्त्विक गुणांच्या दिशेनें वळवून व अभूतपूर्व असें सत्याग्रहशास्त्र निर्माण करून राजकारणांत अन्यायाविरुद्ध अहिंसक प्रतिकारशक्ति गांधीजींनीं उत्पन्न केली. आणि त्या सत्याग्रही शस्त्राच्या बळावर हिंदुस्थानसारख्या अवाढव्य अठरापगड जातींच्या बेशिस्त व निःशस्त्र देशाचें एकीकरण करून एका पिढींतच राजकीय स्वातंत्र्याचा टप्पा त्यांनीं गांठून दिला. गांधीजींनीं अन्यायाच्या, क्रौर्याच्या, सूडाच्या व पाशवी वृत्तींच्या विरुद्ध आपली मोहीम अहर्निश चालविलेली असली, तरी कोणाहि व्यक्तीचें अनिष्ट चिंतिलें नाहीं. इंग्रजी साम्राज्यसत्तेविरुद्ध बंड उभारणारा हा अद्वितीय क्रांतिकारक असा लोकविलक्षण सेना-पति असला, तरी कोणाहि इंग्रजाचें व्यक्तिशः शत्रुत्व त्यानें कधींहि केलें नाहीं. किती तरी इंग्रज मुत्सद्दी व थोर पुरुष महात्माजींचे मित्र होते ! सर्व भूतांवर प्रेम करण्याचें ध्येय अविरत उद्योगानें आचरणांत आणण्याची खटपट ज्या महापुरुषानें केली, त्याचेंच शत्रुत्व एका महाराष्ट्रीय मनुष्यानें इतकें करावें कीं त्याला गोळ्या घालून ठार मार-ण्यास त्यानें तयार व्हावें ही नियति अत्यंत विस्मय-जनक, अघोर आणि अंतःकरणाचें पाणी करणारी आहे.

एका ॲटमबॉंबच्या धडाक्यानें जपानसारखें बलशाली राष्ट्र जसें निपचित पडावें आणि त्या ॲटमबॉंबची धडकी भरून जागतिक युद्ध बंद व्हावें, सर्व पृथ्वीच जणूं काय ह्या ॲटमबॉंबनें हादरून जावी, तशाच प्रकारचा, सर्व जगासच धक्का देणारा, महात्मा गांधींचा हा मृत्यु ठरला आहे. ७८ वर्षांच्या आपल्या हयातींत महात्मा गांधीजींनीं कोणतें महत्कार्य केलें आहे, जगास कोणत्या प्रकारचा दिव्य झोका दिलेला आहे, याची साक्ष जगास बसलेला हा धक्काच देत आहे. जगांत एकहि राष्ट्र असें नाहीं कीं ज्याला महात्मा गांधीजींच्या मृत्यूनें विचलित केलें नाहीं. मुत्सद्दी, वीर, ग्रंथकार व राज्यकर्ते, सर्वच ह्या मृत्यूमुळें सुन्न, विवश, अस्थिर व कंपित झालेले आहेत.

गेल्या पंचवीसतीस वर्षांतील हिंदुस्थानच्या राजकारणाचें अभूतपूर्व असें सत्याग्रही आंदोलन ह्या

दिव्य विभूतीच्या एकट्याच्याच प्रभावानें घडून आलेलें आहे. आणि ह्या आंदोलनामुळेंच सर्व जगाचें लक्ष या लोकविलक्षण महात्म्याकडे आकर्षित झालेलें होतें. इतिहास बदलविणारा, तमोगुणानें व रजोगुणानें भरलेल्या इतिहासास सत्त्वगुणाची कल - टणी देणारा हा अनन्यसाधारण प्रयोग ह्या महा-पुरुषानें हिंदुस्थानांत घडवून आणला आणि हिंदु-स्थानचें नांव जागतिक इतिहासांत अजरामर केलें. इतिहासांत हें नवें पान स्वर्गीय शाईनें लिहिलें गेलें. अहिंसक राजकारणाचा हा अपूर्व संदेश हिंदुस्थानच्या तर्फे त्यांनीं जगभर पसरविला. त्यांच्या मृत्यूमुळें हा संदेश एकदम बंद पडल्यासारखें वाटत आहे. विचारी व सत्त्वशाली जग हवालदिल झालें आहे. दिव्य, शांत व मधुर संगीत एकदम बंद पडावें आणि हें संगीत ऐकणाऱ्या श्रोतृवृंदाची एकतानता अकस्मात् भंग पावावी तसा प्रत्यय ह्या अकल्पित मृत्यूमुळें येत आहे.

## अहिंसक राजकारणाचे अवतारी प्रवर्तक

वास्तविक पाहूं जाता ज्या कॉंग्रेससंस्थेच्या तर्फे ह्या अहिंसक राजकारणाचा प्रयोग गांधीजींनीं गेलीं पंचवीस वर्षे केला, त्या संस्थेचे सभासदहि गांधी गेलीं कित्येक वर्षे नव्हते. त्यांचें कॉंग्रेसशीं नातें मित्र, सल्लागार व प्रेरक ह्या संबंधाचेंच केवळ होतें. आपल्या कुटुंबाशीं, परिवाराशीं, कॉंग्रेससंस्थेशीं, राष्ट्रीय चळवळीशीं व जागतिक घडामोडींशीं गांधीजींचा संबंध अशाच प्रकारचा निरासक्त, स्फूर्तिदायक व मंत्रप्रेरक असे. गांधीजी कोणत्याहि संस्थेचे आणि कोणत्याहि तंत्राचे गुलाम नव्हते. ते संस्था आणि तंत्र ह्यांचे निर्माते होते. ते जडवत् नव्हते; ते प्राण-मय किंवा सचेतन होते. पाण्यावर जसा तराफा ( Buoy ) तरंगत राहावा तसें गांधीजींचें ध्येयमय मन त्यांच्या शरीराशीं असंपृक्त झाल्यासारखें होतें. गांधीजी रूढार्थानें राजकारणी मुत्सद्दी किंवा दिग्-विजयी वीर नव्हते. ते अपूर्व राजकारण घडविणारे नीतिज्ञ किंवा अवतारी पुरुष (Prophet) होते.

अशा प्रकारचें अपूर्व, लोकविलक्षण, आश्चर्यमय राजकारण करणाऱ्या महापुरुषास जगानें पूर्णांशानें आत्मसात् केलें नसल्यास त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. हिंदुस्थान हें राष्ट्र देखील गांधीजींचें विभूतिमत्त्व अल्पांशानेंच सामावूं शकत होतें. इतिहासास नवीन वाट दाखविणारें त्यांचें अद्वितीय अवतारी व्यक्तिमत्त्व असल्यामुळें जगांतील नेहमींच्या मामुली पद्धतीनें राजकारण करणारे मुत्सद्दी व सेनानी ह्या राज-कारणाकडे आश्चर्यवत् पाहत होते. जग जरी दुरून गांधीजींच्या व्यक्तिमत्त्वामुळें आकर्षिलें गेलें असलें, हिंदुस्थानचें हें सत्याग्रही अहिंसक राजकारण हा जरी जगाच्या कौतुकाचा विषय झालेला असला, तरी राजकारणाच्या व्यवहार्य कक्षेमध्यें हिंदुस्थाना-व्यतिरिक्त इतर देशांत अशा राजकारणास स्थान मिळूं शकत नव्हतें. हिंदुस्थान हीच गांधीजींच्या अहिंसक राजकारणाची खरी कर्मभूमि होती. ह्या कर्मभूमीमध्यें गांधीजींनीं असंख्य अनुयायी मिळविले. ज्यांच्या अंतःकरणांत देशभक्तीचा स्फुलिंग जागृत होता, अशा सर्व लहानमोठ्या देशभक्तांस गांधीजींनीं आपल्या प्रभावी राजकारणसूत्रांत गोंवून घेतलें. देशांतील प्रमुख धीरोदात्त कर्तबगार नरवीर कॉंग्रेस-च्या छत्राखालीं एकत्रित झाले. हिंदुस्थानांतील बहुसंख्य राजकारणी मुत्सद्द्यांनीं गांधीजींचें राजकीय शिष्यत्व पत्करलें. हिंदुस्थानास शांततेच्या मार्गानें सहा महिन्यांपूर्वी स्वराज्यप्राप्ति होण्यामध्यें ह्या राजकारणाचें पर्यवसान झालें. ज्या इंग्रजी साम्राज्य-शाही सत्तेनें हें स्वराज्य शांततापूर्वक दिलें आणि ज्या हिंदुस्थानास हें राजकीय स्वातंत्र्य मिळालें, त्या दोन्हीहि राष्ट्रांनीं जगांत नवीन इतिहास घडविला. हा इतिहास घडविणारे महात्मा गांधी हे हिंदुस्थानचे राष्ट्र–पिता आहेत असें स्वातंत्र्य मिळविणाऱ्या राष्ट्राच्या घटनासमितीनें मान्य केलें. ह्या राष्ट्र-पित्यास अहिंसक राजकारणाचा हिंदुस्थानचा संदेश व्यावहारिक रूपामध्यें जगांत पसरविण्यास सवड मिळाली नाहीं. तथापि ह्या अपूर्व राजकारणाच्या सात्त्विक रंगानें जगास देखील उद्दीपित करण्यास सुरुवात झाली होती असें मानतां येतें.

राजकारण करणारे जागतिक मुत्सद्दी ह्या अहिंसा-मय राजकारणाकडे लक्ष पुरविणारे असले आणि असें राजकारण आचरणांत आणण्याची त्यांची तयारी नसली, तरी ह्या राजकारणानें त्यांच्या हृदयांत किती प्रमाणांत जागा व्यापलेली होती, गांधीजींच्याबद्दलच्या त्यांच्या भावना किती खोल गेल्या होत्या, हें त्यांच्या

अकल्पित मृत्यूमुळें आतां जगजाहीर झालें आहे. गांधीजींच्या मृत्यूमुळें जगांतील राजकीय मुत्सद्दी इतक्या प्रमाणांत हादरून जातील, अशी अपेक्षा स्पष्टपणानें करितां येत नव्हती. अशा अवचित प्रसंगानेंच सुत अस्पष्ट भावना उचंबळून वर येतात. ज्ञात मनापेक्षां अज्ञात मन अशा अकल्पित वेळींच प्रभावी ठरतें. गांधीजींच्या मृत्यूमुळें, राजकारण करणाऱ्या अखिल जगांत त्यांच्याबद्दलची आदरयुक्त भावना कोणत्या मर्यादेपर्यंत विश्वभर पसरलेली होती हें सिद्ध झालें आहे. राजकारणी अधिकारी पुरुषाव्यतिरिक्त इतर कोणाहि मोठ्या मनुष्यासाठीं संयुक्तराष्ट्रसंघाचें ('युनो'चें) आंतरराष्ट्रीय निशाण आतांपर्यंत अवनत केलें गेलें नव्हतें. हा सन्मान आणि मुत्सद्द्यांनीं व राजकारण करणाऱ्या अधिकारी लोकांनीं दाखविलेला हा आदर मिळविणारे गांधीजी हेच पहिले महापुरुष आहेत. जगांत असें एकहि राष्ट्र राहिलें नाहीं कीं जें गांधीजींच्या मृत्यूमुळें हळहळलें नाहीं. मुत्सद्द्यांच्या आदराचें पूर्वीचें रेकॉर्ड गांधीजींनीं उल्लंघून टाकलेलें आहे. कारण मुत्सद्द्यांस राजकारणाचे नवे धडे शिकविणारे गांधीजी हे जगांतील असामान्य शिक्षक होते. राजकारणास नवीन दिशा लावणारे ते अपूर्व वाटाड्ये होते.

राजकारणांतील हा नव संदेश जरी हिंदुस्थानांतील कोट्यवधि लोकांनीं अल्पांशानें आपल्या आचरणांत आणलेला असला आणि त्यामुळें गांधीजींचें अपूर्व राजकारण आचरणांत आणण्यास सुरुवात केली असली, तरी या अद्वितीय संदेशाकडे पाठ फिरविणारे कांहीं हतभागी लोकहि हिंदुस्थानांत आणि विशेषतः महाराष्ट्रांत होते व आहेत. ह्या संदेशाकडे पाठ फिरवूनच न राहतां ते गांधीजींसारख्या जगद्वंद्य विभूतीचें इतकें शत्रुत्व करितील कीं त्यांचें शरीरहि त्यांना नकोसें वाटेल, हे हतभागी लोक गांधीजींचा खून करण्याच्या मर्यादेपर्यंत जातील, सैतान त्यांच्या हृदयांत इतका खोल शिरलेला असेल, असें चित्र गांधीजींच्या प्रत्यक्ष खुनापर्यंत विचाराच्या कक्षेंतहि कोणी रंगवू शकेल असें वाटत नव्हतें. पण ही असंभवनीय वाटणारी घटना आतां प्रत्यक्ष सत्यसृष्टींत अवतरलेली आहे !

## विरोध—विकास—वादाचें एक उदाहरण !

ज्या साधु पुरुषानें कोणाचेहि अनिष्ट न चिंतिण्याचा जन्मभर कशोशीनें प्रयत्न केला, ज्या महापुरुषानें लक्षावधि लोकांच्या हृदयांत स्थान मिळविलें, त्याच दैवी पुरुषास एका मारेकऱ्याच्या हातून मृत्यु यावा ही शोकपर्यवसायी विपरीत घटना, मानवी प्रयत्नांची चिरकालिक अपूर्णता दाखवून अंतःकरणाचें विदारण करण्यास पुरेशी आहे. दुसरी कोणतीहि शोककारक घटना इतकी चिरपरिणामी ठरेल कीं काय ह्याबद्दल संशयच वाटतो. प्रतिभावान् कवींनीं आणि स्फूर्तिशाली नाटककारांनीं अनेक शोकपर्यवसायी घटना आपल्या कल्पनाशक्तीनें निर्माण केलेल्या आहेत. परंतु सत्यसृष्टींत घडून आलेली ही शोककारक घटना, सर्व कल्पनामय घटनांस मागें सारणारी आहे ! भगवान् श्रीकृष्णांचा मृत्यु, ख्रिस्ताचा अंत, ह्या महाघटनांची गांधीजींच्या मृत्यूशीं तुलना होऊं शकत असली, तरी ह्या दंतकथामय झालेल्या घटनांस ऐतिहासिक घटनांसारखें सत्यस्वरूप देतां येत नाहीं. आजची जगास धक्का देणारी ही घटना प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांसमोर घडून आलेली आहे! अब्राहाम लिंकन्चें जगत् व गांधीजींचें जगत् ह्यांत महदंतर आहे. रेडिओ, विद्युत्संदेश, विमानें ह्यांच्यामुळें एकत्रित आलेल्या व सुसंस्कृत समजल्या जाणाऱ्या ह्या जगांत गांधीजींसारख्या दिग्विजयी साधुपुरुषावर हा आघात होऊं शकेल असें सध्यांच्या सुसंस्कृत जगाकडून आशादायक अपेक्षा बाळगणाऱ्यांस वाटत नव्हतें. आणि म्हणूनच हिंदुस्थानचें नूतन राष्ट्र—गांधीजींवर प्राणांपलीकडे प्रेम करणारे मध्यवर्ति सरकारांतील अधिकारी लोक गांधीजींच्या शरीराचें रक्षण करण्याच्या बाबतींत इतके हतप्रभ ठरले !! आकाशांतून पडलेल्या या दिव्य पुष्पावर कोणी मनुष्यप्राणी कुऱ्हाड घालील अशी कल्पना कोण करूं शकला असता ?

विरोधविकासाच्या योगें जगाचें गूढ उलगडून दाखविण्याचा प्रयत्न करणाऱ्या तर्कशास्त्राचें (Dialectics) गांधीजींचा मृत्यु हें जिवंत भौतिक उदाहरण होय. अहिंसेच्या राजकारणाचा जो पैगंबर, त्याच्याच-वर हिंसा उलटली असें हें विश्वाचें अनाकलनीय







गूढ आहे ! दिल्लीच्या दहा लक्ष लोकांच्या हृदय-परिवर्तनाचा चमत्कार ज्यानें एका पंधरवड्याच्याच पूर्वी आपल्या उपवासाच्या तपश्चर्येनें करून दाखविला, त्याचाच अंत पिस्तुलाच्या गोळ्यांनीं करण्यांत आला ! वैयक्तिक आयुष्यांतच केवळ नव्हे, तर सार्वजनिक आयुष्यांतहि सैतानावर विजय मिळविणारा हा देवकोटींतील पुरुष आहे असा विश्वास सहस्रावधि विचारी लोकांस वाटत होता ! ईश्वराची लीला अतर्क्य आहे ! आपण असें मानूं या कीं जिवंत गांधींपेक्षां मृत गांधीच अधिक कार्यक्षम आहेत हें दाखवून देण्याचा ईश्वराचा हेतु असावा ! !

## दानवांविरुद्ध सतत झगडणारा युगपुरुष

सैतानावर विजय मिळविण्याचें महत्कार्य गांधीजींनीं जन्मभर यशस्वी रीतीनें करून दाखविलें आहे. येवढी मोठी इंग्रजी साम्राज्यशाही, परंतु ती ह्या एकट्या मनुष्यानें आपल्या नैतिक सामर्थ्याच्या जोरावर खिळखिळी करून टाकली ! राजकीय, सामाजिक, धार्मिक, आर्थिक व शैक्षणिक क्षेत्रांत पाशवी वृत्तींच्या विरुद्ध नैतिक शक्तींची झुंज त्यांनीं अहोरात्र अविरत चालविली. राजकीय क्षेत्रांत सत्याग्रह व सविनय कायदेभंग, सामाजिक क्षेत्रांत हरिजनांचा उद्धार, मद्यपानबंदी व स्त्रियांची उन्नति, धार्मिक क्षेत्रांत सर्व-धर्मसमभाव, सार्वत्रिक बंधुता व सार्वजनिक प्रार्थना, आर्थिक क्षेत्रांत खादी, ग्रामोद्योग आणि अपरिग्रहाची शिकवणूक, शैक्षणिक क्षेत्रांत वर्धा–शिक्षण–योजना, राष्ट्रभाषाप्रचार, स्वभाषाप्रेम व गांव-सफाई, अशा अनेक प्रकारांनीं गांधीजींनीं देवदानव-युद्ध जन्मभर चालू ठेवलें. आपल्या वैयक्तिक जीवनांत शुद्धता, आरोग्य, साधेपणा व सततोद्योग ह्या गुणांची पराकाष्ठा करून सार्वजनिक जीवनांत सविनय कायदेभंगाच्या, सत्याग्रहाच्या आणि उपवासाच्या शक्तीनें सात्त्विक गुणांचें प्रभुत्व स्थापन करण्यासाठीं गांधीजींनीं अहर्निश लढाई चालविली.

दिल्लींतील उपवास आणि पाकिस्तानमध्यें जाऊन तेथील अन्यायांचें परिमार्जन करण्याची तयारी, कलकत्त्यांतील उपवास आणि नौखालीची यात्रा, लॉर्ड लिन्लिथगो यांचेविरुद्ध उपवास व त्यांशीं पत्रव्यवहार, 'चलेजाव'ची मोहीम, वैयक्तिक सत्याग्रह, हरिजनांकरितां उपवास, देशव्यापी प्रचार व पुण्याचा करार, दांडीयात्रा, असहकाराचें अभूतपूर्व आंदोलन, बारडोलीची करबंदी, चंपारण्यामधील सत्याग्रह, काशीविद्यापीठांतील वज्रलेप भाषण, ट्रान्सवालच्या निःशस्त्र प्रतिकार, ह्या गांधीजींच्या नैतिक रणभूमींवरील लढाया आहेत. अनेक नैतिक गुणांच्या प्रकर्षासाठीं गांधीजींचें वैयक्तिक युद्ध दर पळास चाललेंच होतें. अविरत उद्योग, अहिंसा, सत्यासाठीं मानसिक जपणूक, कामक्रोधादि षड्रिपूंशीं सामना, असें गांधीजींचें अखंड जीवन होतें.

देवासुरांचा हा संग्राम वैयक्तिक त्याचप्रमाणें सार्वजनिक जीवनांत इतक्या कसोशीनें अहोरात्र चालविणारा युगपुरुष जगाच्या इतिहासांत कोणीच अवतरला नाहीं. गांधीजींस हिंदुस्थानांत रामराज्य, शांतीचें साम्राज्य स्थापण्याचें कार्य करावयाचें होतें. तें कार्य शिल्लक राहिलेलें आहे. त्या कार्याचा निदान आरंभ करण्याची स्फूर्ति त्यांच्या मरणानें हिंदुस्थानच्या आजच्या व पुढील राज्यकर्त्यांमध्यें, मुत्सद्द्यांमध्यें नवयुवकांमध्यें, सैनिकांमध्यें आणि बालकांमध्यें निर्माण झाल्यास हिंदुस्थानच्या रामराज्यातर्फे गांधीजी त्यांच्या इच्छेप्रमाणें जागतिक प्रभुत्व मिळवितील आणि चिरायु व अमर होतील !

---

# मानसशास्त्रांतील नव्या वाटा

प्रा. नी. र. वऱ्हाडपाण्डे

आज हिंदुस्थानांत सर्वत्र पुनर्घटना, नियोजन, औद्योगीकरण इत्यादि शब्द ऐकूं येतात. नव्या जगांत नवा हिन्दुस्थान निर्माण करण्याची आतुरता बऱ्याच लोकांना लागली आहे यांत संशय नाहीं. नवें जग म्हणजे शास्त्रीय जग. या जगांत साऱ्या व्यवहारांचें शास्त्र होऊन बसलें आहे. त्यामुळें साहजिकच पुनर्घटनेप्रीत्यर्थ अनेक शास्त्रांच्या अभ्यासाला चालना मिळाली आहे. नव्या मानसशास्त्राचा अभ्यास हीहि यांपैकींच इष्ट अशी एक प्रवृत्ति आहे. हिन्दुस्थानांत कलकत्ता, बंगलोर विद्यापीठें सोडल्यास इतरत्र बहुधा मानसशास्त्राचा अभ्यास अजून होत नाहीं. जिथें होतो तिथें तत्त्वज्ञानाचें एक उपाङ्ग म्हणून होतो, स्वतंत्र शास्त्र म्हणून होत नाहीं. यामुळें अनेकांना मानसशास्त्र हें तत्त्वज्ञानासारखेंच व्यवहारास निरुपयोगी, शब्दांचा काथ्याकूट करणारें, आरामखुर्चीवर बसून कल्पना करणारें शास्त्र आहे असें वाटतें. पण आधुनिक मानसशास्त्रानें हा आपला जुना खाक्या पार बदलून पदार्थविज्ञान व रसायन वगैरे शास्त्रांप्रमाणेंच निर्भेळ शास्त्रीयता कशी प्राप्त करुन घेतली आहे व या शास्त्रांप्रमाणेंच रोजच्या व्यवहारांत देखील आपली उपयुक्तता कशी सिद्ध केली आहे याची कल्पना नसते.

## मनोविश्लेषणशास्त्र हें प्रयोगावस्थेंत

नाहीं म्हणायला कथाकादंबऱ्यांतून वा प्रसंगशः मासिकांतून वगैरे मनोविश्लेषण इत्यादि शब्द अनेकांनीं ऐकलेले असतात. मनोविश्लेषण हीं एक आधुनिक मानसशास्त्राची फार महत्त्वाची बाजू आहे. औषधिशास्त्राची एक शाखा म्हणून तीं पाश्चात्य देशांतून मान्य झाली आहे. निरनिराळे मानसिक रोग दूर करण्यांत व मनाच्या अनपेक्षित व्यापारांचें गूढ उकलण्यांत मनोविश्लेषणाला बरेंच यश आलें आहे. जन्मापासून माणसाच्या मनावर होणाऱ्या संस्कारांची संगति लावून व मनाच्या आंतल्या कोपऱ्यांत लपलेली घाण बाहेर काढून मनाला निरोगी करण्याच्या प्रक्रियेंत पटाईत असलेले बरेच मानसज्ञ युरोप-अमेरिकेंत आहेत. पण मनोविश्लेषणाचे एवढे सर्व विजय मान्य करुनहि मनोविश्लेषण ही कांहीं आधुनिक मानसशास्त्राची सर्वांत महत्त्वाची शाखा आहे असें मला वाटत नाहीं.

कारण कोणत्याही ज्ञानाला शास्त्र ही संज्ञा प्राप्त होण्यास जे गुण आवश्यक आहेत त्यांचा मनोविश्लेषणांत सर्वस्वीं अभाव आहे. यांतील सर्वांत महत्त्वाचा गुण म्हणजे अवलोकन व प्रयोग यांच्या साहाय्यानें आधीं सत्याचें संकलन करायचें. पदार्थवेत्ता आधीं पदार्थांचे गुणधर्म स्वतःच्या इंद्रियांनीं पाहतो. नंतर जे गुणधर्म केवळ इंद्रियांनीं दिसणार नाहींत ते प्रयोगाच्या साहाय्यानें जाणून घेतो. अमुक पदार्थाला उष्णता लागण्यानें काय होतें, थंडींत ठेवल्यानें काय होतें, हें त्याला प्रत्यक्ष उष्णता लावून व तो थंडींत ठेवून तो पाहतो. या प्राथमिक गुणधर्मांची 'चक्षुर्वै सत्यम्' या रीतीनें अशी खात्री करुन घेतल्यावर या पदार्थांचे असेच गुणधर्म कसे, असा प्रश्न विचारुन त्यांची उपपत्ति लावण्याचा प्रयत्न करतो. उपपत्ति लावतांना देखील तो अवलोकन वा प्रयोग सोडीत नाहीं,










शिवाय त्यांचीं सर्व अवलोकनें व प्रयोग दुसऱ्यांनाहि करतां येण्यासारखे असतात.

मनोविश्लेषणानें शास्त्राची ही रीत पाळलेली नाहीं. मनोविश्लेषणाचीं पुस्तकें वाचतांना लेखकांनीं पाहिलेलीं सत्यें कोणतीं व त्यांवर रचलेल्या कल्पना कोणत्या, हें वेगळें निवडून काढावें लागतें. शिवाय सत्य इवलेसें असलें तर त्यावरच्या कल्पना आधाराशिवाय अनंत आकाशांत उडणाऱ्या गरुडाच्या भरारीसारख्या असतात. चिकित्सिलेल्या रोगांची माहिती, रोग्यांचीं लक्षणें अमुक, इतिहास अमुक, औषध अमुक व परिणाम अमुक—अशीं तपशीलवारपणें देऊन व एका तऱ्हेचे सहस्रशः रोगी चिकित्सून कसोशीनें सिद्धान्त मांडलेले नसतात. व या सर्वांवर लेखकाच्या वैयक्तिक आवडीनिवडीच्या प्रभावानें सिद्धान्त व भरमसाट कल्पना केलेल्या असतात. या सर्व कारणास्तव, मनोविश्लेषण हें शास्त्र या संज्ञेला प्राप्त होऊं शकत नाहीं. तसेंच मनोविश्लेषणाच्या रोगचिकित्सेला ६।६ महिन्याचा अवधि व बराच पैसा लागतो. एवढ्या अवधींत रोग आपोआप बरा झाला कीं चिकित्सकाच्या करामतीमुळें बरा झाला, हें कळणेंहि कठीण! शिवाय एवढा पैसा व वेळ खर्चून हिंदुस्थानांतल्या लोकांना रोगनिवारण करणें शक्य नाहीं. तेव्हां प्रयोगावस्थेंतील शास्त्र या नात्यानें मनोविश्लेषणाचें हिंदुस्थानांतहि महत्त्व असलें तरी त्यापेक्षां अधिक उपयुक्त असलेल्या मानसशास्त्राच्या इतर शाखांवर अधिक भर द्यावा लागेल.

## प्रायोगिक मानसशास्त्र

या इतर शाखांत सर्वांत महत्त्वाची शाखा म्हणजे प्रायोगिक मानसशास्त्राची होय. वस्तुतः प्रायोगिक मानसशास्त्र ही केवळ एक शाखा नसून जवळ जवळ सर्वच मानसशास्त्र प्रयोगशाळेंत खेचतां येण्यासारखें असल्यामुळें, मानसशास्त्राचें संवर्धन करण्याची प्रयोग ही शास्त्रमान्य पद्धति आहे, असें म्हणणें जास्त बरोबर होईल. मन हें प्रयोगशाळेंत तपासून पाहतां यायला काय दगडधोंड्यासारखा कांहीं पदार्थ आहे अशी शंका अनेकांना वाटते. पण प्रत्यक्ष मानसशास्त्राच्या प्रयोगशाळेंत गेल्यावर मात्र मनावर प्रयोग करणें हें दगडधोंड्यावर प्रयोग करण्यासारखें सोपें आहे हें तात्काळ पटतें.

साधें उदाहरण घ्यायचें म्हणजे प्रायोगिक मानसशास्त्रज्ञांनीं केलेला स्मरणशक्तीचा अभ्यास पहा. एका कागदावर लिहिलेले आंकडे प्रयोगविषयीभूत माणसाला वाचायला सांगून मग पुनः आठवायला सांगतात. जास्तींत जास्त किती आंकडा तो आठवूं शकतो, हें पहातात. अशा तऱ्हेनें अनेक माणसांची तपासणी करून माणसाला सरासरी ७ अंकांचा आंकडा आठवूं शकतो, असें मानसज्ञांनीं ठरविलें आहे. याचप्रकारें लहान मुलांवर प्रयोग करून स्मरणशक्तीवर वयोमानाचा काय परिणाम होतो, मुलींवर प्रयोग करून लिंगभेदाचा काय परिणाम होतो वगैरे निश्चित केलें आहे. दिसायला किती साधें काम! पण तें काळजीपूर्वक चिकाटीनें करायला खरी सत्यप्रीति व शास्त्रीय दृष्टि लागते. आरामखुर्चीवर बसून भरमसाट कल्पना कुणालाहि करतां येतील. सृष्टिदेवता अभिसारिकेसारखी आपणहून निरीक्षकाकडे येत नाहीं. तिचे व्यापार पाहण्यास तिची सारखी मनधरणी करावी लागते. तेव्हां कुठें ती आपल्या हृदयस्थ सत्यांचें थोडेसें दर्शन घडूं देते. याच प्रयोगपद्धतीनें कोणत्याहि माणसाला एखाद्या रंगाचें नांव घ्यायला सांगितलें तर तो साधारणपणें लाल रंगाचें नांव घेतो, पुरुषांपेक्षां स्त्रियांचें घ्राणेन्द्रिय तीक्ष्ण असतें वगैरे शोध मानसशास्त्रज्ञांनीं लावले आहेत.

## कांहीं गैरसमज

पण हें वाचून कांहीं वाचक म्हणतील, “अहो! एवढा आटापिटा करून शेवटीं हेंच का मानसशास्त्रज्ञ आम्हांला सांगणार! ‘वृक्षस्य कति पर्णानि मेघस्यांड कियत्पलं’—अशा तऱ्हेच्या या ज्ञानानें कुणाला मोक्ष मिळणार आहे, का कुणाची मोटार पेट्रोलशिवाय चालणार आहे! यांत ना स्वार्थ ना परमार्थ!” अशा तऱ्हेच्या टीकेला ज्या देशांत व संस्कृतींत मान्यता मिळते, ती संस्कृति शास्त्राभ्यासाला अगदीं नालायक म्हणून खुशाल समजावें. ज्ञानापासून एकतर मोक्ष तरी मिळाला पाहिजे किंवा पोळी तरी भाजली गेली पाहिजे, असें

मानणाऱ्यांनीं शास्त्राच्या वाटेस जाऊं नये हेंच खरें.

शिवाय प्रयोगान्तीं होणारें असलें निश्चित ज्ञान पुष्कळ वेळां आपल्या लौकिक भ्रमांना चांगलाच धक्का देतें. लॅटिन भाषेचें व्याकरण शिकल्यानें कठीण काम करण्याची संवय अंगीं बाणते, गणित शिकल्यानें बुद्धि तल्लख होते, वगैरे समजुती पूर्वी रूढ असत. एका शास्त्राचें अध्ययन केल्यानें केवळ तें शास्त्र येतें असें नाहीं. तर इतरहि अनेक गोष्टी सहजगत्या येतात असें पूर्वी मानीत. पण यावर प्रत्यक्ष प्रयोग करून पहातां हा केवळ भ्रम असल्याचें कळून आलें. स्त्री व पुरुष यांचे मानसिक गुणधर्म वेगळे असून त्यांचें जीवनांतील कार्यक्षेत्र वेगळें आहे, असें मोठमोठे पंडितमन्य मानीत आले आहेत. पण मानसशास्त्रज्ञांनीं प्रयोगशाळेंत सहस्रशः स्त्रीपुरुषांची पाहणी केली असतां असें आढळून आलें कीं, श्रेष्ठ व कनिष्ठ पुरुषांत जेवढा भेद आहे तेवढा सर्वसामान्य पुरुषांत व सर्वसामान्य स्त्रींत नाहीं. लिंगभेद हा व्यक्तिभेदाइतका प्रभावी नाहीं.

आपल्या देशांत मानसशास्त्राची खरी प्रगति व्हायची असेल तर हिंदुस्थानांतील प्रत्येक विद्यापीठांतून मानसशास्त्राच्या प्रयोगशाळा स्थापन केल्या पाहिजेत व आपाततः यःकश्चित् वाटणाऱ्या सत्यांचें संशोधन करण्यासाठीं जिवापाड मेहनत घेऊन बिनचूक प्रयोग करीत राहणारे शास्त्रज्ञ निघाले पाहिजेत. मी गेल्या वर्षी युरोपांत प्रवास केला तेव्हां डेन्मार्क, बेल्जम वगैरे सारख्या लहान लहान देशांतून सुद्धा मानसशास्त्राच्या मोठमोठ्या प्रयोगशाला असल्याचें आढळून आलें. कोपनहेगन येथील प्रा. रुबिनची भेट घेऊन तो करीत असलेल्या संशोधनावर चर्चा केली. गतीचें दर्शन कसें होतें या प्रश्नावर तो सतत प्रयोग करून सिद्धान्त बसवीत आहे. रशियामध्यें प्रा. पाव्हलाव्हनें सतत ३० वर्षें प्रयोग करून Conditioned Reflex म्हणजे 'सहभावी प्रतिक्रिये'चा सिद्धांत बसविला. त्याचे प्रयोग सुरू असतांनाच रशियांत राज्यक्रांति झाली. त्यामुळें एके दिवशीं त्याचा सहायक प्रयोगशाळेंत उशीरा आला. तें न खपून पाव्हलाव्हनें त्याला उशीराचें कारण विचारलें, राज्यक्रांतीची खबर त्यानें सांगतांच तो म्हणाला—" म्हणजे राज्यक्रांति प्रयोगशाळेंतील कामापेक्षां जास्त महत्त्वाची आहे कीं काय ?" राजकारणाचा गंड झालेल्या आपल्या देशाला हें विधान उद्बोधक नाहीं, असें कोण म्हणेल ? राजकीय उलाढालींपेक्षां शास्त्रचिंता जास्त महत्त्वाची आहे हें या अणुयुगामध्यें अधिक सांगण्याची जरूर आहे काय ?

## बुद्धीचें मापन

प्रयोगशाळेबरोबरच अलीकडे मानसशास्त्राला एक नवा सहायक मिळाला आहे, आणि तो म्हणजे आंकडेशास्त्र किंवा तपशीलशास्त्र ( statistics ). रसायनशास्त्रज्ञ पाण्याच्या एका थेंबाचें परीक्षण करून पाण्याच्या गुणधर्माबद्दल विधान करतो. पण मानसशास्त्रज्ञाला केवळ एका व्यक्तीची तपासणी करून मनाबद्दल सिद्धान्त बसवितां येत नाहींत. कारण पाण्याचा एक थेंब दुसऱ्या थेंबासारखाच असतो. एका व्यक्तीचें मन मात्र दुसऱ्या व्यक्तीसारखेंच असत नाहीं. ' व्यक्ती तितक्या प्रकृती. ' त्यामुळें मानसशास्त्रज्ञ हजारों व्यक्तींची तपासणी करून तिच्या आधारें आपले सिद्धान्त बसवितात. या पद्धतीमुळें मानसशास्त्रामध्यें गणिताची प्रक्रिया शिरून त्याला पदार्थविज्ञानाचें व रसायनाचेंच स्वरूप आलें आहे. समीकरणें, अवयव विश्लेषण ( Factor-analysis ) वर्तुळें, भूमिति वगैरे सरंजाम पाहून याचा मानसशास्त्राशीं काय संबंध, असें प्रथमदर्शनीं वाटतें. पण त्यांतूनच मानवी मनाच्या निरनिराळ्या पैलूंचा शोध लागला आहे. याचेंच एक उद्बोधक उदाहरण म्हणून बौद्धिक गुणकाचें देतां येईल. प्रत्येक वयाच्या सर्वसामान्य मुलाला कोणत्या प्रश्नांचीं उत्तरें देतां येतात, हें अनेक मुलांना कांहीं प्रश्न देऊन ठरवितात. अशाप्रकारें प्रत्येक पुढच्या वर्षासाठीं अधिकाधिक कठिण अशा प्रश्नांची मालिका बसवितात. या प्रश्नमालिकेला बुद्धिनिकष असें म्हणतात. कुणाचाही बुद्धिगुणक काढावयाचा असला कीं, त्याला ही प्रश्नमालिका देतात व कोणत्या वर्षापर्यंतच्या प्रश्नांचीं उत्तरें त्याला देतां येतात हें पाहतात. समजा, विसाव्या

वर्षांपर्यंत 'क्ष'ला उत्तरें देतां आलीं; तर विसाला 'क्ष'च्या वयानें भागिलें म्हणजे त्याचा बुद्धिगुणक मिळेल. अर्थात् $\frac{२०}{\text{क्षचें वय}}$ हा 'क्ष'चा बुद्धिगुणक. सोळाव्या वर्षानंतर बुद्धीची वाढ होत नाहीं म्हणून सोळाच्या वर बुद्धिगुणकाचा छेद कधींच ठेवीत नाहींत. सुमारें १८ वर्षांच्या वयानंतर शरीरबल व बुद्धिबल यांची वाढ होत नसल्यामुळें ज्ञानेश्वरांनीं १८ व्या वर्षी ज्ञानेश्वरी लिहिली, किंवा राघोभरारीनें १९ व्या वर्षी अटकेपार झेंडा फडकाविला, असें नेहमीं आश्चर्यानें सांगण्यांत येतें, त्यांतील आश्चर्याचा अंश बराच कमी होतो. तसेंच आपल्याकडे म्हातारपणाला जी प्रतिष्ठा आहे, तीहि फारशी सयुक्तिक न वाटतां मोठमोठीं जबाबदारीचीं कामें तरुणांनाच देणें कसें इष्ट आहे हेंहि दिसून येतें.

हिंदुस्थानमध्यें गरीबीमुळें पुष्कळशा मुलांची बुद्धिमत्ता वाया जाते व कांहीं मठ्ठ मुलें केवळ श्रीमंत असल्यामुळें खडतखडत कां होईना पण एम्. ए. पर्यंत पोहोंचूं शकतात. यांत राष्ट्रीय बुद्धिमत्तेचा व पैशाचा अपव्यय होतो. तो थांबविण्यासाठीं बुद्धिगुणक—मापनाचा फार उपयोग होण्यासारखा आहे. समाजांतील शाळेंत जाण्यास योग्य अशा सर्व मुलांचा बुद्धिगुणक काढून हजारांतून एक किंवा दहा हजारांतून एक अशा अत्युत्तम बुद्धिमान् मुलाची निवड करावी व त्याला सरकारी शिष्यवृत्ति देऊन शिक्षण द्यावें. मानसशास्त्राच्या या युगांत Full many a gem of purest ray serene the dark unfathomed caves of ocean bear, Full many a flower is born to blush unseen and waste its sweetness on the desert air असें होण्याचें कारण नाहीं.

## विशिष्ट गुणांचें मापन

केवळ बुद्धिमापनाच्या बाबतींत मानसशास्त्र उपयोगी आहे असें नाहीं. तर विशेष गुणांच्या मापनाच्या बाबतींत देखील त्यानें बरीच प्रगति केली आहे. एकाद्याची सर्वसाधारण बुद्धि चांगली असली तरी विशिष्ट विषयांत चांगली असेलच असें नाहीं. भाषाविषयांत हुषार असणारा मुलगा गणितांत हुषार असेलच, असें नाहीं. तसेंच शाळेंत पहिला नंबर पटकावणारा मुलगा सैन्यांत कार्यक्षम ठरेलच असें नाहीं. या निरनिराळ्या कामांत सूक्ष्म संशोधन करून कुणांत कोणता विशिष्ट गुण आहे हें ओळखणाऱ्या कसोट्या देखील मानसशास्त्रज्ञांनीं शोधून काढल्या आहेत. या संशोधनांतूनच Industrial Psychology ( औद्योगिक मानसशास्त्र ), सैनिक-मानसशास्त्र वगैरे शास्त्रें जन्माला आलीं आहेत. पायाभूत शिक्षण देण्याच्या बाबतींत बुद्धिगुणक जसा उपयोगी पडणारा आहे, तसेंच विशेष शिक्षण देण्याच्या बाबतींत विशिष्टगुणमापन उपयोगी पडणार आहे. विशिष्ट गुणमापनामुळें, पुस्तकी मुलगा I. C. S होऊन राज्यकारभार हांकतो, रामानुजमसारखा गणिती कारकुनी करतो व मोठा सेनानी होण्याची लायकी असलेला पुरुष हमाली करतो अशीं, विजोड दृश्यें दिसणार नाहींत. जगांतील पुष्कळ दुःखें योग्य माणूस योग्य ठिकाणीं काम करीत नसल्यामुळें निर्माण होतात. रामानुजमला कारकुनींत सुख लाभलें नसतें व एखाद्या जन्मजात सेनानीला हमालींत समाधान वाटणार नाहीं, हें सांगायला नको. मनाच्या आवडीप्रमाणें व्यवसाय मिळाला म्हणजे एकंदर जीवनालाच मानसिक स्थैर्य व समाधान लाभतें. आवडीवर व्यवसाय अवलंबून असल्यास काम हें काम न वाटतां क्रीडा वाटेल व केवळ पगाराकडे पाहून नोकऱ्या निवडण्याची जी अनिष्ट प्रवृत्ति आपल्या समाजांत आहे तिला आळा बसून व्यक्तीचें व समाजाचें बरेंच हित होईल. युरोप—अमेरिकेंत सैन्यांत व मोठमोठ्या कंपन्यांत मानसशास्त्रज्ञ असतात व ते कामगारांची कार्यक्षमता वाढविण्याचा शास्त्रीय प्रयत्न करीत असतात. हे प्रयत्न नेहमीच यशस्वी होतात, असें नाहीं. पण डॉक्टराच्या औषधाला नेहमीच गुण येत नसला तरी औषधिशास्त्राची किंमत आपण कमी समजत नाहीं. त्याचप्रमाणें औद्योगिक मानसशास्त्राचा अभ्यास देखील जोरांत सुरू करून आपल्या देशाची व्यावसायिक कार्यक्षमता वाढविली पाहिजे.

## मानसशास्त्राचें महत्त्व

प्रायोगिक व प्रयुक्त मानसशास्त्राची प्रगति










होण्यास तपशीलशास्त्राचें किती महत्त्व आहे, हें मागें सांगितलेंच आहे. आपल्याकडे प्रत्येक विद्यापीठांत मानसशास्त्राची प्रयोगशाळा व एक तपशीलखातें पाहिजे. या तपशीलखात्यानें प्रांतांतील प्रत्येक विद्यार्थ्यांचा बुद्धिगुणक, विशेषगुणमापन, भावनाशीलता, इत्यादि अनेक अंगांच्या चिकित्सेची नोंद ठेवावी. या तपशीलखात्यानें कारखाने, सरकारी दफ्तरखाने वगैरेंतील कामगारांची ही अशी गुणवार नोंद ठेवल्यास त्याचें काम बरेंच वाढेल व त्याचा विस्तारही मोठा करावा लागेल. पण तपशीलशास्त्रावर अवलंबून असलेलीं शास्त्रें तपशील जेवढा सर्वंकष व मोठा तेवढीच जास्त निश्चित व साधार होतात हें लक्षांत ठेऊन एवढा मोठा तपशील जवळ बाळगायलाहि कचरूं नये. या सर्व तपशिलाचा अभ्यास विद्यापीठांतील प्राध्यापक व संशोधक विद्यार्थी यांनीं कसोशीनें केल्यास मानसशास्त्राचे दूरगामी सिद्धान्त निघतील व आपला देश जगाच्या शास्त्रीय ज्ञानांत बरीच भर घालील. शास्त्रीय ज्ञानांत भर घालण्याच्या दृष्टीनेंच केवळ नव्हे तर, आपली शैक्षणिक, औद्योगिक व सैनिक कार्यक्षमता वाढवण्याच्या दृष्टीनें देखील अशा संशोधनाचें फार महत्त्व आहे. या शास्त्रांत कलकत्ता विद्यापीठ व बंगलोर यांनीं एक पाउल पुढें टाकलें आहे. पण इतर देशांच्या मानानें आपल्याला अजून बरीच मजल गांठावयाची आहे. परदेशांतील प्रयोगशाळांतून व कारखान्यांतून मानसशास्त्रीय कामाचा अनुभव घेऊन आलेले विद्यार्थी हें काम चांगलें करूं शकतील. अशा शिक्षित तरुणांची आज फार गरज आहे.

---

## हिंदमधील मुसलमान बंधूंचें कर्तव्य

" आमच्या मुसलमान बांधवांनीं अधिक सुज्ञपणा व सहिष्णुता कां दाखवूं नये ? पूर्वीच्या काळीं संस्कृत शिकून त्याबद्दल अभिमान बाळगणारे असे अल्बेरुनी आणि फैझी यांसारखे मुसलमान होऊन गेलेच ना ? खुश्रू, रहिम यांसारखे हिंदी भाषा व हिंदी वाङ्मय निर्माण करणारे साहित्यिक होऊन गेले नाहींत कां ? आजहि एकादा नझरुल इस्लाम संस्कृतप्रचुर बंगाली कविता लिहिण्यांत हिंदूलाहि मागें टाकतोच कीं नाहीं ? एकादा मिर्झा अबुल फझल मूळ संस्कृतांतून वेदांचा अनुवाद करून दाखवितोचना ? इंग्रजी भाषेसारख्या परकी भाषेच्या नैपुण्याबद्दल मुसलमानांना भूषण वाटत का नाहीं ? असें जर आहे तर मग आमच्या राष्ट्राच्या जीवनांतील या आणीबाणीच्या प्रसंगीं मुसलमानांनीं नागरी लिपि कां शिकूं नये ? हिंदूंप्रमाणेंच हिंदी भाषा व हिंदी वाङ्मय यांचें ज्ञान संपादन करावयाचा प्रयत्न त्यांनीं कां करूं नये !... हल्लींचें माथेफिरू जातीयतेचें वेड जावयाला पाहिजे असेल, तर आमच्या मुसलमान बंधूंनीं तें नष्ट करावयाला अशाच रीतीनें मदत केली पाहिजे. "—**पंडित सुंदरलाल, 'हरिजन,' १८-१-४८**

# शिकारीची चिरफाड

श्री. य. रा. दाते

महाभारतांतील आदिपर्वामध्यें एक गोष्ट आहे. तीमध्यें असें सांगितलें आहे कीं, एका कोल्ह्यानें एका अरण्यांत वाघ, उंदीर, लांडगा व मुंगूस यांच्याशीं सख्य संपादन केलें होतें. त्यास एका हरणांच्या कळपांत मोठा काळवीट दृष्टीस पडला. त्यास मारण्याकरितां त्यानें या आपल्या मित्रांचें साहाय्य संपादन केलें. केवळ एकट्या वाघास त्या चपळ काळवीटाची शिकार करतां येणें शक्य नव्हतें तेव्हां कोल्ह्यानें युक्तीनें तो काळवीट निजला असतां उंदराकडून त्याचे खूर कुरतडवून त्यास पळावयास असमर्थ केलें व नंतर त्यास वाघानें मारलें. याप्रमाणें त्या काळवीटाची शिकार साध्य झाल्यावर कोल्ह्यानें आपल्या लबाडीच्या भाषणानें वाघ, लांडगा, मुंगूस व उंदीर यांस ती शिकार खाण्यापासून परावृत्त करून निघून जावयास लावलें व ते निघून गेल्यावर एकट्यानें त्या शिकारीवर हात मारला.

## जर्मनीची शिकार

यूरोपमध्यें जोंपर्यंत जर्मनीची शिकार करावयाची होती तोंपर्यंत चीन, रशिया, इंग्लंड, फ्रान्स व अमेरिका यांचें सख्य अत्यंत उत्तम जुळलें होतें. परंतु ती शिकार साधून जर्मनी पूर्णपणें चीत झाल्यानंतर या मित्रांमध्यें त्या शिकारीची वांटणी व चीरफाड कशी करावी या संबंधीं मतभेद उत्पन्न होऊं लागले व आतां कोल्ह्याची भूमिका कोणाकडे येणार आहे व अधिकांत अधिक लाभ कोणास करून घेतां येतो तें लवकरच जगाच्या निदर्शनास येणार आहे. अर्थात् चीनसारखें राष्ट्र हें उंदरासारखें निर्बळ असल्यामुळें त्याला या शिकारींत प्रथमपासूनच भाग घेतां न आल्यामुळें त्याच्या वांट्याचा प्रश्नच कधीं उद्भवला नाहीं व त्या देशाला प्रथमपासूनच वगळण्यांत आलें. बाकीच्या राष्ट्रांनीं इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका व रशिया यांनीं आपआपलीं सैन्यें नेऊन जर्मनीचे निरनिराळे भाग व्यापून टाकले व आतां जर्मनीच्या व्याप्त प्रदेशापासून आपला अधिकांत अधिक फायदा कसा करून घेतां येईल इकडे लक्ष देत आहेत.

अर्थात् या चार मित्रराष्ट्रांची स्वतःची परिस्थिति व जर्मनीचा जो भाग त्यांनीं व्यापला आहे तेथील परिस्थिति ही प्रत्येक राष्ट्राच्या दृष्टीनें निरनिराळी असल्यामुळें आतां या चीरफाड केलेल्या जर्मनीला कसें घट्ट करावें, यासंबंधीं प्रत्येक राष्ट्राकडून निरनिराळीं मतें व भिन्न भिन्न प्रकारचें धोरण यांचा अवलंब करण्यांत येत आहे. त्यामुळें या बाबतींत या मित्रसंघामध्यें मतभेद उत्पन्न होत आहेत व प्रत्येक राष्ट्र आपआपल्या हिताच्या दृष्टीनें या गोष्टीकडे पहात आहे व त्याप्रमाणें व्याप्त जर्मनीस वागणूक देत आहे.

या संबंधीं निरनिराळ्या राष्ट्रांचा दृष्टिकोन कसकसा आहे हें प्रथम समजून घेतलें म्हणजे या प्रश्नाचा बराचसा उलगडा करणें सोपें होईल असें वाटतें.

## सर्व मित्रांची एकवाक्यता

या बाबतींत रशिया, अमेरिका, इंग्लंड व फ्रान्स यांचें मतैक्य होऊं शकत नाहीं. कारण सध्यां व्यापलेल्या जर्मन प्रदेशामध्यें कोणत्या प्रकारचें आर्थिक व राजकीय धोरण ठेवावें या संबंधीं रशियाचें धोरण








इतर मित्रांच्या धोरणापासून अगदीं भिन्न आहे. या सर्व मित्रांचें धोरण असें आहे कीं, जर्मनीला अशा तऱ्हेनें खची केला पाहिजे कीं त्याला पुन्हां युद्ध करण्याची इच्छा होऊं नये. पण त्यांतल्या त्यांत अमेरिका, इंग्लंड व फ्रान्स यांचें असें मत आहे कीं, जर्मनीला इतका कमकुवत केला पाहिजे कीं जर्मनीनें पुढेंमागें मनांत आणलें तरी सुध्दां त्या देशास यापुढें युद्ध करणेंच अगदीं अशक्य झालें पाहिजे: परंतु रशियाची तयारी इतकें पुढें जाण्याची नाहीं. रशियाच्या मनांत पुन्हां जर्मन राष्ट्र समर्थ बनावें असें आहे. अर्थात् १९४५ सालीं पॉट्सडॅम येथें जी परिषद झाली त्या वेळीं रशियाचें असें मत असणें शक्य नव्हतें. कारण त्यावेळीं जर्मनीचा पाडाव व्हावयाचा होता. तेव्हां आतां रशियानें आपलें मत त्यावेळेच्या मानानें बदललें आहे असें इतर मित्रांस वाटणें साहजिकच आहे. त्यावेळीं सर्वांचेंच मत जर्मनीमध्यें बलिष्ठ अशी केंद्रीय सत्ता ठेवणें इष्ट नाहीं असेंच होतें व त्यावेळीं असेंहि धोरण आखण्यांत आलें होतें कीं, जर्मनीचा पराभव झाला म्हणजे जर्मनीची आर्थिक व्यवस्था इतकी कमकुवत करून टाकली पाहिजे कीं, त्या देशांतील मोठमोठे कारखाने विशेषतः ज्या कारखान्यांमध्यें युद्धकाळीं दारुगोळा व युद्धोपयोगी सामान तयार करणें शक्य आहे अशा कारखान्यांतील सर्व यंत्रसामुग्री मित्रराष्ट्रांनीं हलवून आपल्या देशांत घेऊन जावी; म्हणजे असे कारखाने जर्मनींत राहणारच नाहींत व पुढेंमागें युद्धाचे वेळीं त्यांचा उपयोग जर्मनीस करून घेतां येणार नाहीं; एवढेंच नव्हे तर तसा संभवहि राहणार नाहीं. अशा कारखान्यांतील यंत्रसामुग्री मित्रराष्ट्रांनीं वांटून घ्यावयाचें ठरलें होतें व त्यांतील बराच मोठा वांटा रशियास मिळावयाचा होता.

## रशियाचें धोरण बदललें

परंतु ही पॉट्सडॅम येथें ठरलेली योजना रशियास फारशी फायदेशीर होऊं शकली नाहीं. कारण रशियाची जी प्रथम कल्पना होती कीं जर्मनींतील मोठमोठ्या कारखान्यांतील, जगांतील अतिशय उत्तम व कार्यक्षम अशी यंत्रसामुग्री आपणांस रशियांत नेऊन आपल्या कारखान्यांत बसवितां आली तर रशियाचे उद्योगधंदे फार मोठ्या प्रमाणांत वाढतील व रशियाचें औद्योगिक सामर्थ्य अतिशय वाढून आज रशियास ज्या उद्योगधंद्यांची व औद्योगिक मालाची वाण आहे ती भरून निघेल, एवढेंच नव्हें तर आपल्या प्रचंड मनुष्यबळाच्या साहाय्यानें व जर्मन यंत्रसामुग्रीच्या मदतीनें आपण जगामध्यें औद्योगिक क्षेत्रांतही सहज अग्रेसरत्व पटकावूं, ती सर्व कल्पना हवेंतील मनोऱ्याप्रमाणें ठरली व उलट रशियास याबाबतींत अगदीं निराळाच अनुभव आला. जर्मनीमधून जीं अवाढव्य यंत्रें खोलून रशियांत नेण्यांत आलीं तीं नीटपणें पुन्हां जुळवून चालूं करण्याचें कामहि रशियन यांत्रिकांस साध्य झालें नाहीं. जीं कांहीं यंत्रें जोडून झालीं तीं व्यवस्थितपणें चालवितां येत नाहींत असें आढळून आलें. अशा अवाढव्य यंत्रांस, बसविण्याकरितां व चालविण्याकरितां, मोठमोठ्या इमारती प्रथम बांधणें अवश्य आहे असें आढळून आलें व अशा इमारती कांहीं सध्याच्या दिवसांत चुटकीसारख्या उठत नाहींत ही गोष्टहि लवकरच निदर्शनास आली. त्या प्रमाणेंच अशीं अवजड व मोठीं यंत्रें चालूं करण्यास विजेचा पुरवठा फार मोठ्या प्रमाणावर करावा लागतो व फार मोठ्या शक्तीची वीज नेण्याकरितां मोठमोठ्या तारा घालाव्या लागतात. तसेंच अशा कारखान्यांपर्यंत कच्चा माल वगैरे नेण्याकरितां, पक्का माल बाहेर आणण्याकरितां रेल्वेरस्ते तयार करावे लागतात व असे रस्ते वगैरे तर रशियामध्यें तयार नव्हते व थोड्या वेळांत तयार होणें शक्य नव्हतें. यामुळें जर्मनीमधून यंत्रसामुग्री नेऊन आपले कारखाने वाढवावयाचे व आपलें औद्योगिक संवर्धन करावयाचें हें रशियाचें मनोराज्य भंग पावून या बाबतींतील रशियाचा पहिला उत्साह हळूहळूं मावळूं लागला व तो इतका विरून गेला कीं कांहीं जर्मन यंत्रसामुग्री रेल्वेस्टेशनवरून कारखान्याच्या जागींहि नेणें शक्य झालें नाहीं व रेल्वेच्या साइडिंगमध्येंच ती गंजत पडून राहूं लागली व कांहीं बर्लिन ते मास्कोमधील निरनिराळ्या स्टेशनांवर तशीच पडून राहिली व अशा रीतीनेंहि जर्मनींतून जेवढी यंत्रसामुग्री रशियाच्या वांटणीस आली होती त्यांपैकीं अर्धीहि प्रत्यक्ष जर्मनींतून रशियास हलवितां आली नाहीं.









अनुक्रमणिका

तेव्हां अशा तऱ्हेचा प्रयत्न व्यर्थ समजून पुढें तो सोडून देण्यांत आला.

यानंतर जर्मनींतून कारखान्यांतील यंत्रसामुग्री नेण्यापेक्षां त्या कारखान्यांतून तयार होणारा मालच नुकसानभरपाई म्हणून नेण्याचें धोरण रशियानें स्वतः व्यापलेल्या जर्मनीच्या प्रदेशांत सुरू केलें व आतां जर्मनीकडून रशियाला दहा हजार कोटी किंवा एक महापद्म डॉलर किंमतीचा माल जर्मनी-कडून मिळावा अशी त्याची अपेक्षा आहे व याकरितां सर्व जर्मन देशांतील कारखान्यांनीं असा माल काढून रशियाची भरपाई करावी अशी रशि-याची इच्छा आहे. परंतु यामुळें पूर्वीचें धोरण अजीबात बदलावें लागतें ही गोष्ट रशियाच्या लक्षांत येत नाहीं. व आली तरी तिकडे रशिया लक्ष देऊं इच्छीत नाहीं. परंतु हें नवीन धोरण इतर मित्र-राष्ट्रांस मान्य होणें शक्य नाहीं. कारण अशा तऱ्हेनें मालाच्या स्वरूपांत नुकसानभरपाई घ्यावयाची म्हणजे जर्मनीचें पुनः औद्योगिक बल फार मोठ्या प्रमाणांत वाढविलें पाहिजे व केवळ रशियाकरितांच माल तयार करून भागणार नाहीं. तर जर्मनीला फार मोठ्या प्रमाणावर माल तयार करण्यास समर्थ केलें, तरच मालाच्या स्वरूपांत नुकसानभरपाई मिळणें शक्य होणार आहे. कारण जर्मनी प्रथम कारखाने चालविण्यास जिवंत राहिला पाहिजे व याकरितां जर्मन लोकांस प्रथम जिवंत राहण्याकरितां अवश्य तेवढें उत्पादन केलेंच पाहिजे. त्याशिवाय तो कांहींच करण्यास समर्थ होणार नाहीं. तेव्हां स्वतःच्या जीवनास अवश्य तेवढें उत्पादन जर्मनी-कडून करून घेऊन तेवढें त्यास ठेऊन त्यापेक्षां जें अधिक उत्पादन होईल तेंच मित्रराष्ट्रांस जर्म-नीच्या बाहेर नेतां येणें शक्य आहे व याकरितां व हें शक्य होण्याकरितां जर्मनीची उत्पादनशक्ति फारच मोठ्या प्रमाणावर वाढवावी लागेल.

## जर्मनीची उत्पादनशक्ति वाढविण्यांत धोका

आजचा जर्मनी हा युद्धापूर्वीचा जर्मनी मुळांतच राहिला नाहीं. जर्मनीच्या पूर्वीच्या प्रदेशांतील बराच मोठा कृषिप्रधान प्रदेश विशेषतः पूर्वेकडील प्रदेश त्यापासून हिरावून घेण्यांत आला आहे व तो पोलंड या देशास बहाल करण्यांत आला आहे. त्या-प्रमाणेंच त्या पूर्वेकडील प्रदेशांत व चेकोस्लोव्हाकिया या देशांत जे जर्मन लोक रहात होते अशा सुमारें एक कोटी जर्मन लोकांस त्या देशांतून काढून जर्मनींत घालवून देण्यांत आलें आहे. त्यामुळें आज खुद्द जर्मनीमध्यें परिस्थिति अशी आहे कीं, पूर्वीच्या-पेक्षां एकंदर कमी क्षेत्रांत व त्यांतहि बऱ्याच कमी प्रमाणांत असलेल्या शेतीच्या जमीनीवर सात कोटी जर्मन लोकांना मोठ्या दाटीनें वस्ती करून रहावें लागत आहे व आपली उपजीविका चालवावी लागत आहे. आज जर्मनीमध्यें लोकसंख्येचें क्षेत्राच्या मानानें व दाटीच्या मानानें प्रमाण पाहिलें तर फ्रान्स देशाच्या मानानें तेथें दर मैलास वस्तीचें प्रमाण तिप्पटीनें पडतें. अशा परिस्थितींत जर्मनींतील लोकांस जर बाहेरून अन्नाचा पुरवठा होऊं शकला नाहीं तर त्यांची उपासमार झाल्या-शिवाय रहाणार नाहीं. आणि हा अन्नाचा पुरवठा बाहेर देशांतून आणावयाचा म्हणजे त्या देशास माल पुरविल्याशिवाय तसें होणें शक्य नाहीं. याकरितां आजच जर्मनीजवळ आपल्या केवळ पोषणाकरितां औद्योगिक उत्पादनाचा मोठा बोजा पडत आहे. आणि अशा स्थितींत जर रशियाला नुकसान-भरपाईकरितां माल पुरवावा लागला तर तो बोजा अधिकच वाढणार आहे व एवढा बोजा जर जर्मनीस सहन करणें भाग पडावयाचें असेल तर तेथील लोकांची व कारखान्यांची उत्पादनशक्ति फार मोठ्या प्रमाणांत वाढविण्यांत आली पाहिजे व जर्मन लोक व जर्मन कारखाने फार मोठ्या प्रमाणांत कार्यक्षम बनविले पाहिजेत. त्याशिवाय हें घडून येणें शक्य नाहीं. सुमारें दीड–एक वर्षापूर्वी सोव्हिएत सरकारचा एक सेनापति मार्शल सोकोलोव्हस्की यानें असें म्हटलें होतें कीं, 'जर्मनीला जर दर वर्षी ९० लक्ष टन पोलाद तयार करून त्याच्या यंत्र-सामग्री वगैरे वस्तू तयार करण्याची मोकळीक व पात्रता ठेवली तर थोड्याच वर्षांत पुनः युद्ध झाल्याशिवाय रहाणार नाहीं.'' परंतु आज मॉस्को येथील सोव्हिएत प्रतिनिधींचेंच म्हणणें असें आहे कीं, सध्यां जर्मनीला दर वर्षी ९० लक्ष टनच नव्हे तर 'एक कोटि किंवा एक कोटि वीस लक्ष टन'पर्यंत







पोलाद व त्याची यंत्रसामग्री व वस्तू तयार करण्याची पात्रता असणें व मोकळीक देणें अवश्य आहे.

## धोक्याच्या विरुद्ध रशियाचा उपाय

अर्थात् या धोरणामध्यें धोका आहे ही गोष्ट सोव्हिएत पुढाऱ्यांना कळत नाहीं किंवा दिसून येत नाहीं असें नव्हे. त्या धोक्याची त्यांना पूर्ण कल्पना आहे; पण आज रशियाची आर्थिक परिस्थितीच अशी आहे व त्यांस अनेक आवश्यक गोष्टींचा इतका तुटवडा पडला आहे कीं त्यांस हा संभाव्य धोका पत्करून सुद्धां अशा वस्तू जर्मनीकडून मिळविणें भाग आहे व म्हणून ते हा धोका पत्करण्यासहि तयार झाले आहेत. तथापि या मार्गांतील धोका दूर कसा करतां येईल यासंबंधींहि त्यांनीं विचार केलेला नाहीं असें नाहीं व तो धोका उत्पन्न होऊं नये किंवा टाळतां यावा म्हणून त्यांच्या दृष्टीनें व त्यांच्या कल्पनेप्रमाणें त्यांनीं तजवीज करण्याचें योजिलें आहे. त्यांची कल्पना अशी आहे कीं जर्मनीला आपल्याच पद्धतीच्या राजकारणांत पूर्णपणें जखडून टाकावयाचें म्हणजेच जर्मन लोकांचें मतपरिवर्तन करून त्यांस पूर्णपणें समाजवादी बनवावयाचें. याप्रमाणें एकदां ते आपल्या राजकीय तत्त्वप्रणालीशीं समरस झाले व त्यांचीहि समाजरचना व आर्थिक व्यवस्था समाजवादी पद्धतीची बनली म्हणजे त्यांची औद्योगिक दृष्ट्या कितीहि वाढ झाली किंवा तो प्रदेश औद्योगिक दृष्ट्या कितीहि संवर्धित अगर महत्त्वाचा झाला तरी रशियाच्या एकंदर सोव्हिएत संघाचें बल कमी होण्याच्या ऐवजीं वृद्धिंगतच होईल व त्यांची शक्ति एकंदर रशियन समाजसंघटनेस प्रतिकूल न होतां अनुकूलच होईल, पुढील युद्धाचा धोका टळेल व जर्मनीचें औद्योगिक सामर्थ्य रशियाच्या विरुद्ध उपयोजिलें जाण्याचा संभव टळेल. याकरितां जर्मनीमध्यें पुढील तीन गोष्टी होणें त्यांस अवश्य वाटतें:—

पहिली, रशियानें व्यापलेल्या प्रदेशांत असलेल्या प्रदेशांतील बर्लिन या शहरांतच एक बलिष्ठ अशी केन्द्रगत सत्ता निर्माण करणें; दुसरी, तेथें समाजवादी पुढाऱ्यांचें वर्चस्व असलेला असा प्रबल राजकीय पक्ष निर्माण करणें; आणि तिसरी, सर्व जर्मनीमध्यें ट्रेड यूनियन्स किंवा व्यापारी संघ निर्माण करून व त्यांची एक प्रबल संघटना करून तिचें केन्द्र बर्लिनमध्यें स्थापन करणें व त्या केन्द्रामध्यें सर्व सत्ता एकत्रित करणें. अशा तऱ्हेची व्यवस्था झाली म्हणजे या सर्व संघटनेवर, त्यांस आपल्या समाजवादाच्या प्रचारानें जनतेचें समाजवादाकडे मतपरिवर्तन करून व जनतेमध्यें समाजवादी मताचे लोक इतस्ततः पेरून, आपलें वर्चस्व स्थापन करतां येईल असें वाटत आहे. अशा परिस्थितीमध्यें रशियन सोव्हिएत पुढारी जर्मनीमध्यें सर्वत्र मोठ्या प्रमाणावर माल तयार करणारे कारखाने कार्यक्षम करून त्यांचें सोव्हिएत संघाचें वर्कशॉपच करण्यास तयार आहेत व या बाबतींत पुढेंमागें उत्पन्न होणारा धोकाहि पत्करण्यास ते तयार आहेत. ही सर्व योजना व कल्पना सोव्हिएत संघाच्या 'सर्व जगच समाजवादी करून सोडावयाचें' या कल्पनेशीं व त्यांच्या कार्यपद्धतीशीं पूर्णपणें जुळणारी आहे.

## इतर तीन मित्रराष्ट्रांचें धोरण

परंतु अशा तऱ्हेच्या योजनेस अर्थातच ब्रिटिश, फ्रेंच व अमेरिकन यांची संमति मिळणें अशक्य आहे. त्यांच्या नवीन जर्मनीसंबंधींच्या कल्पना अगदीं निराळ्या होत्या. त्यांना जर्मनीमध्यें अशा तऱ्हेच्या राजकीय संस्था निर्माण करावयाच्या होत्या कीं, त्या सर्व स्वतंत्रपणें आपआपल्या वैयक्तिक पायावर उभ्या राहून वैयक्तिक रीत्या स्वतंत्र विचारसरणीचा अवलंब करीत राहतील व कोणत्याहि एका मोठ्या संघटनेच्या अथवा एकाद्या मोठ्या भांडवलवाल्या पुढाऱ्याच्या अनुयायी बनून त्याच्या अंकित होणार नाहींत. त्यांच्या मनांत सत्तेचें संवर्धन समाजांतील खालच्या थरामध्यें सुरू होऊन मग तें वरच्या वरच्या पायरीवर जावें, एकाद्या बलिष्ठ संस्थेकडून किंवा पुढाऱ्याकडून तें खालीं झिरपत येऊं नये, असें होतें. त्यांची अशी योजना होती कीं, ठिकठिकाणीं स्वतंत्र संघ अथवा संस्था किंवा स्थानिक स्वराज्यासारख्या संस्था निर्माण व्हाव्या व त्यांच्यामध्यें आणि ट्रेड यूनियन्स किंवा व्यापारी संघ यांच्यामध्यें नेहमीं सत्तेकरितां स्पर्धा होत राहावी, तसेंच या स्पर्धे-








मध्यें किंवा चढाओढीमध्यें निरनिराळ्या राजकीय पक्षांसहि भाग घेतां यावा व याप्रमाणें त्यांच्या सत्तेच्या वाढीमध्यें नेहमीं निरनिराळ्या प्रकारचें प्रतिरोधक निर्बंध व प्रतिबंध असावे व अशा निरनिराळ्या तऱ्हांच्या अनेक संस्थांचा फार तर एक (फेडरेशन किंवा) संघ असावा व असें झालें तरच जर्मनीमध्यें शांतता राहणें शक्य आहे. अर्थातच अशा जर्मनीमध्यें न्यायालयांसहि मोठी सत्ता असणें अवश्य आहे. अशा तऱ्हेनें जर्मनीमध्यें सत्तेचें कोणत्याहि एका ठिकाणीं केन्द्रीभवन न होतां ती निरनिराळ्या ठिकाणीं व निरनिराळ्या प्रकारच्या संस्थांमध्यें वांटली जाऊन तिचें पूर्णपणें विकेन्द्रीभवन व्हावें व या सर्व निरनिराळ्या संस्था व्यक्तिमत्त्वाच्या पायावर उभ्या राहून त्यांच्यामध्यें सत्तेकरितां परस्परांत नेहमीं स्पर्धा चालू राहावी व या सर्वांस योग्य न्याय व वाव मिळेल ही गोष्ट वरिष्ठ व बलिष्ठ न्याय-संस्थांनीं पाहत राहावी म्हणजे जर्मन मनोरचनेचें पूर्णपणें विघटन होऊन व परस्परांत स्पर्धा करण्यामध्यें त्यांचें मनोबल व कार्यशक्ति खर्च होत राहून त्यांच्यांतील आपसांतील सत्तेकरितां चुरस व चढाओढ यांमध्यें जर्मन जनतेनें एकसारखें गुंतून राहावें व तीपासून बाहेरच्या लोकांस उपसर्ग होण्याची भीति मुळींच राहूं नये किंबहुना आपलें घर संभाळण्यापलीकडे जर्मन लोकांस फुरसतच राहूं नये किंवा त्यांची दृष्टि बाहेरच्या देशांकडे वळण्याइतकी त्यांस उसंतच सांपडूं नये अशी या तीन मित्रराष्ट्रांची दृष्टि व कल्पना होती. अर्थात् त्यांची कल्पना अशी होती कीं जर्मनीमध्यें निरनिराळ्या लोकांच्या कल्पनांस व निरनिराळ्या लोकांच्या वैयक्तिक कार्यांस पूर्ण मोकळीक असावी; तसेंच जर्मनीमध्यें आंतल्या आंत मालाची देवघेव व ने-आण होण्यास पूर्ण मोकळीक असावी व अशा रीतीनें जर्मनीनें स्वपोषणास समर्थ होऊन स्वतःपुरतें स्वाभिमानी व शांतताप्रिय नागरिक बनावें. व अशा स्थितींतच ते जगांतील शांतताप्रिय नागरिक बनणें शक्य आहे. अशा तऱ्हेच्या या तीन मित्रराष्ट्रांच्या कल्पना होत्या. त्यांना यांपेक्षां निराळ्या प्रकारच्या गोष्टी जर्मनीमध्यें व्हावयास नको होत्या. त्यांस जर्मनीचें त्वरित औद्योगिक संवर्धन व्हावयास नको होतें. त्यांस जर्मनीमध्यें राजकीय किंवा आर्थिक सामर्थ्य एकवटून कोणत्याहि ठिकाणीं केन्द्रीभूत व्हावयास नको होतें. कारण अशा केन्द्रीभूत सत्तेमध्यें जो कोणी ती केन्द्रीभूत सत्ता काबीज करील तो एकदम बलिष्ठ होईल व अशा रीतीनें जर बर्लिनमध्यें सर्व सत्ता एकवटली तर जो बर्लिनवर सत्ता गाजवूं शकेल तो सर्व जर्मनी अंकित करूं शकेल. अशी शक्यता केव्हांहि निर्माण होऊं नये अशी या तीन मित्रराष्ट्रांची तीव्र इच्छा होती. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे जर्मनीमध्यें ऐक्य होणें त्यांस संमत नव्हतें. एका मुत्सद्द्यानें म्हटल्याप्रमाणें 'सर्व जर्मन अंडीं एका टोपलींत ठेवलीं जाणें' त्यांस नापसंत होतें. कारण जर्मन लोक किती झालें तरी सैनिकी मनोवृत्तीचे व युद्धप्रिय आहेत आणि आज त्यांच्या ठिकाणीं सूडाची भावना अत्यंत तीव्रतेनें जागृत झालेली असणें स्वाभाविक आहे. अशा परिस्थितींत जर त्यांच्यामध्यें राजकीय किंवा आर्थिक संघटना व ऐक्य किंवा सत्तेचें केन्द्रीकरण करण्यांत आलें तर त्यांस पुनः युद्धाची ऊर्मि आल्याशिवाय राहणार नाहीं व अशा तऱ्हेची संघटना झाल्यास साहजिकच त्यांस पुनः युद्ध करून आपली शक्ति आजमावण्याचा मोह उत्पन्न झाल्याशिवाय राहणार नाहीं व अशा वृत्तीचे लोक आजच्या जर्मनींत खात्रीनें आढळल्याशिवाय राहणार नाहींत. यावरोबरच जर्मनी हा प्रदेश म्हणजेच समाजवादी पक्षाची व मनोरचनेची युरोपमधील या क्षेत्रांत नवीनच पुढें आलेली व युरोपच्या शरीरांत घुसलेली एक शाखा व्हावी हेंहि या मित्रसंघांतील राष्ट्रांस इष्ट नव्हतें.

## पहिल्या महायुद्धानंतर व आतां

या मित्रसंघांतील राष्ट्रांस पहिल्या महायुद्धानंतर जर्मनीचा या बाबतींत एकदां चांगलाच व पूर्ण अनुभव आला होता. त्या वेळीं ज्या मित्रसंघानें जर्मनीचा पराभव केला होता तोच मित्रसंघ आज जर्मनीची चीरफाड करूं इच्छीत आहे. कारण त्या वेळीं पहिलें जागतिक महायुद्ध संपल्यानंतर या मित्रराष्ट्रांनींच पदरचे पैसे देऊन जर्मनीचें औद्योगिक संवर्धन केलें व स्वतः जर्मनीवर दडपण आणून जर्मनीमध्यें








राजकीय ऐक्य व संघटना निर्माण करून राजकीय सत्ता केंद्रीभूत केली. हें अर्थात् त्यांनीं कांहीं जर्मनीबद्दल वाटणाऱ्या प्रेमामुळें केलें नाहीं किंवा त्यांत जर्मन लोकांचें कल्याण आहे म्हणून भूतदयेनें प्रेरित होऊनहि केलें नाहीं, तर त्यांस त्या वेळीं असें वाटलें कीं अशा रीतीनें जर्मनीमध्यें व्यवस्था केल्याशिवाय जर्मनीकडून जी युद्धाबद्दल नुकसानभरपाई करून घ्यावयाची व जो पैसा उकळावयाचा तो पूर्णपणें उकळून घेतां येणार नाहीं. परंतु जरी या बाबतींत जर्मनीकडून मालाच्या रूपानें मित्रराष्ट्रांस आपली पुष्कळशी भरती करून घेतां आली तरी ही औद्योगिक व राजकीय संघटना व बलिष्ठता आयतीच हिटलरच्या उपयोगी पडली. आतां तीच वेळ पुन: आली आहे. सोव्हिएत संघास आज सर्व प्रकारच्या मालाची फार अवश्यकता आहे व ही मालाची भरपाई जर्मनीकडून करून घ्यावी अशी रशियास इच्छा असणें अगदीं स्वाभाविक आहे. जर्मन सैन्यांनीं त्याचा प्रदेश फार भयंकर रीतीनें व अगदीं पूर्णपणें उध्वस्त करून टाकला आहे. तेथील उद्योगधंदे वगैरे जर्मनांनीं पार मोडून टाकले होते. यामुळें व इतरहि कांहीं कारणांमुळें रशियाच्या आर्थिक गरजा आज फार मोठ्या प्रमाणावर वाढल्या असून अगदीं निकडीच्या झालेल्या आहेत. त्यामुळें जरी पहिल्या जागतिक युद्धानंतर केलेल्या व्यवस्थेमुळें पुढें दुसऱ्या जागतिक महायुद्धाचा धोका निर्माण झाला तरी तो धोकाहि पत्करण्यास रशिया आज तयार झालेला आहे. परंतु असा धोका पत्करण्यास आज फ्रान्स, ब्रिटन किंवा अमेरिका यांपैकीं कोणीहि तयार नाहीं.

## आजचा जर्मनीविषयक पेंचप्रसंग

या बाबतींत अजूनहि या चार मित्रराष्ट्रांचें कोणत्याहि गोष्टींत मतैक्य होत नाहीं. म्हणून जर्मनीमध्यें पुन: आर्थिक घडी बसविण्याचें कार्य लांबणीवर पडत चाललें आहे व जर्मनीचें लोढणें आज मित्रराष्ट्रांच्या गळ्यांत तसेंच लोंबत राहिलें आहे. जर्मनीचीं जीं चार शकलें पडलीं आहेत तीं तशींच आहेत. त्यांस सांधणारा कोणी कुशल शस्त्रवैद्य आज पुढें येऊं शकत नाहीं. ही वस्तुस्थिति चांगली नसून कोणाच्याहि हिताची नाहीं ही गोष्ट सर्वांसच पटली आहे. तसेंच ती जर्मन लोकांच्या बाबतींतहि अन्याय्य आहे हेंहि सर्व मित्रराष्ट्रांस मान्य आहे. विशेषत: जर्मनीच्या शेजारीं जीं फ्रान्स, हॉलंड, बेल्जियम हीं राष्ट्रें आहेत त्यांस व ब्रिटिश लोकांस सध्यांची ही जर्मनीची चीरफाड केलेली स्थिति फार अहितकारक आहे. त्या सर्वांस या ना त्या गोष्टीमुळें या परिस्थितीपासून नुकसान पोंचत आहे. जर्मनीच्या सध्यांच्या आर्थिक परिस्थितीचा या सर्व राष्ट्रांवर अनिष्ट परिणाम घडत आहे. त्यांस साहजिकच असें वाटत आहे कीं, ज्याअर्थीं जर्मनीनें युद्धास सुरुवात केली त्याअर्थीं या युद्धामुळें आमच्या राष्ट्रांवर जो असह्य बोजा आज येऊन पडला आहे त्याचा कांहीं भार जर्मनीवर लादला जाणें अवश्य आहे. अर्थात् सर्वच बोजा कांहीं आज जर्मनी घेऊं शकत नाहीं व तो त्याच्यावर लादला जाणेंहि शक्य नाहीं व या बोजाचा कांहीं भार शेजारी राष्ट्रांस आज सहन करावा लागतच आहे. परंतु जर्मनीवर जरी कितीहि आर्थिक किंवा इतर बोजा लादला गेला तरी एका बाबतींत मात्र या मित्रसंघालाच असें वाटत आहे कीं, इतर कांहींहि असलें तरी आज जर्मन प्रदेशावर एखादी दुर्बल, कमकुवत व असमर्थ राजकीय सत्ता जेत्यांकडून लादली जाणें केव्हांहि समर्थनीय होणार नाहीं येवढेंच नव्हे तर तें जेत्यांसहि अहितकारक झाल्याशिवाय राहणार नाहीं. आज या चार मित्रराष्ट्रांपैकीं खरोखर कोणाचीहि अशी इच्छा नाहीं किंवा कोणासहि असें वाटत नाहीं कीं, जर्मनीची आज केलेलीं चार शकलें अशींच चोहोंकडे चार कायमचीं राहावीं. उलट त्यांनीं यापूर्वीच असें अनेकवार घोषित केलें आहे कीं, निदान आतां जो जर्मनीचा प्रदेश राहिला आहे तो एका आर्थिक व राजकीय सत्तेमध्यें एकत्रित व्हावा. परंतु या बाबतींत या चार मित्रराष्ट्रांमध्यें मतैक्य होत नसल्यामुळें ती गोष्ट आज घडून येऊं शकत नाहीं.

आज जर्मन राष्ट्राची अशी चीरफाड झालेली आहे कीं त्या लोकांत किंवा राष्ट्रांत सर्वत्र एक अशी कांहीं राष्ट्रीय वृत्ति निर्माण होऊं शकत नाहीं.










अर्थात् आज जरी ती उत्पन्न झालेली नसली किंवा आपणांस दिसत नसली तरी ती लवकरच उत्पन्न झाल्याशिवाय किंवा आपल्या प्रत्ययास आल्याशिवाय राहणार नाहीं. परंतु जर्मन लोकांमध्यें ही जी राष्ट्रीय वृत्ति निर्माण व्हावयाची तिला जर योग्य वेळीं व इष्ट तो अवकाश दिला नाहीं तर ती इष्ट स्वरूपांत प्रादुर्भूत होण्याऐवजीं सर्वथा अनिष्ट स्वरूपांत मात्र प्रादुर्भूत होण्याचा संभव अधिक आहे ही गोष्ट व मित्रराष्ट्रें जर जर्मनांवर स्वतःसहि अयोग्य वाटणारे निर्बंध घालूं पाहतील किंवा त्यांस वळेंच विभक्त ठेवून त्यांस योग्य वागवणूक देणार नाहींत तर ती शतपटीनें अनिष्ट व भेसूर स्वरूप धारण केल्याशिवाय राहणार नाहीं ही गोष्ट मित्रराष्ट्रांनीं लक्ष्यांत घेणें अवश्य आहे.

## मित्रराष्ट्रांचे डावपेंच

अशा परिस्थितींतून कांहीं तरी मार्ग निघावा, निदान आपण कांहीं तरी करीत आहों असें दाखवावें म्हणून अमेरिका व इंग्लंड यांनीं व्यापलेला जर्मनीचा प्रदेश पुनः एकत्र करण्याचा या दोन राष्ट्रांनीं उपक्रम केला आहे व या एकत्र केलेल्या संघांत इतर व्याप्त प्रदेशांनीं सामील व्हावें असें त्यांस आमंत्रण दिलें आहे. तोंपर्यंत निदान या दोन शकलांचें तरी एकीकरण करून त्यांत पूर्ण ऐक्य स्थापन करण्याचा प्रयत्न अमेरिका व इंग्लंड हीं राष्ट्रें करीत आहेत व त्यांत त्यांस कितपत यश येतें तें पाहिलें पाहिजे. या दोन शकलांच्या संयुक्त प्रदेशांत रूहर या प्रांताचा समावेश होत आहे व हा प्रांत म्हणजे आज युरोपखंडाच्या आर्थिक शरीराच्या हृदयस्थानीं मानण्यांत येत आहे. कारण याच प्रदेशांत जर्मनींतील अतिशय संपन्न अशा खाणी मोडतात. परंतु आज त्या हृदयांतून सर्व शरीरास रक्ताचा पुरवठा होण्याऐवजीं केवळ स्पंदन मात्र चालू आहे.

अशा परिस्थितीमध्यें एकीकडे फ्रान्स, ब्रिटन व अमेरिका आणि दुसरीकडे रशिया यांमध्यें या जर्मन शिकारीची ओढाताण चालू आहे व दोन भावांनीं वांटून घेतलेल्या गाईप्रमाणें एकाकडे तोंड, डोकें वगैरे तर दुसऱ्याकडे कांस, शेपटी वगैरे भाग आला असून एकानें तोंडास अन्न पुरवावें तर दुसऱ्यास दूध मिळतें म्हणून ज्याकडे कांस आली तो दूध काढावयास बसला असतां दुसऱ्यानें डोक्यावर काठ्या मारून त्यास दुधाऐवजीं लाथा खावयास लावलें व अखेरीस गाईस निदान जगूं द्यावी कीं मरूं द्यावी असा ज्याप्रमाणें त्या भावांपुढें प्रश्न उत्पन्न झाला त्याप्रमाणें जर्मनी एकत्र संघटित होऊन व उत्पादनक्षम होऊन आपला आर्थिक भार सहन करण्यास व युद्धाच्या नुकसानभरपाईचा बोजा उचलण्यास समर्थ व्हावा अशी तर सर्वांचीच इच्छा आहे. शिकार पूर्णपणें आपल्या हातांत व कह्यांत यावी या दृष्टीनें दोघांचेहि डावपेंच चालू आहेत. रशियाला जर्मनी शक्य तितक्या लवकर कार्यक्षम होऊन आपणांस नुकसानभरपाई शक्य तितक्या तावडतोब देण्याच्या परिस्थितींत यावा पण तो आपल्या मतप्रणालीचा बनावा अशी इच्छा आहे व आपल्या प्रचारतंत्रानें व भेदक नीतीनें आपण त्यास पचवूं शकूं असें रशियास वाटत आहे व तें शक्य आहे अशी मित्रराष्ट्रांस भीति वाटत आहे; तेव्हां तसें होत असेल तर जर्मनी एक होण्याऐवजीं त्यांचीं शकलें राहिलीं तरी चालतील असें त्यांस वाटणें साहजिक आहे. उलट जर्मनीचें एकीकरण व्हावें पण तें पूर्णपणें आपल्या तंत्रानें व्हावें व जर्मनीचें आर्थिक यंत्र नेहमीं दुर्बल राहावें व त्यांचें उत्पादनक्षमत्व मर्यादित स्वरूपांत व नेहमीं आपल्या लगामीं असावें अशी मित्रराष्ट्रांची इच्छा आहे. याप्रमाणें या दोन मतप्रणालींमध्यें जर्मनीची कुतरओढ चालू आहे व फ्रान्स या दोन वृत्तींमध्यें कोणतीहि यशस्वी झाली तरी आपणांस कांहीं विशेष लाभ होईलसें वाटत नाहीं म्हणून दोघांच्या तोंडाकडे पाहत आहे. अशा परिस्थितींत अखेरीस कोण अधिक राजनीतिकुशल ठरतो व जर्मनीस आपल्या मतप्रणालींत येणें कसें हितावह आहे हें जर्मन लोकांस व जगास भासवूं शकतो तें लवकरच दिसेल व त्याप्रमाणें प्रथम उद्धृत केलेल्या महाभारतांतील कथेंतील कोणती भूमिका कोणाकडे येते हें पाहण्याचेंच काम आपणांस सध्यां करतां येणें शक्य आहे.











अनुक्रमणिका

# आचार्य क्षितिमोहन सेन ( एक परिचय )

श्री० जयंतीलाल आचार्य
अनुवादक—श्री० ना. ग. जोशी

[ श्री. जयंतीलाल आचार्य यांनीं दोन वर्षांपूर्वी स्फुट-रूपानें लिहिलेला हा परिचय आतां 'शिक्षणसाधना' नांवाच्या श्री० क्षितिमोहन सेनांच्या व्याख्यानग्रंथाला जोडलेला आहे. हीं व्याख्यानें मुळांत ( बंगाली–मिश्र ) हिंदींत लिहिलीं गेलीं व त्यावेळीं तेथें जीं गुजरातीमधून टिपणें घेतलीं होतीं त्यावरून अधिकृतपणें गुजरातींत प्रसिद्ध केलेलीं आहेत. हीं अन्यत्र अन्य भाषेंत प्रसिद्ध झालेलीं नाहींत परिचयाचा अनुवाद श्री० ना. ग. जोशी यांनीं गुजरातींतून केलेला आहे. का० सं० ]

मानवतत्त्व अति अद्‌भुत कोण कहे, कोण जाणे ?
मानवचरित अति विपरीत कोई ए विरला जाणे.
—विद्यापति

( १ )

आज पंधराएक वर्षें झालीं त्या गोष्टीला. सद्गत करुणाशंकरें त्या वेळीं कोसिन्द्रा गांवीं प्राचीन तऱ्हेनें आपला आश्रम चालवीत होते. तेथें जावयाचें व त्यांचा पाहुणा व्हावयाचें निमंत्रण मला आलें. कोसिन्द्र्याला जातांच बातमी कळली कीं, बंगालमधील एक विद्वान्, क्षितिबाबू, आले आहेत आणि म्हणून सर्वजण तेथून जवळच असलेल्या काशीपुरा गांवीं गेले आहेत. रात्रींचा मुक्काम कोसिन्द्र्याला करून सकाळीं लवकर उठून काशीपुऱ्याकडे कूच केलें. रस्ता हेरण नदीच्या कांठाकांठानें जात असल्यामुळें चालतांना खूप मजा येत होती. पुढें फेणाई मातेची टेकडी होती आणि दूरवर ताडांच्या राया दिसत होत्या. बोलतां बोलतां समजलें कीं, जिथें जिथें राई तिथें तिथें झोपडी असावयाचीच.

थंड वेळेला गप्पा मारीत मारीत आम्ही काशी-पुऱ्याला जाऊन पोंचलों. काशीपुरा गांवाजवळच नदीकांठीं वृक्षांची निबिड राई होती. पलीकडे ती टेकडी, इथें हेरण नदी आणि अलीकडे झाडांची राई. निसर्गाच्या अशा रमणीय हृदयांत आम्हीं प्रवेश केला, तों समोरच मानवसमूह दिसला. एका बाजूला उघड्या डोक्यांचे, धीरगंभीर मुखमुद्रा असलेले, शरीरानें स्थूल, नेत्रांतील तेजानें सूक्ष्म पारख करणारे ते बंगाली विद्वान् दिसले आणि

---

१ स्व० करुणाशंकर कुबेरजी भट्ट ऊर्फ करुणाशंकर मास्तर. यांचा महात्माजींनीं 'गुजरातचें रत्न' व 'आदर्श शिक्षक' म्हणून उल्लेख केलेला आहे. श्री० क्षितिबाबूंनीं वरील व्याख्यानें त्यांच्याच संस्थेंत झालीं व तीं त्यांनाच अर्पण केलीं आहेत. अर्पणपत्रिकेंत त्यांच्यासंबंधीं खालील उद्गार आहेतः —

'जे प्रवीण तापस शिक्षणाच्या यज्ञवेदीवर आपल्या चिरजीवनाचा उत्सर्ग करीत आले,

'ज्ञान व शिक्षण हींच ज्यांच्या जीवनाचें सर्वस्व आहेत आणि विद्यार्थी ज्यांचा प्राण आहेत,'

'ज्यांच्या प्रेरणेमुळेंच अयोग्य असतांहि हे दोनचार शब्द मी बोलूं शकलों,

'ते शिक्षणाचे गुरु प्रवीण तपस्वी' श्री० करुणाशंकर कुबेरजी भट्ट,

'त्यांच्या चरणीं माझ्या भक्तीचा हा सामान्य उपहार.'

दुसऱ्या बाजूला अबालवृद्ध तपस्वी मंडळी दिसली. आम्हीं एकाएकीं प्रवेश केल्यामुळें क्षणभर शांतता भंग पावली, मग पुनः प्रवचन सुरू झालें.

## क्षितिबाबूंचें पहिलें दर्शन

तसें म्हटलें तर (मी) मुंबई विश्वविद्यालयाचा स्नातक—पदवीधर आहें; चुनाविटांनीं पक्क्या बांधलेल्या मोठ्या कॉलेजांतील पक्क प्राध्यापकांचीं, परीक्षेच्या राजमार्गानें सरळ घेऊन जाणारीं, नियत व्याख्यानें ऐकलीं आहेत ! परंतु हें कांहीं तरी नवीनच वाटलें ! कविवर रवींद्रनाथांनीं लिहिलेल्या 'तासेर देश' ('पत्त्यांचा प्रदेश') नांवाच्या नाटकांत **नियमांप्रमाणें** चालणाऱ्या, वागणाऱ्या, अशा एका दलाचा उल्लेख आला आहे. तेथें एक परदेशी यात्रेकरी बाहेरून येऊन हळूहळू **इच्छेचें** साम्राज्य स्थापन करतो. माझी स्थिति याहून उलट म्हणजे इच्छेच्या प्रदेशांत प्रवेश करणाऱ्या त्या नियमबद्ध मानवासारखी झाली !

त्या बंगाली विद्वानांचें प्रवचन पुढें चालू झालें. त्यांच्या प्रवचनांत रवीन्द्रनाथांच्या बंगाली काव्यांचा उल्लेख येई, बाउलांच्या गोष्टी येत, वेदांतील मंत्रांचा उच्चार होई, कुमारसंभवांतील एखाद्या श्लोकाचें आवर्तन होई, उपनिषदांतील सूत्रें येत, कबीर, दादू वगैरे भक्तसंतांच्या भजनांचा उल्लेख होई; आणि केव्हांकेव्हां पोट धरधरून किंवा मिशींतल्या मिशींत हंसविणारा एखादा चुटका येई. अशा तऱ्हेनें त्यांच्या वाणीचा प्रवाह मृदुगंभीर भाव धारण करून वाहत होता. माझ्यासारख्या माणसाला तर त्यांच्या गोष्टीहि नव्याशाच वाटल्या. बरेंचसें समजत नव्हतें, पण कधींकधीं मन भरून येत असे. जणूं आपण कोणा ऋषींच्या बालकेंच आहों अशा प्रकारची भावना उत्पन्न होत असे. त्या वेळीं कसें कळणार कीं, ते थोड्याच दिवसांनन्तर माझे **रवीन्द्रसाहित्याचे दीक्षागुरु आणि संतसाहित्याचे शिक्षागुरु** होणार आहेत ? हें मला घडलेलें त्यांचें पहिलें दर्शन.

त्यानंतर अहमदाबादमध्यें सं० १९८६च्या 'काळ्या चतुर्दशी'च्या (नरकचतुर्दशीच्या) दिवशीं प्रार्थनासमाजमंदिरांत 'मजलिसे फिरुकान'च्या विद्यमानें 'गत वर्ष व नवें वर्ष' या विषयावर झालेलें त्यांचें व्याख्यान ऐकावयास गेलों होतों. तेथें पहिल्या प्रथम 'बीराचार' व 'पश्चाचार' हे शब्द माझ्या कानीं पडले. (कदाचित् गुजरातमध्येंहि ते प्रथमच उच्चारले गेले असावे.) 'प्रस्थान' मासिकाच्या त्या वेळेच्या संपादकांनीं (प्रो० रामनारायण-भाई पाठक—अनु०) क्षितिबाबूंविषयीं पुढीलप्रमाणें टीप लिहिली होती:—

"बाबू क्षितिमोहन सेन म्हणजे भारताचें जंगम ज्ञानतीर्थ होय. ...त्यांची प्रवचनशैली विलक्षण स्वैरविहारी आहे. वक्ता व श्रोता यांमध्यें साक्षात् संबंध आल्यावांचून तिची लेखनद्वारा कल्पना आणून देणें शक्य नाहीं. त्यांचे विनोदी चुटके, दृष्टांत, हेहि लिखाणांत पुरे आणणें शक्य नाहीं." (—'प्रस्थान', सं० १९८६, कार्तिक.)

हा त्यांचा माझा दुसरा मानसपरिचय.

त्यानंतर 'प्रस्थान'मध्यें दिलेलीं त्यांचीं शिक्षणविषयक प्रवचनें आणि चीन—जपानच्या यात्रेतील प्रसंगांचीं वर्णनें वाचलीं. त्या सुमारास परमश्रद्धेय स्व० करुणाशंकरांबरोबरचा माझा परिचयहि वाढत होता. क्षितिबाबूंविषयीं त्यांच्या तोंडून खूप गोष्टी ऐकल्या, रवीन्द्रनाथांच्या शांतिनिकेतनाविषयीं त्यांच्याकडून भावपूर्ण वर्णन ऐकलें. अशा तऱ्हेनें शांतिनिकेतनमध्यें जाण्याचीं गूढ बीजें माझ्या ठिकाणीं पेरलीं गेलीं.

## गुरुगृहींचे अनुभव—

सुमारें पासष्ठ वर्षांपूर्वी आचार्य क्षितिमोहन सेन यांचा जन्म झाला. त्यांचे आजोबा पूर्व बंगालमधील एक प्रसिद्ध नैयायिक होते. आपलें उरलेलें आयुष्य काशींत कंठण्यासाठीं ते गेले. पुढें पंचवीस वर्षें ते जगले. पूर्वबंगालमधील विक्रमपुर परगण्यांतील पयसा गांवचे प्रसिद्ध पीताम्बर विद्याभूषण यांचे ते शिष्य होते. अशी त्यांची ख्याति असल्यामुळें खूप आग्रह होऊन त्यांनीं काशींत अध्यापनाचें काम स्वीकारलें. त्यांचे चिरंजीव श्री० भुवनमोहन सेन हे काशींतील एक मोठे प्रसिद्ध चिकित्सक

होऊन गेले. आचार्यांच्या पितृकुलांत अनेक नैयायिक आणि चिकित्सक होऊन गेले आहेत. वरींच वर्षें त्यांच्या येथें पाठशाळा चाले आणि तेथेंच विद्यार्थी ख़ातपीत आणि शास्त्राध्ययन करीत. त्यांच्या मातृकुलांत मोठमोठे सरकारी अंमलदार होऊन गेले. अशा रीतीनें पूर्वबंगालमधील विक्रमपुरच्या प्रसिद्ध पंडितपरंपरेंत त्यांच्या वंशाला महत्त्वपूर्ण स्थान मिळालें आहे.

जगांतील अत्यंत प्राचीन आणि आजहि जिवंत असलेल्या अशा काशी नगरींत आचार्य सेनांचा जन्म झाला. त्या काळचे सुप्रसिद्ध विद्वान् महामहोपाध्याय पं० गंगाधरशास्त्री, महामहोपाध्याय पं० कैलासशिरोमणि आणि महामहोपाध्याय पं० सुधाकर द्विवेदी यांच्या अतिशय प्रिय विद्यार्थ्यांपैकीं तेहि एक होते.

ते स्वतः एके ठिकाणीं लिहितात, "बालपणीं काशींत आम्ही प्राचीन युगांतील गुरुंचे विद्यार्थी होतों. शिष्य गुरुंच्या स्वतःच्या मुलांप्रमाणेंच राहत हें मीं पाहिलें आहे. त्या वेळीं गुरु आणि शिष्य यांमधील किती गंभीर असा प्रेमाचा संबंध अनुभवावयास मिळाला!" त्या वेळच्या शिक्षणप्रथेची आणि गुरुचें असीम प्रेम, अपरिमेय ज्ञान आणि त्यांची अढळ कर्तव्यनिष्ठा यांची कल्पना यावी म्हणून त्यांनीं आपले गुरु गंगाधरशास्त्री यांविषयीं सांगितलेला एक प्रसंग पुढे दिला आहे:—

"जगत्प्रसिद्ध गंगाधरशास्त्र्यांचा एकुलता एक पुत्र ढुंढराज आमचा अंतरंगस्नेही होता. तो एकाएकीं आजारी पडला आणि वारला. आम्हांला कोणालाहि दाद नाहीं. शास्त्रीमहाशयांनीं रोजच्या क्रमाप्रमाणें शिकविलें, परंतु आम्हांला थोडेंसें अस्वस्थ वाटलें. आम्ही ढुंढराजला शोधायला निघालों, इतक्यांत शास्त्रीजींनीं आम्हांला पाहिलें आणि म्हटलें, 'तो आतां अशा ठिकाणीं गेला आहे कीं जिथें तुमचा आवाजहि पोंचणार नाहीं.' चटकन् कांहीं समजलें नाहीं. जेव्हां समजलें तेव्हां मी म्हणालों, 'मग आपण शिकवायचें बंद कां ठेवलें नाहीं?' त्यांनीं म्हटलें, 'बेटा, अनेक ठिकाणांहून शेंकडों विद्यार्थी येथें आले आहेत. त्यांचा वेळ नासायचा मला काय अधिकार? शोक माझ्या एकट्यासाठीं आहे, साधना सर्वांसाठीं आहे. तेव्हां या सर्वांच्या साधनेंत व्यत्यय आणण्याचा मला काय अधिकार?' त्यांची ही अढळ निष्ठा पाहून मी तर दिङ्मूढ होऊन गेलों.

"गुरुशिष्यांत त्या वेळीं जो स्नेह व जी श्रद्धा दिसली ती आतां कळणार नाहींत. एकदां गंगाधर शास्त्र्यांच्या घरीं आम्हीं अध्ययनासाठीं वाट पाहत बसलों होतों. शास्त्रीजी आंत होते. अशा वेळीं एक अपरिचित वृद्ध पंडित येऊन पोंचले. आम्हीं त्यांचा रीतीप्रमाणें आदरसत्कार केला. शास्त्रीजींनीं बाहेर आल्यावर त्यांना आपल्यापेक्षां वयोवृद्ध पाहून त्यांची पाद्यपूजा करण्याचा विचार केला. हें पाहून वृद्ध पंडित म्हणाले, 'थांबा, जरा एवढें ऐका, मग काय करायचें असेल तें करा. मी आपल्या पितृदेवांचा सतीर्थ आहें. एका राजाला धर्माचें शिक्षण द्यायची जबाबदारी स्वीकारल्यामुळें मला काशी सोडावी लागली. त्या वेळीं कित्येक ग्रंथ मीं अर्धेमुर्धे वाचले होते. बऱ्याच काळानंतर काशीस परत आलों आहें. गुरुपरंपरागत 'देशना' देण्याला पात्र असे आमच्यांत आपणच राहिलां आहां. म्हणून अर्धवट राहिलेले ते ग्रंथ समाप्त करावयास आलों आहें. तेव्हां गुरुबंधूंचे पुत्र असूनहि तुम्ही माझे भावी गुरु आहां. आतां तरी कळलें ना कीं पूजेची कांहीं जरुरी नाहीं?'

"शास्त्रीमहाशय म्हणाले, 'मी, बरेच दिवस झाले, पितृहीन आहें. आज माझें परम भाग्य आहे कीं माझ्या वडिलांचे गुरुबंधु आले आहेत. तेव्हां असा सुयोग मी कसा वाया घालवूं? आपण 'दर्शन' घेण्यास आलां आहां; तेव्हां आपला स्वीकार होणार नाही हें शक्यच नाहीं. माझी आपणाला अशी विनंति आहे कीं तीन दिवस आपण सत्कार स्वीकारावा आणि त्यानंतर आपणाला वाटेल तसें करावें.'

"तीन दिवस त्यांचा आदरसत्कार झाला. चौथ्या दिवशीं ते अतिथि, दर्भ वगैरे घेऊन इतर शिष्यांबरोबर शिकावयाला येऊन बसले आणि पाठ संपल्या-












वर त्यांनीं साष्टांगप्रणामपूर्वक निरोप घेतला. श्रद्धेचें तें अनुपम चित्र माझ्या चित्तांत कायमचें कोरलें गेलें आहे. श्रद्धा हाच आपल्या देशाच्या साधनेचा प्राण आहे. गुरुशिष्यांमध्यें सुयोग साधणारी मर्मवस्तु ही श्रद्धाच होय."

याशिवाय काशींतील क्वीन्स् कॉलेजमधून एम्. ए. व शास्त्री ह्या पदव्या आचार्यश्रींनीं आपल्या वयाच्या एकोणिसाव्या वर्षी प्राप्त केल्या होत्या. त्या वेळीं त्या कॉलेजचे आचार्य सुप्रसिद्ध प्राच्य-विद्याविशारद डॉ० व्हेनिस हे होते. डॉ० व्हेनिसांचें क्षितिबाबू हे विद्यार्थी होते. विद्याभ्यास पुरा झाल्यावर डॉ० व्हेनिसांच्या संमतीनें आचार्य सेन हिमालयांतील चंबा नांवाच्या राज्यांत शिक्षण—विभागाचे प्रमुख नेमले गेले.

## " अज्ञाताची बांसरी "

आचार्य सेन यांच्या ठायीं लहानपणापसून संत-साहित्याची गोडी उत्पन्न झाली होती. म.म० सुधाकर द्विवेदींच्या सत्संगामुळें त्यांच्या या गोडीला विशेष अभिसिंचन प्राप्त झालें. ते स्वतः एके ठिकाणीं लिहितात, " इ. स. १८९५त आपल्या देशांतील निरक्षर थरांत गुप्त असलेलें ऐश्वर्य माझ्या नजरेस आलें. यानंतर विद्येचें आणि पोथ्यांचें सुसज्ज मंदिर सोडून मी सोन्याच्या कणांसाठीं धूळ धुणाऱ्याचें जीवन कंठूं लागलों. मला आतां छापलेल्या गोष्टी गौण वाटत होत्या. अर्थातच सांसारिक आधाराच्या दृष्टीनें पोथीचीं पानें साफ सोडूं शकलों नाहीं, पण अंतरंगांतली रसधारा तेव्हांपासून कुठल्या तरी अन्य मार्गानें वाहूं लागली. त्यानंतर ज्या सर्व निरक्षर आउलबाउल वगैरे लोकांबरोबर मला हिंडाफिरावें लागलें त्यांना मीं ही माझ्या दुःखाची गोष्ट वारंवार सांगितली आहे. माझ्या बाह्यान्तर द्वन्द्वाचें हें निवेदन त्यांच्यापुढें करतांच त्यांनीं हंसून सांगितलें, ' आमचें स्वतःचें द्वन्द्व बरोबर तुमच्यासारखें नसतांनाहि आंतून आणि बाहेरून त्याच्यांत एक असें अनैक्य, एक वेगळा भाव आम्हांला माहीत आहे. तोच आमचा परकीय भाव. सांसारिक दृष्टीनें जे राधेचे स्वामी आहेत ते काय राधेच्या जीवनांतलि सगळी व्याकुळता नाहींशी करूं शकत असतील? ज्याच्या बांसरीनें तिला व्याकुळ करून टाकलें त्याची प्राप्ति करून घेतलीच पाहिजे. बाबा, दुनियेंत सर्वत्र दिसून येईल कीं खातांपितांना, चालतांफिरतांना संसाराचा आश्रय घेतल्याबांचून भागत नाहीं; अन् तरीहि त्या अज्ञाताच्या बांसरीनें सर्वांचीच मनें बावरीं करून सोडलीं आहेत. त्याच्या प्राप्तीवांचून संसारांतलि सर्व काम, सर्व जीवन नीरस वाटतें.''

इ. स. १९२९त कलकत्त्यांत 'अधर मुकर्जी' व्याख्यानमालेंत दिलेल्या 'भारतीय मध्ययुगांतील साधनेची धारा' नांवाच्या व्याख्यानांच्या प्रस्तावनेंत त्यांनीं स्वतः पुढीलप्रमाणें नमूद केलें आहे:— " लहानपणीं काशीमध्यें अनेक संप्रदायांच्या साधुसंतांबरोबर परिचय झाला त्याला पस्तीस वर्षे होऊन गेलीं. या पुरातन साधकांची साधना आणि वाणी या इतक्या उदार, गंभीर व मनोहर वाटल्या कीं येवढ्या लहान वयांतहि मला त्यांचा कैफ चढला. त्यानंतर लिहिण्यावाचण्याच्या काळांतहि या वाणीच्या परिचयांतच माझा बराचसा वेळ जाऊं लागला. सुदैवानें त्या वेळीं कित्येक अशा मार्गदर्शकांची कृपा लाभली कीं तसे लोक भेटणें आतां काठिण झालें आहे. मुंबईंत सान्ताक्रूझ येथें राहणारे भावनगरांतील लाखनका गांवचे रहिवासी वृद्ध साधु

---

१ आचार्यश्रींची एकंदर ग्रंथ-संपत्ति पुढीलप्रमाणें आहे:—
बंगाली : " कबीर " भाग १-४ ( अप्राप्य ), " दादू ", " भारताची संस्कृति ", " बंगालची साधना ", " भारतीय मध्ययुगांतील साधनेची धारा ".
हिंदी : " भारतवर्षमें जातिभेद ".
इंग्रजी : Medieval Mysticism in India.
गुजराती : " चीनजपानची यात्रा " " तंत्रनी साधना ", ( हा वरील व्याख्यानांचाच शेवटचा भाग असून स्वतंत्र छापला आहे. )








# आचार्य क्षितिमोहन सेन

बाबा मोहनदास आतां दिवंगत झाले आहेत. त्यांच्या तोंडीं तीन हजारांहूनहि जास्त भजनें होतीं. आजूबाजूच्या इतर संतवाणीला तर अंतच नव्हता. ''

## शांतिनिकेतनांत

एकदां एक उच्च दर्जाची सरकारी नोकरी स्वीकारण्यास आचार्य सेन निघाले होते. तेवढ्यांत त्यांना कविवर्य रवीन्द्रनाथांकडून विश्वभारतींत काम करावयाला येण्याचें आमंत्रण आलें. हें आमंत्रण त्यांनीं स्वीकारलें व ते इ. स. १९०८मध्यें शांतिनिकेतनला जाऊन मिळाले.

वर उल्लेखिलेल्या पुस्तकांतील निवेदनांत पुढें आचार्य सेन लिहितात, " शांतिनिकेतनशीं जोडला गेलों तरी प्रत्येक सुटीचा उपयोग मीं माझ्या प्रिय विषयाच्या अनुसंधानानेंच केला. बराच काळपर्यंत माझ्या या वेडेपणाची गोष्ट मीं कोणालाहि कळवली नव्हती. एकदां कसा कोणाला माहीत पण कविवर्य रवीन्द्रनाथांना त्याचा वास लागला. त्यानंतर ते मला या विषयावर लिहावयास सांगूं लागले. सुरुवातसुरुवातीला या विषयासंबंधीं सर्वांना माहिती द्यावयाचा मला संकोच वाटत होता. ... कबीराच्या मुख्य रचनेचे फक्त चार खंड इन्डियन प्रेसतर्फे प्रकट झाले. असे दहा खंड झाले असते तर कबीराचा कांहींसा परिचय करून देतां आला असता. मध्ययुगांतील अशा जवळजवळ दोनशें साधकांचा तलास लागला. त्यांच्या वाङ्मयाचें मानवसाधनेच्या मार्गाला अनेक रीतींनीं साह्य होईल. क्षेत्र विशाल आहे, पण काम करणारे कोठें आहेत ? या दिशेनें काम करण्याची खरी गोडी कोणाला आहे ? ''

## कविवर्यांचे ' सुहृद्वर '

अशा रीतीनें आपण वर पाहिलेंच कीं, आचार्य क्षितिमोहन सेन यांचीं या कार्यांत पन्नास वर्षे गेलीं. येथें हें लक्षांत ठेवणें अगत्याचें आहे, कीं ते आपल्या कार्यांत फक्त पुस्तकांवर अवलंबून राहिले नाहींत. त्यांनीं भरतवर्षांतील अनेक तीर्थक्षेत्रांत, गुप्त स्थानांत, पहाडांत, गुहांत, वाळवंटांत, खेडेगांवांत पायीं प्रवास केला आहे. आपल्या संशोधनाचे विषय अशा संतभक्तांनीं कोठें निवास केला, कोठें प्रवास केला इत्यादि माहिती मिळवून तेथें तेथें प्रत्यक्ष जाऊन त्यांनीं ज्ञानाचा संचय केला. हीं सर्व वर्णनें, त्याचप्रमाणें इतर अनेक विषयांचें त्यांच्या मुखांतून होणारें सहज, सरळ विवेचन जर बॉस्वेल किंवा एकरमन यासारखा कोणी टिपून ठेवील तर एक मोठेंच ज्ञानभांडार लोकांना मिळूं शकेल.

आज ते शांतिनिकेतनांतील विद्याभवनाचे ( संशोधनविभागाचे ) आचार्य आहेत आणि कविवर्य रवीन्द्रनाथांच्या देहावसानापासून विश्वभारतीच्या मूळ भावनेचे संरक्षक आहेत. कित्येक वर्षे त्यांनीं कविवर्यांबरोबर सकाळच्या प्रहरीं खूप गप्पागोष्टी केल्या आहेत. बंगालमधील मोठमोठे विद्वान् त्यांच्या लेखणींतून रवीन्द्रनाथांविषयीं कांहीं तरी निघेल म्हणून वाट पाहत राहिले आहेत. कविवर्यांत बाउलांविषयीं गोडी उत्पन्न करणाऱ्या कबीर, दादू, रज्जब, रामानंद वगैरेंच्या संतवाणीची रसथाळी वाढणारे आचार्य सेन होत. म्हणूनच कविवर्यांनीं आपल्या ''मानवधर्म''विषयक व्याख्यानांत आचार्य सेन यांचा ' भारतीय मध्ययुगाच्या कविस्मृतींचें भांडार ' असा, तसेंच ' सुहृद्वर ' असा उल्लेख आपुलकीनें केला आहे.

## अनेकविध आठवणी

आचार्य सेनांच्या आठवणी अनेकविध आहेत. त्या सर्व नमूद केल्यास एक लहानसें पुस्तकच होईल. येथें त्यांचीं कांहीं वैशिष्ट्यें सांगून परिचय पुरा करूं या.

सर्वांत अद्भुत गोष्ट म्हणजे त्यांची स्मरणशक्ति होय. ते जेथें जेथें गेले असतील तेथील सर्व माहिती त्यांना असते आणि सगळ्या परिवाराचीं नांवें त्यांच्या ध्यानीं असतात. तुम्ही अनेक वर्षांनीं भेटला, तरीहि तेवढ्याच ताजेपणानें ते सर्वांचीं नांवें घेऊन कुशल विचारतात. मी तेथें असतां त्यांना भेटावयाला एक चिनी (कीं जपानी?) गृहस्थ आले. त्यांच्याबरोबर गप्पा चालल्या असतां ते स्वतः गुरुदेव रवीन्द्रनाथाबरोबर एकदां चीन-जपानला गेल्याची गोष्ट निघाली. बोलतां बोलतां त्यांनीं सर्व स्टेशनांचीं नांवें








घेतलीं. तो मनुष्य तर गुंग होऊन गेला व म्हणाला, 'मलाहि हीं सर्व नांवें आठवत नाहींत !' एकदां द्वारकेचे एक प्रसिद्ध गृहस्थ शांतिनिकेतनला आले होते. ते क्षितिबाबूंना भेटावयाला आले. क्षितिबाबूंनीं त्यांना सर्व हकीकत विचारुन मग ते स्वतः पीपा भगताच्या शोधार्थ कोठें कोठें गेले होते आणि द्वारकेंतील कोठलीं कोठलीं स्थळें त्यांनीं पाहिलीं होतीं हें सर्व सांगितलें, तेव्हां ते गृहस्थ म्हणूं लागले, 'बाबूजी, माफ करा. मी द्वारकेचा राहणारा; पण मीहि यापैकीं बरेंचसें पाहिलेलें नाहीं. मलाहि आपणांकडून नवीन माहिती मिळत आहे.'

युरोपला येण्यासाठीं त्यांना प्रो० सिल्वां लेवी, सी. एफ. ॲन्ड्रयूझ, तसेंच इटालियन कॉन्सल जनरल यांच्याकडून आमंत्रण आलें होतें; पण त्यांनीं तें स्वीकारलें नाहीं. इटालियन कॉन्सलबरोबर झालेल्या वार्तालापाच्या वेळीं मी स्वतःहि हजर होतों. आचार्यश्रींनीं सांगितलें, 'भगवन्ताची इच्छा असली, तर तेथील संतांचा हमदर्दी (सहभावी) होऊन त्यांच्यासारखा होऊन येईन.'

मी शांतिनिकेतनमध्यें होतों तेव्हां ते स्वतः रवीन्द्रसाहित्याचा वर्ग घेत. त्याला शाळेंतील मुलें, कॉलेजांतील तरुण, उगवते कवि, तेथील प्राध्यापक वगैरे येत असत. या सर्वांना उद्देशून ते अशा तऱ्हेनें वर्ग चालवीत कीं प्रत्येकाला गोडी वाटावी, नवीन माहिती मिळावी आणि मूळ काव्य त्यांच्या भूमिकेमुळेंच आपोआप स्पष्ट व्हावें. अत्यंत गंभीर गोष्टींना एकदम गंमतीचें स्वरुप देऊन त्या ते मनांत ठसवीत असत. एकदां गुरुदेवांचें एक उत्तम काव्य शिकवावयाचें होतें. क्षितिबाबूंनीं भूमिकेंत सांगितलें, "कित्येक काव्यें सिगारेटप्रमाणें फुंकून फुंकून फेंकून द्यावयाचीं असतात, कित्येक गांजाप्रमाणें मळावयाचीं असतात. काव्य प्याल्यावर त्याची नशा चढली पाहिजे ". त्या दिवशीं त्यांनीं काव्य वाचून दाखवून वर्ग थांबविला आणि ते कोठें तरी फिरावयास निघून गेले.

त्यांचे विनोद, हास्य, नर्म, कटाक्ष (वक्रोक्ति), श्लेष वगैरेंचे दृष्टान्त अपार आहेत. सद्गत करुणाशंकर यांना ते म्हणत, 'तुमचें आतिथ्य म्हणजे ताटावरुन अंथरुणांत नि अंथरुणांतून ताटावर.' एकदां सकाळचे माझ्या घरीं येऊन माझ्या आईला ते म्हणूं लागले, 'मा, आज रविवार ना ? तेव्हां आदितवारच्या न्हाव्याप्रमाणें सगळीकडे तासडपट्टिl निघालों आहें.' कोठें जेवावयास जावयाचें असलें तर ते फार काळजी घेत. असें असूनहि कोणी प्रेमानें आग्रह करूं लागलें तर खात, पण अतिरेक झाल्यास म्हणत, 'हें पडून राह्यला नको असेल तर मी पडून राहीन, दुसरें काय ?' यामुळेंच त्यांना बंगाल्यांत 'ठाकुरदा' म्हणून पुष्कळजण ओळखतात. त्यांच्याबद्दलचा पूज्यभाव, प्रेमभाव व सहजभाव यांच्या योगें त्यांना हें बिरुद मिळालें आहे.

एकदां ते गुरुदेवांबरोबर आगगाडींतून प्रवास करीत होते. त्यांनीं पाहिलें तों गुरुदेवांना कोणा काव्याची प्रेरणा होत असल्यासारखें वाटलें. म्हणून आपण हळूच शौचकूपाच्या खोलींत निघून गेले. गुरुदेवांनीं काव्य पुरें केलें. क्षितिबाबू बाहेर आले, तसें गुरुदेव म्हणतात, 'क्षितिबाबू, तुम्ही कोठें होतां ? आतांच या काव्याची प्रसूति झाली.' क्षितिबाबू म्हणतात, 'पण गुरुदेव, प्रसूतीच्या वेळीं कोणी पुरुष माणूस थोडेंच हजर राहणार ?' दोघेहि हसूं लागले.

कोणाला कोठें जावयाचें असलें तर त्याला त्यांच्याकडून रेल्वेच्या टाइमटेबलापासून जागोजागची तपशीलवार माहिती आणि निरनिराळ्या दृष्टींनीं पाहण्यासारख्या गोष्टी, आपल्या अनुभवाच्या कित्येक व्यावहारिक सूचना, अशी कांहींना कांहीं माहिती मिळत असे. आपल्या दैनंदिन जीवनांतील गोंधळ व अडचणी दूर होतील असें पुष्कळ मार्गदर्शन व व्यावहारिक उपाय, हीं आपणांस त्यांच्याकडून मिळण्यासारखीं असत म्हणूनच ते अनेकांना एकाच वेळीं मित्र, मार्गदर्शक आणि गुरू यांसारखे वाटत असत.

आपल्या देशांतील दारिद्य, आपल्यांतील गुरुशिष्यांतील सच्च्या भावाचा होत चाललेला ऱ्हास, आपल्या खोट्या समजुती, अज्ञान, संस्कारहीनता, मानवांमानवांतील सहयोगाचा अभाव, भाषेच्या प्रश्नाचा एकांगी खल, सुकून जाणारी मातृभावना,










शिक्षणाच्या नांवाखालीं पसरणारें अज्ञान, संसारांतून कंटाळून पळून जाण्यासाठीं तडफडणारीं साधुहृदयें, भारतीय संस्कृतीचीं सनातन तत्त्वें, अशा अनेक गोष्टींबद्दलचें त्यांच्या अंतरंगांतील दुःख व खोल वेदना पाहण्याचा ज्यांना प्रसंग आला असेल त्यांनाच त्यांच्या यांबद्दलच्या भावनेच्या संस्पर्शाची जाणीव होऊं शकेल. अशा प्रसंगीं ते गप्पागोष्टी करीत असतां ऐकणें ही एक सुदैवाची गोष्ट म्हटली पाहिजे.

सर्वांहून जास्त अन्तर्गत व गूढ अशी त्यांची 'मनाच्या मानवां'ची विरहवेदना आहे. ते जेव्हां एखाद्या भक्ताच्या किंवा संताच्या विरहवेदनेची गोष्ट सांगत असतात, किंवा गुरुदेवांचें एकादें असीम नि सीमाबद्ध यांमधील द्वन्द्वांमुळें उत्पन्न होणाऱ्या दुःखाचें दर्शन असलेलें काव्य किंवा गान याविषयींचा प्रसंग निघाला असतां एकादें बाउलगान गात असतात, तेव्हां त्यांच्या अंतःकरणाचा तो उद्रेक आपोआप प्रकट होई. त्यांच्या महानुभावित्वाला पात्र होणें म्हणजे सुद्धां एक 'जीवनाची कृतार्थता'च म्हटली पाहिजे.

आज त्यांचा यथाशक्ति व यथार्थ परिचय करून द्यावयाचा हा नम्र प्रयत्न करतांना त्यांची चिन्मय मूर्ति माझ्या मानसलोकांत खडी होत आहे. आज जेव्हां मी हें लिहीत आहें तेव्हां ते स्वतः शांतिनिकेतनांतील विद्याभवनाच्या एकाद्या कोपऱ्यांत कांहीं तरी लिहीत किंवा वाचीत असतील. येथें बसल्याबसल्या त्यांना माझ्या अंतरींचीं वंदनें मी अर्पण करीत आहें.

---

### हिंदी संस्कृति

" भारतीयांच्या युगानुयुगें चालत आलेल्या नैतिक विचारांमधील एक मौलिक सिद्धांत म्हणजे भारताची एकात्मता; आणि भारतीयांच्या विचारांची ओढ जर कोणत्या एका गोष्टीकडे असेल तर ती म्हणजे संघटित अशी मध्यवर्ती शासनसंस्था. भारताचीं दोन शकलें होऊन दोन राज्यें होणें—व तींहि अशीं कीं, एका राज्याचा नागरिक तो दुसऱ्या राज्याचा नागरिक असूंच शकत नाहीं—आणि केवळ धार्मिक आणि जातीय पायांवर दोन राज्यें स्थापण्याचा आसुरी प्रकार ( Monstrosity ) घडून येणें, या गोष्टी आमच्या भारतभूमीच्या इतिहासाला कधींहि माहीत नव्हत्या. ...... भारताचें पुनः ऐक्य करणें हें आपलें एक मुख्य ध्येय असलें पाहिजे. आणि इतिहासापासून जर आपणांस धडा घ्यावयाचा असेल तर तो शान्ततेच्या मार्गानेंच तें ऐक्य घडवून आणलें पाहिजे हा होय. हल्लींच्या काळीं अत्याचारानें प्रश्न सुटण्यापेक्षां ते अधिकच बिकट होत आहेत. एक शांतता किंवा मृत्यु याशिवाय दुसरा मार्ग नाहीं. ...... धार्मिक छळ करणें हें आम्हां भारतीयांच्या प्रकृतीच्या अगदीं विरुद्ध आहे. आज असा एक राष्ट्रीय समाज निर्माण होणें जरूर आहे कीं त्यामध्यें निरनिराळ्या जुन्या सांस्कृतिक घटकांतील जें जें उत्तमोत्तम असेल तें तें उतरून एका नव्या हिंदी संस्कृतीची निर्मिति व विकास होईल. " —प्रो० महमद हबीब, अध्यक्ष, हिन्दी इतिहासपरिषद्, डिसेंबर १९४७.










# दुसरें जागतिक महायुद्ध व हिंदी शेतकऱ्यांचें कर्ज

प्रा० वसंत परांजपे एम्. ए.

जगांतील सर्व शेतकीप्रधान देशांतील लहान शेतकरी थोड्याफार प्रमाणांत कर्जाच्या ओझ्याखालीं सांपडलेला असतो, ही गोष्ट अर्थशास्त्रज्ञांच्या लक्षांत अनेक वर्षांपासून आलेली आहे. शेतकऱ्याजवळ पुरेसें भांडवल नसतें व बहुतेक भांडवल शेतीचीं अवजारें, बीबियाणें व शेतकऱ्याची व जित्रापाची खावटी ह्यांत गुंतल्यामुळें व शेतींतील पेरणी व कापणी ह्यांदरम्यान बराच कालावधि असल्यामुळें शेतकऱ्यास सावकाराचें घर बघावें लागतें; शेतकऱ्याला कमी व्याजाच्या दरानें कर्ज मिळवून देण्याकरतां सरकारनें अनेक उपाय योजले तरी, शेतकीचा मूलभूत प्रश्न तसाच आहे. शेतकऱ्याला शेतीपासून होणारें 'आय' व 'व्यय' ह्यांत तफावत आहे तोंपर्यंत हें कर्ज शेतकऱ्याच्या पाठीवर तसेंच राहणार हें स्पष्ट आहे. बदलत्या आर्थिक स्थितीप्रमाणें ह्या कर्जाच्या बोजांत चढउतार होत असतो; पण हा चढउतार साधारण मामुली स्वरूपाचाच असतो. पण दुसऱ्या महायुद्धानें झालेल्या चलनवाढीमुळें किंमतीचें मान चढत्या कमानींत होतें त्यामुळें शेतकऱ्याचा फायदाच झाला व त्यामुळें त्यानें आपलें कर्ज बऱ्याच प्रमाणांत वारलें असलें पाहिजे, अशी जी सर्वसाधारण समजूत आहे, ती कितपत खरी आहे हें पडताळून पाहणें हा ह्या लेखाचा उद्देश आहे.

## शेतकरीसमाजाची दुःस्थिति

Central Banking Enquiry Committee (1930)च्या अंदाजाप्रमाणें हिंदी शेतकऱ्यांचें कर्ज रु. ९०० कोटींच्या घरांत १९३० सालीं होतें. पण १९२९पासून आर्थिक मंदीची लाट उसळली व त्यामुळें शेतींत उत्पन्न होणाऱ्या मालाच्या किंमती घसरगुंडीला लागल्या. जसजशा किंमती उतरूं लागतात, तसतसा प्रत्येक शेतकरी आपल्या उत्पादनांत वाढ करण्याचा प्रयत्न करूं लागतो; कारण, किंमत कमी झाली असतां उत्पादन वाढवून आपला आदा कायम ठेवणें येवढाच मार्ग त्यास माहीत असतो; परंतु प्रत्येक शेतकऱ्यानें अशा प्रकारें उत्पादन वाढविल्यास एकंदर पुरवठ्यांत भरमसाट वाढ होऊन किंमती आणखी घसरगुंडीस लागतात व उत्पादनवाढ व किंमती ह्यांचा पाठशिवणीचा खेळ सुरू होऊन हा खेळ थांबविणें कठिण होऊन बसतें. हिंदुस्थानांत उत्पादनवाढीस फारसा वाव नसल्यामुळें अशा प्रकारची घसरगुंडी येथें झाली असेल, असें प्रथमदर्शनीं वाटत नाहीं; परंतु जरी हिंदुस्थानांत ह्या प्रकारची उत्पादनवाढ झाली नाहीं, तरी ती इतर देशांत झाली होती व त्याचा परिणाम म्हणून इतर देशांत तयार झालेला माल हिंदुस्थानांत आयात झाल्यावरोवर येथील किंमतीचें मान उतरणें क्रमप्राप्त झालें. ह्या जागतिक चढाओढीचा परिणाम पुढील गोष्टींवरून दिसून येईल. साखरेच्या धंद्याला संरक्षण देण्याकरितां नेमलेल्या टॅरिफ बोर्डानें उंसाचा ४ आणे मण हा भाव सुद्धां शेतकऱ्याला फायदेशीर नाहीं, असें सिद्ध केलें असतांना युक्तप्रांतांत व बिहारमध्यें १९३७ सालीं ऊंस २ आणे मण ह्या मातीमोल किंमतीनें विकला जात होता! युक्तप्रांत व बिहार येथील सरकारांना उंसाचें उत्पादनक्षेत्र सक्तीनें नियंत्रित करावें लागलें! ज्यूट, कापूस वगैरेंची स्थितिहि वरीलप्रमाणेंच होती.







# दुसरें जागतिक महायुद्ध व हिंदी शेतकऱ्यांचें कर्ज

बंगाल प्रांतांत करण्यांत आलेल्या एका कुटुंबाच्या आर्थिक पाहणींत पुढील गोष्टी आढळून आल्याः—

| वर्ष | आय | व्यय | कर्ज (पूर्वीचें कर्ज धरून) |
|---|---|---|---|
| १९२८ | रु. २१८ | रु. २१७ | रु. ११२ |
| १९३३ | रु. ११४ | रु. १३६ | रु. १८७ |

वरील कुटुंबाचें उत्पन्न, खर्च व कर्ज हीं प्रातिनिधिक मानलीं तर एकंदर शेतकरीसमाजाच्या दुःस्थितीची कल्पना येऊं शकेल.

वरील बोजा हा फक्त पैशांत मोजमाप केलें असतां झालेली कर्जवाढ दर्शवितो. पण कर्जाच्या 'खऱ्या' बोज्यांत होणार असलेली वाढ शेतकऱ्यास किती जाचक होत असेल, हें पुढील उदाहरणावरून दिसून येईलः— तांदूळ रुपयाला १२ शेर असतांना शेतकऱ्यानें रु. १०० कर्ज काढलें असलें, तर त्यानें १२०० शेर तांदूळ कर्ज घेतलें असें समजतां येईल. परंतु कर्ज फेडण्याच्या वेळीं तांदूळ रुपयाला २४ शेर असल्यास तो रु. १००च परत करतो, असें दिसतें. परंतु पैशाचा बुरखा दूर केला असतां असें कळून येतें कीं शेतकऱ्यानें कर्ज घेतांना १२०० शेर घेतले, पण कर्ज फेडतांना मात्र २४०० शेर परत केले.

'खरा' बोजा पैशांत मोजतां येत नाहीं, म्हणून तो नसतोच असें म्हणणें चूक आहे; खरा बोजा विचारांत घेऊन व त्याचें अंदाजें पैशांत मूल्यमापन करून अर्थशास्त्रज्ञांनीं हा कर्जाचा बोजा १९२९ ते १९३३ ह्या कालावधींत रु. १२०० कोटींपर्यंत पोहोंचला असला पाहिजे, असें ठरविलें होतें. युद्धानें वरील परिस्थितींत कोणते फेरफार घडवून आणले असतील हें पाहणें योग्य ठरेल.

## पैशाच्या पुरांतहि शेतकरी कोरडाच

युद्ध सुरू झाल्याबरोबर किंमतींत तेजी आली. पण ती फक्त पहिले सहासात महिनेच टिकूं शकली व तिचा फायदा सामान्य शेतकरीवर्गाला न मिळतां मध्यस्थ दलालांच्या खिशांत पडला; शिवाय कित्येक पदार्थांचें (उदाहरणार्थ, भुईमूग) गिऱ्हाईक शत्रुराष्ट्र असल्यामुळें तें तुटलें व त्या पदार्थांवरती नवीन गिऱ्हाईक शोधणें किंवा देशांतर्गत दुसरे उपयोग शोधणें, हे विकट प्रश्न निर्माण झाले.

किंमती खऱ्या चढणीस लागल्या त्या १९४१ डिसेंबरनंतर, जपानी युद्धाची सुरुवात झाल्यानंतर. तरीहि हिंदुस्तानांतील आंखूड धाग्याचें कापसाचें मुख्य गिऱ्हाईक जपान असल्यामुळें जपान शत्रुराष्ट्र ठरल्याबरोबर आंखूड धाग्याचा कापूस हा 'पोरका' ठरला व कापसावर अवलंबून असणाऱ्या शेतकऱ्यांचें अपरिमित नुकसान झालें.

वरील सर्व विवेचनाचा निष्कर्ष येवढाच कीं शेतीवरच अवलंबून असलेल्या सर्वच शेतकऱ्यांचा फायदा झाला असें समजणें चुकीचें ठरेल.

प्रत्येक शेतकरी त्याच्या सर्व गरजा भागविण्याच्या दृष्टीनें स्वयंपूर्ण नसतो. कापडचोपड, औताला लागणारें सामान व इतर अनेक वस्तू त्याला विकत घ्याव्या लागतात. युद्धकालीन किंमतीची वाढ ही सर्व आर्थिक विभागांत—शेतींत तशीच पक्का माल तयार करणाऱ्या धंद्यांतहि—झालेली असल्यामुळें शेतकऱ्यांच्या हातांत वाढलेल्या किंमतींमुळें आलेली क्रयशक्ति ही त्यांना विकत घ्याव्या लागणाऱ्या मालाच्या चढत्या किंमतीमुळें त्यांच्या हातांतून केव्हांच निसटून जाते. येवढा मोठा पैशाचा पूर त्याच्या अंगावरून जाऊनहि तो कोरडाच राहतो!

शिवाय शेतकरी व उद्योगपती ह्यांच्या उत्पन्नांतील वाढीचा तौलनिक अभ्यास केला असता असें आढळतें कीं, शेतकऱ्याला होणारा फायदा हा उद्योगपतीला होणाऱ्या नफ्याच्या पासंगासहि पुरत नाहीं. पुढें कापूस व कापड ह्यांच्या किंमतींच्या मानांतील वाढीचे दर्शकांक Index Numbers दिले आहेतः—

( १९३९चा दर्शकांक = १०० )

| | १९४०-४१ | १९४१-४२ | १९४२-४३ | १९४३-४४ |
|---|---|---|---|---|
| ज्यूट (कच्चा) | ११३ | १३७ | १५३ | २०९ |
| गोणपाट | १३२ | १८२ | १८७ | २४९ |
| कापूस | १२५ | १४४ | १६१ | २२८ |
| कापसाचें कापड | ११८ | १७८ | ३१० | ४२४ |

वरील तक्त्यावरून असें स्पष्ट दिसून येतें, कीं शेतकीचा माल विकत घेऊन त्याचा पक्का माल बनविणारा उद्योगपतींचा वर्ग हाच एकंदर फायद्याचा मोठा भाग बळकावून बसला आहे.

## शेतकरीवर्गांतील अनेक पोटवर्ग

आपण वर 'शेतकरीवर्ग' अशी संज्ञा वापरली; पण शेतकरीवर्गांतहि अनेक पोटवर्ग उत्पन्नांप्रमाणें पाडतां येतील. आपण जर सर्व शेतकरीवर्ग हा एकाद्या पिरॅमिडप्रमाणें मानला तर ह्या पिरॅमिडचें शिखर हें सर्वांत मोठ्या जमीनदारांचें बनलेलें आहे. ह्या वर्गांत साधारणपणें २५ एकर ते ५०० एकरपर्यंत जमीन असलेल्या जमिनदारांचा समावेश केला पाहिजे. २५ एकरांहून जास्त जमीन असलेले जमीनदार मुंबई प्रांतांतील एकंदर जमीनदारांपैकीं १० % आहेत. पण त्यांच्या ताब्यांत एकंदर प्रांतांतील कसलेल्या जामिनींचा निम्मा भाग आहे. इतर प्रांतांतील स्थिति ह्याच प्रकारची आहे. वरील वर्गाच्या खालोखाल ५ ते २५ एकर जमीन असलेले शेतकरी येतात. मुंबई इलाख्यांतील ४०.% जमीनमालक ह्या वर्गांत मोडतात. मद्रासमध्यें हेंच प्रमाण ३४ % आहे. सबंध देशांतील जमिनमालकांच्या संख्येपैकीं ३५ ते ४० % जमीनमालक ह्या वर्गांत बसतील.

तिसऱ्या वर्गांत पांच एकरांहून कमी जमीन असलेल्या वर्गांतील जमीनमालकांचा समावेश केला जाईल. सर्व देशांतील जमीनमालकांपैकीं ५० % असलेला चौथा वर्ग हा खंडानें जमीन कसणारांचा आहे. हिंदुस्तानांतील ⅙ जमीन हाच वर्ग कसतो.

ह्या पिरॅमिडच्या तळाशीं ज्यांच्याजवळ स्वतःची जमीन नाहीं व जे खंडानेंहि शेती करीत नाहींत अशा शेतकीमजुरांचा अंतर्भाव केला पाहिजे. हिंदुस्तानांतील शेतीवर अवलंबून असणाऱ्या लोकसंख्येपैकीं शेंकडा ३२ ह्या वर्गांतील आहेत.

शेतकीमालाच्या किंमतीचा फायदा घेण्याकरितां शेतकऱ्यांजवळ त्यांच्या स्वतःच्या खावटीस लागणारें धान्य बाजूला काढल्यानंतर बराच विकाऊ माल राहिला पाहिजे. शेतींत गुंतलेल्यांपैकीं साधारणपणें १ कोटि ४० लाख लोकच ह्या प्रकारें फायदा मिळवूं शकतात. बाकीच्यांच्या जवळ पुरेशी शेतजमीन नाहीं व कित्येक तर मजुरांच्याच दर्जाला जाऊन पोहोंचले आहेत ! बहुसंख्य शेतकऱ्यांना वाढत्या किंमतीचा फायदा घेतां येत नसल्यामुळें हिंदी शेतकऱ्यांचें कर्ज कमी झालें नसावें असें म्हणणें चूक होणार नाहीं.

वरील तात्त्विक विवेचनाला पुरेसा पाठिंबा देण्याइतकी आंकडेवारी अजून उपलब्ध नाहीं. पंजाबकरितां 'पंजाब बोर्ड ऑफ इकॉनॉमिक इन्क्वायरी'-नें कांहीं खेड्यांची आर्थिक पाहणी करून असा निष्कर्ष काढिला कीं, युद्धामुळें शेतकऱ्यांच्या सर्व वर्गांचा फायदाच झाला आहे; पण पंजाबची स्थिति ही सबंध देशांतील शेतकऱ्यांच्या स्थितीची प्रातिनिधिक नाहीं. पंजाब हा शिपायांचा प्रांत असल्यामुळें तेथील शेतकऱ्यांच्या उत्पन्नांत शिपाईपेशाच्या त्यांच्या नातलगांच्या पैशांची भर पडते व निव्वळ शेतींतील उत्पन्न व इतर उत्पन्न यांत फरक करत येत नाहीं.

## मद्रासमधील एक आर्थिक पाहणी

परंतु मुंबई व मद्रास ह्या प्रांतांतील शेतकऱ्यांची स्थिति बऱ्याच प्रमाणांत सारखीच आहे व सुदैवानें मद्रास प्रांताकरितां मुद्दाम मद्राससरकारनें चौकशी करण्याकरितां सुप्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ डॉ० नारायणस्वामी नायडू ह्यांची १९४३ सालीं नेमणूक केली होती. डॉ० नायडूंनीं केलेल्या पाहणींत खालील गोष्टी दिसून आल्या:—

चौकशीकरितां मद्रास प्रांतांतील एकूण ३५९३२ खेड्यांपैकीं १६० खेडीं निवडण्यांत आलीं होतीं आणि दर १००० कुटुंबांमागें एक कुटुंब ह्या तऱ्हेनें ८५३० शेतकरीकुटुंबांचा आर्थिक पाहणींत समावेश करण्यांत आला होता. चौकशींतील कुटुंबांचें वर्गीकरण पुढें दिल्याप्रमाणें होतें:—

| शेतकऱ्यांचा प्रकार | कुटुंबें | एकंदर कुटुंबांशीं % प्रमाण |
|---|---|---|
| मोठे जमीनदार | २४० | २·९ |
| मध्यम जमीनदार | २,०९७ | २४·६ |
| लहान जमीनमालक | ३,७८४ | ४४·३ |
| कुळें | १,१३० | १३·२ |
| शेतकीमजूर | १,२७९ | १५·० |










# दुसरें जागतिक महायुद्ध व हिंदी शेतकऱ्यांचें कर्ज

वरील सर्व कुटुंबांचें एकत्रित कर्ज १९४५ सालीं २१८ कोटी रुपये होतें; १९३९ सालीं त्याचा आंकडा २७२ कोटी रु. होता; त्यावरून एकंदर कर्ज ५४ कोटी रुपयांनीं कमी झालें असल्याचें आढळून येतें. दर कुटुंबामागें २०% कर्ज कमी झालें म्हणजे कांहीं मोठा डोळ्यांत भरण्यासारखा बदल घडून आला, असें म्हणणें धाडसाचेंच होईल.

वरील कर्जाच्या बाबतींत आणखीहि कांहीं गोष्टी लक्षांत घेणें योग्य ठरेल. वरील कर्जापैकीं बरेंच कर्ज (जवळजवळ २७ कोटी रु.) १९४३–१९४५ ह्या-दरम्यान वाढलेलें आहे. हिंदी शेतकऱ्याला फायदा होऊं लागतांच जास्त फायदा होण्याच्या लालसेनेंहि तो जास्त जमीन विकत घेण्याचा प्रयत्न करतो व त्याकरितां कर्जहि काढतो. हिंदुस्तानच्या गेल्या शंभर वर्षांच्या आर्थिक इतिहासांत वरील प्रकारच्या कर्जवाढीचें व त्यानंतरच्या दुष्परिणामांचें एक ठळक उदाहरण आहे. १८६०–१८६५पर्यंतच्या काळांत दख्खनच्या कांहीं भागांतील शेतकऱ्यांना बेसुमार फायदा होत होता; त्याला कारण अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांतील यादवी युद्ध हें होतें. यादवी युद्धांत उत्तरेकडील संस्थानांनीं दक्षिणेकडील संस्थानांची नाकेबंदी केली व लँकेशायरमधील गिरण्यांना लागणारा कापूस दक्षिणेकडील संस्थानांतून येईनासा झाला; त्यामुळें हिंदी कापसाला भरमसाट भाव येऊन शेतकऱ्यांची स्थिति सुधारली. पण त्याचा परिणाम म्हणजे शेतकऱ्यांनीं कर्जें काढून शेती वाढविण्याचा प्रयत्न केला. यादवी युद्ध संपल्या-नंतर किंमती अर्थातच घसरल्या व शेतकऱ्यांच्या डोक्यावर वाढत्या कर्जाचा बोजा मात्र पडला! १८७०–७५चे दरम्यान दख्खनमधील पुणें व अहमदनगर जिल्ह्यांत बरीच पुंडाई माजली. त्या पुंडाईचा रोख सावकारांच्या, विशेषतः मारवाड्यांच्या विरुद्ध होता व शेतकऱ्यांची मुख्य मागणी सावकारांनीं कर्जासंबंधींचे कागद जाळून टाकावे, ही होती!

वरीलप्रमाणें चढत्या किंमतींच्या काळांत कर्ज काढणें फायद्याचें ठरत नाहीं. जर किंमती घसरल्या तर आतां अगदींच क्षुल्लक भासणारें २७ कोटी रुपयाचें कर्ज शेतकऱ्यांच्या मानेभोंवतींचा फांस ठरेल!

## शेतकऱ्यांच्या कर्जाचा प्रश्न आनुषंगिक

मद्रासमधील स्थितीवरून एकंदर देशांतील शेतकऱ्यांच्या कर्जाविषयीं अनुमानें काढणें चुकीचें ठरेल. तरी पण सर्व देशांतील कर्ज कमी झालें नाहीं, असें म्हणण्यांत विशेषशी अशास्त्रीयता खास नाहीं. प्राचार्य व्ही. बाय्. कोल्हटकर यांनीं आपल्या 'Reconstruction of Indian Agriculture'मध्यें हें कर्ज १४०० कोटी रु. असावें, असा अंदाज केलेला आहे.

हिंदी शेतकऱ्यांच्या कर्जाचा प्रश्न सोपा करण्या-करितां एका 'Rural Finance Corporation'ची स्थापना करण्याची सूचना प्रा० ध. रा. गाडगीळ ह्यांच्या अध्यक्षतेखालीं नेमलेल्या हिंदुस्तान-सरकारच्या एका समितीनें (१९४६ सालीं) केली होती, ती योग्यच आहे. परंतु हिंदुस्तानांतील शेतकऱ्यांच्या कर्जाचा प्रश्न हा मुख्य प्रश्न नसून आनुषंगिक आहे व जोंपर्यंत हिंदुस्तानांतील 'बुडीत शेती' ही आमूलाग्र बदलून 'फायदेशीर शेती' होत नाहीं, तोंपर्यंत ह्या प्रश्नाची उकल होणें कठिण आहे.

---

आपल्या विचाराचें मुख्य लक्ष्य मानव हा असला पाहिजे. यंत्राचा परिणाम मानवाचे हात पाय पंगु व लुळे करण्यांत होऊं नये.

महात्मा गांधी








# द्रौपदीवस्त्रहरण

प्रा० म. अ. मेहेंदळे एम. ए.

महाभारतांतील वस्त्रहरणाच्या प्रसंगासारखा प्रसंग आमच्या प्राचीन इतिहासांत दुसरीकडे कोठेंच आढळत नाहीं. केवळ त्या एकाच प्रसंगाकडे बोट दाखवून कांहीं लेखकांनीं तत्कालीन सामाजिक स्थितीवर शिंतोडे उडविण्याचाहि प्रयत्न केला आहे. महाभारत हा कांहीं अमुक एका वेळीं किंवा स्थळीं, एकटाकी लिहिला गेलेला ग्रंथ नव्हे. त्यांत कित्येक ठिकाणीं गौण वा थोर कवींच्या हीन वा उच्च दर्जाच्या कृती प्रसंगवशात् दडपून देण्यांत आल्या आहेत. अशाच एकाद्या हीन मनोवृत्तीच्या कवीनें महाभारतांतील प्रसंग कवनाच्या रूपानें पुढें आल्यावर मग केव्हांतरी श्रोतृवृंदाच्या रंजनासाठीं हें वस्त्रहरणाचें भडक चित्र रंगविलें असावें असा रास्त संशय मनांत आल्यावांचून राहत नाहीं. मूळचें भारत केव्हांहि रचलेलें असो, त्यांतील मजकुरावरून त्या काळच्या उच्च संस्कृतीची जी एक कल्पना डोळ्यांसमोर येते, तिच्याशीं हा वस्त्रहरणाचा प्रसंग सुसंगत वाटत नाहीं. भीष्म, द्रोण, विदुर ह्यांसारखे महात्मे तर राहोतच; पण ज्यांचीं चित्रें अगदीं काळ्याकुट्ट रंगांनीं रंगविलीं आहेत असे दुर्योधन, दुःशासन, कर्ण व शकुनि हे देखील इतरत्र परस्त्रीसंबंधीं गैर विचार मनांत आणतांना आढळत नाहींत, ही एक बाब लक्षांत घेतली म्हणजे द्रौपदीच्या संबंधांत भरसभेंत घडलेला अतिप्रसंग हा 'खरोखरींच घडलेला' प्रसंग नसावा, तो एक अतिरंजित वाङ्मयप्रकार असावा असें वाटूं लागतें. आणि त्या प्रसंगाचें वर्णन महाभारतांत जेथें दिलें आहे तो भाग सूक्ष्मपणें वाचला असतां या संशयाला चांगलीच बळकटी येते.

**महाभारत— "A Mosaic of old and new matter"**

'भांडारकर–प्राच्य–विद्या' संशोधन–मंदिरातर्फे संशोधिलेल्या महाभारताच्या आवृत्तींत सभापर्वांत हा वस्त्रहरणाचा प्रसंग ठेवलेला आहे हें खरें; पण तेवढ्यावरून तो बनाव मुळांत घडलाच होता असें सिद्ध होत नाहीं. कारण ह्या संशोधिलेल्या प्रतींतहि फक्त फार अलीकडे घुसडण्यांत आलेले प्रक्षिप्त भाग व पुनरावृत्तीच्या चुका येवढाच भाग गाळण्यांत आला आहे. ही संशोधिलेली प्रत म्हणजे सर्वथैव मूळचें महाभारत नव्हे. तींत देखील जुना भाग व नवा भाग अगदीं मांडीला मांडी लावून बसलेला असणें शक्य आहे. ह्या संशोधनकार्याच्या जबाबदारीची धुरा ज्यांनीं चिरकाल मोठ्या कौशल्यानें उचलली त्या कै० सुकठणकर यांच्या शब्दांत सांगावयाचें झालें तर हें संशोधनकार्य म्हणजे, "... a modest attempt to present a version of the epic as old as the extant manuscript material evidence wile permit us to reach with some semblance of confidence.'......It only claims to be the most ancient one according to the direct line of transmission, purer than others in so far as it is free from the obvious errors of copying and spurious additions......The constituted text can not be accurately dated, nor labelled as pertaining to any particular place or personality. Since our manuscripts are comparatively modern, our text can not claim to be very old. It goes without saying that







(precisely like every other edition) it is a mosaic of old and new matter. That is to say, in an average adhyaya of this edition [as of any other edition] we may read a stanza of the second century B. C. followed by one written in the second century A. D. ''– अशा स्वरूपाचें आहे.

## द्रौपदीला सभेंत आणण्याला कारण

द्यूतांत युधिष्ठिरानें लाविलेला द्रौपदीचा पण शकुनीनें जिंकला असतां आनंदातिशयानें व पांडवांवर सूड उगविण्याच्या एकमेव बुद्धीनें दुर्योधन विदुराला द्रौपदीस घेऊन येण्यास व कौरवांच्या इतर दासींबरोबर त्यांचीं कामें तिनें ह्यापुढें करीत राहावें असें तिला कळविण्यास सांगतो. ह्या वेळेस वस्त्रहरणासारखा निंद्य प्रकार द्रौपदीला सभेंत आणून करावा असें त्याच्या मनांत असल्यासारखें दिसत नाहीं. परंतु द्रौपदी दासी झाली नाहीं असें विदुराचें मत असल्यानें तो हें काम करण्याचें नाकारतो व मग त्या कामावर प्रातिकामी नांवाच्या सारथ्याला पाठविण्यांत येतें. प्रातिकामीनें दुर्योधनाचा निरोप द्रौपदीस कळविला असतां "द्रौपदी वास्तविक दासी झाली कीं नाहीं?" ह्या मुख्य प्रश्नाला तोंड फुटतें. दासी म्हणून कौरवांच्या नोकरचाकरांत राहून त्यांचीं कामें करण्याचा तिला जो निरोप असतो त्याविषयीं ती कांहींच बोलत नाहीं. 'द्रौपदी दासी झाली कीं नाहीं?' हा प्रश्न तिनेंच उपस्थित केला असल्यामुळें तिनें स्वतःच सभेंत येऊन सभासदांकडून ह्या प्रश्नाचा निकाल लावून घ्यावा असें दुर्योधन सुचवितो. परंतु हा निरोप घेऊन द्रौपदीकडे परत जावयाला प्रातिकामी तयार नाहीं, असें दिसून आल्यावर हें काम साधारण माणसाच्या हातून होणारें नाहीं असें जाणून दुर्योधन दुःशासनालाच तिच्याकडे पाठवितो. एका कुलस्त्रीला न्याय मागण्यासाठीं सभेंत येण्यास भाग पाडून तिचा अपमान करावा ह्यापेक्षां अधिक कांहीं दुर्योधनाच्या मनांत असेलसें वाटत नाहीं. नुकत्याच झालेल्या राजसूय यज्ञाच्या अभिषेकानें ओले झालेले जिचे केस अजून वाळलेहि नव्हते व जिनें मयसभेंत दुर्योधनाला हंसून त्याची मानहानि केली होती त्या द्रौपदीला इतक्या लवकर न्याय मिळविण्यासाठीं सामान्य जनांप्रमाणें कौरवांच्या सभेंत येण्यास भाग पाडावें ह्यापेक्षां स्वतःच्या मानहानीचें उट्टें भरून काढण्याची अधिक नामी संधि दुर्योधनाला कशी मिळणार होती? आणि मिळाली असती तर ती तो कशी व्यर्थ घालविता? ह्या ठिकाणीं दुःशासनाच्या तोंडीं घातलेलीं कांहीं वाक्यें त्याची स्वतःची कांहींशी हीन अभिरुचि व त्याच्या मनाचा असंस्कृतपणा दाखवितात इतकेंच. शिवाय त्या काळीं दासींचा सामाजिक दर्जा अगदींच कमी प्रकारचा असल्यानें जोंपर्यंत द्रौपदीला दासी समजण्यांत येत आहे तोंपर्यंत तिला अपशब्द बोलून घेण्यास कांहींच हरकत नाहीं असेंहि त्यास वाटत असावें. म्हणूनच द्रौपदीनें आपण रजस्वला व एकवस्त्रा असल्यानें आपणास सभेंत नेणें योग्य नव्हे असें सांगतांच तो तिला उद्धटपणें

> " रजस्वला वा भव याज्ञसेनि
> एकाम्बरा वाप्यथवा विवस्त्रा ।
> द्यूते जिता चासि कृतासि दासी
> दासीषु कामश्च यथोपजोषम् ॥ "

असें म्हणतो. ह्यांतील 'विवस्त्रा' ह्या शब्दावरून पुढें तिला सभेंत नेल्यावर तिचें वस्त्र फेडण्याचा त्याचा विचार होता असें म्हणतां येणार नाहीं. बोलण्याच्या भरांत आपण एकीपेक्षां एक वरची पायरी घेऊन नेहमीं बोलत असतों, आणि त्याप्रमाणेंच त्यानें 'तूं नीट वस्त्र नेसलेली अस, तूं एकवस्त्रा अस, अगर विवस्त्र अस' असे शब्द उच्चारिले. ह्यावरून दुःशासनाची द्रौपदीला सभेंत नेण्याची उत्कट इच्छा व घाई दिसून येतात येवढें मात्र म्हणतां येईल. ह्यानंतर दुःशासनानें तिला केस धरून सभेंत ओढून नेलें आणि तेथें देखील तो तिचे केस ओढून तिला सारखे हिसके देत होता वगैरे वर्णन अतिरंजित वाटतें. एकाद्या स्त्रीचा, ती दासी आहे असें क्षणभर गृहीत धरलें तरी, इतका उपमर्द होत असतां तो भीष्मादि थोर पुरुष मुकाट्यानें पाहत बसले असतील हें खरेंच वाटत नाहीं. भीष्माचार्यांच्या मतें द्रौपदी दासी झाली कीं नाहीं ह्याविषयीं निर्णयात्मक असें कांहीं सांगणें शक्य नव्हतें. पण तसें असलें तरी ह्या संशयाचा फायदा द्रौपदीलाच मिळावयाला हवा होता, दुःशासनाला नव्हे, येवढी







गोष्टहि भीष्माचार्यांसारख्या नीतिशास्त्रविशारदाच्या लक्षांत आली नसेल असें मानणें फार धाष्ट्याचें होईल. ह्या प्रसंगीं हिसकाहिसकीमुळें द्रौपदीच्या अंगावरचें वस्त्र किंचित् सरकतें (पतितार्धवस्त्रा) आणि गुरुजनांच्या समोर आपण अशा स्थितींत उभें राहणें योग्य नव्हे असें ती म्हणते. 'माझे केस सांरखे ओढून मला विवस्त्र करूं नको' अशी विनंतिहि ती दुःशासनाला करते (मा मां विवस्त्रां कृधि मा विकार्षीः।). ह्या ठिकाणीं देखील एकंदर संदर्भ पाहतां 'विवस्त्र' ह्या शब्दाचा अर्थ 'नग्न' असा करतां येणार नाहीं. कारण कोणतीहि स्त्री, तिचे केस ओढले असतां, त्या अर्थानें विवस्त्र होणार नाहीं. येथें विवस्त्र ह्या शब्दाचा अर्थ अंगावरचा पदर सरकणें येवढाच होऊं शकेल हें उघड आहे. (तां कृष्यमाणांच रजस्वलां च। स्रस्तोत्तरीयामतदर्हमाणाम्॥)

## 'वस्त्रहरणा'वांचूनच कथाभाग अधिक सुसंगत

"द्रौपदी दासी झाली कीं नाहीं?" ह्या प्रश्नाला निश्चित उत्तर देण्याचें जेव्हां सर्वजण टाळतात, तेव्हां विकर्ण ती दासी झाली नसल्याचें स्वतःचें मत न कचरतां सांगतो. त्याला उत्तर देतांना कर्ण प्रथम ती दासी झाली असल्याचें सिद्ध करतो व नंतर तिला एकवस्त्रा असतांनाहि सभेंत आणलें ह्या गर्हणीय कृत्याचें असें समर्थन करतो:—

मन्यसे वा सभामेतामानीतामेकवाससम्।
अधर्मेणेति तत्रापि शृणु मे वाक्यमुत्तमम्॥
एको भर्ता स्त्रिया देवैर्विहितः कुरुनन्दन।
इयं त्वनेकवशगा बन्धकीति विनिश्चिता॥
अस्याः सभामानयनं न चित्रमिति मे मतिः।
एकाम्बरधरत्वं वाप्यथवापि विवस्त्रता॥

त्याच्या उत्तरांत आलेल्या 'विवस्त्रता' ह्या शब्दावरूनच जणूं येथून पुढें वस्त्रहरणाच्या प्रसंगाला सुरुवात होते. कर्ण दुःशासनाला पांडवांचीं व द्रौपदीचींहि वस्त्रें काढून घेण्यास सांगतो. हें ऐकतांच पाण्डव आपण होऊनच आपापलीं उत्तरीयें उतरून ठेवतात.

तच्छ्रुत्वा पाण्डवाः सर्वे स्वानि वासांसि भारत।
अवकीर्योत्तरीयाणि सभायां समुपाविशन्॥

येथें हें लक्षांत ठेवावयाला हवें कीं, पाण्डवांनीं देखील फक्त उत्तरीयांचा त्याग केला, ते सर्व वस्त्रें काढून टाकून नग्न होऊन सभेंत येऊन बसले नाहींत. ही झाली पुरुषांची कथा; मग स्त्रीला नग्न करण्याचा प्रयत्न केल्याची गोष्टच कशाला? परंतु कथा रंगवून सांगण्याच्या भरांत कथेकऱ्याला पुरेसें अवधान न राहून त्यानें 'दुःशासनानें द्रौपदीचें वस्त्र फेडण्याचा प्रयत्न केला; परंतु कांहीं अद्भुत चमत्कार घडून आल्यामुळें द्रौपदीचें अंग उघडें पडलें नाहीं,' असें वर्णन केलें. हा वस्त्रहरणाचा प्रसंग संपल्यानंतर पुनः 'द्रौपदी दासी झाली कीं नाहीं?' हाच प्रश्न चर्चेस निघतो आणि त्याचें उत्तर देण्यास विदुर सर्व सभासदांस विनंति करतो. पण पूर्वीप्रमाणेंच त्या प्रश्नाचें उत्तर कोणीहि देत नाहीं आणि मग कर्ण पुनः दुःशासनाला 'दासी' कृष्णेला घराकडे घेऊन जावयाला सांगतो. (कर्णो दुःशासनं त्वाह कृष्णां दासीं गृहान्नय।) ह्या वर्णनांतला द्रौपदीच्या वस्त्रहरणाचा प्रसंग व विदुराचें लांबच लांब प्रवचन दोन्ही प्रक्षिप्त वाटतात. आणि दोन्ही गाळून टाकून हा कथाभाग वाचला असतां सर्व अधिक सुसंगत वाटतें. मागें विकर्णाला उत्तर देतांना कर्णानें द्रौपदी दासी झाली असल्याचें सिद्ध केलेंच होतें आणि आतां तिला तो कौरवांचीं गृहकृत्यें करण्यास घेऊन जाण्यास दुःशासनाला सांगतो.

## वस्त्रहरणाच्या कल्पनेला कारण

तेव्हां वस्त्रहरणाचा भाग अजीबात गाळून जरी त्या प्रसंगाचें महाभारतांतील वर्णन वाचलें तरी कोठेंच अर्थहानि झाल्यासारखें वाटत नाहीं. कौरवांचा तसाच कर्णाचा हेतु फक्त द्रौपदीला द्यूतांत जिंकल्यावर तिला न्याय मागायला सभेंत यायला लावून व मग तेथें ती दासी झाल्याचें सिद्ध झाल्यावर तिला गृहकृत्यें करावयास सांगून तिची मानहानि करण्याचा असतो. बोलण्याच्या भरांत क्वचित् 'विवस्त्र' हा शब्द आला आहे; पण तो वाच्यार्थानें घेतां येत नसल्याचें वर दाखवलेंच आहे. या ठिकाणीं विवस्त्रता ही उत्तरीयापुरतीच मर्यादित कशी आहे हेंहि वर दाखविलें आहेच. शिवाय द्रौपदी सभेंत आपलें जें गाऱ्हाणें गुदरते त्यांत

तिची मुख्य तक्रार तिच्यासारख्या कुलीन स्त्रीला सभेंत यावें लागलें ह्याबद्दलच असते ( धर्म्याः स्त्रियः सभां पूर्वं न नयन्तीति नः श्रुतम् । स नष्टः कौरवेयेषु पूर्वो धर्मः सनातनः ॥ ). दुःशासनाचा स्पर्श झाल्याबद्दलहि तिला खेद वाटतो. पण ह्या उक्तींत देखील तिला विवस्त्र करण्यांत आल्याबद्दलचा उल्लेखहि नाहीं. कांहीं वेळानंतर भीमाच्या तोंडून जे क्रोधोद्गार बाहेर पडतात त्यांतहि दुःशासनानें केलेल्या केशस्पर्शाचा उल्लेख आहे, पण वस्त्रहरणाबद्दल तो अवाक्षरहि काढत नाहीं. दुःशासनानें तसला कांहीं निंद्य प्रकार करण्याचा प्रयत्न जर नुकताच खरोखर केला असता तर त्याबद्दल द्रौपदीनें अगर भीमानें कांहींच न बोलणें मुळींच संभवत नाहीं. तथापि 'विवस्त्र' ह्या शब्दावरून सूचना घेऊन पुढें कोणीं तरी हा वस्त्रहरणाचा काल्पनिक प्रसंग मूळ कथेंत घातला असावा. असें करतांना श्रोतृवृंदाच्या हीन अभिरुचीला संतोषविण्याबरोबरच कदाचित् भगवान् श्रीकृष्णानें द्रौपदीला साह्य केल्याचें दाखवून श्रोत्यांचा भक्तिभाव उत्तेजित करण्याचाहि कथेकऱ्याचा हेतु असावा. महाभारतांत श्रीकृष्ण हा दैवी अवतार असल्याची कल्पनाहि कांहीं सर्वत्र सारखीच दृष्टीस पडत नाहीं. त्याच्या ह्या अवताराच्या कल्पनेचा देखील सावकाश विस्तार होत गेला आहे. शिवाय संशोधित आवृत्तींत द्रौपदीनें केलेला श्रीकृष्णाचा धांवा वगैरे प्रकार घेतलेला नाहीं. एकंदरींत महाभारतांतील वस्त्रहरणाचा प्रसंग श्रीकृष्णाबद्दलची अवतारकल्पना जनमनांत बद्धमूल झाल्यावर मगच रचण्यांत आला असावा हें उघड आहे.

## वस्त्रहरणवर्णन हें प्रक्षिप्त

एकादा प्रसंग पूर्णपणें पार न पडतां अर्धवटच राहिला तर त्याच्या गांभार्याविषयीं कितीहि कल्पना केली तरी तें नीट लक्षांत येत नाहीं. एकाद्या ठिकाणीं आग लागण्याचा संभव असला, पण योग्य वेळीं काळजी घेतल्यामुळें जर ती लागली नाहीं, तर तीमुळें होणार असलेल्या अनर्थाविषयीं कोणी विशेष फिकीर करीत नाहीं. द्रौपदीवस्त्रहरणाच्या प्रसंगाचेंहि थोडेंसें असेंच झालें आहे. कारण, तो निंद्य प्रकार करण्याचा प्रयत्न कौरवांनीं केला पण श्रीकृष्णाच्या बहुमोल साह्यामुळें तो सफल होऊं शकला नाहीं असें कथेकऱ्यानें दाखविलें असल्यामुळें मूलतः ती कल्पना किती निंद्य व दुष्ट होती ह्या गोष्टीकडे आपलें दुर्लक्ष होतें. कांहीं वर्षांपूर्वी कोल्हापुर संस्थानांत घडलेलें 'पांगिरे'–प्रकरण सर्वांच्या स्मरणांत आहेच. एका फरारी आरोपीसंबंधीं माहिती मिळविण्यासाठीं त्याच्या आईला एका खोलींत कोंडून नग्नावस्थेंत फटके मारण्यांत आले अशी ती कुप्रसिद्धि पावलेली दुष्ट हकीकत आहे. पण ती हकीकत प्रसिद्ध होतांच चोहों बाजूंनीं टीकेचा किती भडिमार झाला, निषेधाच्या किती सभा भरविल्या गेल्या आणि ह्या गैर वर्तनाबद्दल शासन व्हावें यासाठीं हटवादी सत्तेचा किती पिच्छा पुरवला गेला हें प्रसिद्धच आहे. कित्येक गोष्टींची गर्हणीयता त्रिकालाबाधित असते. वस्त्रहरणाबद्दल हेंच म्हणतां येईल. पण एकाद्या लहानशा खोलींत नव्हे तर भर सभेंत अनेक पुरुषांसमोर हा प्रसंग द्रौपदीवर ओढवला असतां एकहि सभासद उठून दुःशासनाचें मनगट धरून त्याला आवरतांना दिसत नाहीं हें आश्चर्य नव्हे काय ? त्या सभेंत द्रौपदीचे एकापेक्षां एक पराक्रमी असे पांच पति होते; पण ते, म्हणे, दास झाल्यामुळें असहाय झाले होते ! तथापि वस्त्रहरणाचा प्रसंगच मुळीं इतका संतापजनक आहे कीं त्या वेळीं फाजील न्यायबुद्धीमुळें अगर धर्मबुद्धीमुळें पांचहि पांडव व भीष्म, द्रोण, कृप ह्यांसारखे अतिरथी महारथी खालीं माना घालून स्वस्थ राहिले होते हा युक्तिवाद कोणासहि पटणें शक्य नाहीं. दासींचा सामाजिक दर्जा त्या काळीं कितीहि कमी असला आणि त्यामुळें त्यांच्या नीतिमत्तेवरहि वाईट परिणाम होत असला तरी तेवढ्यानें त्या पशू खास ठरत नव्हत्या. द्रौपदीनें पांच पांडवांशीं लग्न केलें म्हणून कर्ण तिला कुचेष्टेनें 'बंधकी' म्हणतो. पण देहविक्रय करणाऱ्या वेश्यांची अब्रू देखील कोणी चव्हाट्यावर चारचौघांसमोर मांडीत नाहीं. द्रौपदी दासी झाली कीं नाहीं ह्याबद्दल भीष्माला संशय असला तरी तिला कौरवांनीं नोकरासारखें वागविणें येवढेंच त्याच्या दृष्टीनें क्षम्य ठरावयाला हवें होतें. परंतु त्या अतुलपराक्रमी व वृद्ध पितामहाचें धनुष्य स्वतःच्या नातसुनेची अब्रू वांचविण्यासाठीं सज्ज होऊं नये हें कमालीचें आश्चर्य






नव्हे काय ? आणि पांडवांची त्या वेळची निष्क्रियता तर त्यांचें त्या वेळीं दगडी पुतळ्यांत रूपांतर झालें होतें असें म्हटलें तरच त्यांना शोभणार आहे !

परंतु श्रीकृष्णाच्या अगर तसल्याच एखाद्या दैवी शक्तीला मध्यें आणल्यामुळें द्रौपदीच्या शरीरावरच नव्हे तर ह्या प्रसंगाच्या गांभीर्यावरहि पांघरूण पडलें आहे. त्यामुळें त्या प्रसंगाच्या शक्याशक्यतेविषयीं फारसा विचारच मनांत येत नाहीं. पण त्यासंबंधीं विचार करूं लागल्यावर मात्र वर विवेचन केलें आहे त्या दृष्टीनें तो प्रसंग मुळांत अजीबात घडलाच नसावा व तत्संबंधींचें वर्णन हा एक प्रक्षिप्त भाग असावा असें साहाजिक अनुमान निघतें.

---

स्त्री ही अबला नाहीं.

" स्त्रियांना अबला म्हणणें ही त्यांची बदनामी होय, स्त्रियांना तो घोर अन्याय होय. जर ' बल ' याचा अर्थ ' पाशवी बल ' असा असेल, तर मग स्त्री ही खरोखरच पुरुषापेक्षां कमी ' पशु ' आहे ! परंतु जर ' बल ' याचा अर्थ ' नैतिक सामर्थ्य ' असा उदिष्ट असेल, तर त्या बळाच्या बाबतींत स्त्री ही पुरुषापेक्षां किती तरी वरिष्ठ आहे !

महात्मा गांधी

स्त्रियांचें समाजांत स्थान

स्त्री ही पुरुषांइतकीच मनःसामर्थ्यसंपन्न अशी पुरुषाची सहचरी आहे. पुरुषाच्या प्रत्येक व्यवहारांत अगदीं बारीकसारीक बाबतींत देखील तिला भाग घ्यावयाचा हक्क आहे. तिलाही पुरुषाइतकेंच स्वतंत्र रहाण्याचा हक्क आहे, पुरुषाला ज्याप्रमाणें आपल्या क्षेत्रांत सर्वोच्च स्थान असतें त्याप्रमाणें स्त्रीलाहि तिच्या क्षेत्रांत सर्वोच्च असें स्थान असावयास पाहिजे. स्त्री ही साक्षर झाल्यानंतरच तिला हें स्थान प्राप्त व्हावें असें नाहीं. तिला समाजांतील हें उच्च स्थान मूलतः निसर्गतःच असलें पाहिजे.

महात्मा गांधी

# माझ्या जीवनाचें तात्त्विक अधिष्ठान

श्री० श्रीकृष्णदास जाजू

ह्या मासिकाकरितां माझ्या जीवनांतील तत्त्व किंवा माझ्या जीवनांतील मला प्रेरक अशी विचारधारा याबाबत कांहीं लिहून देण्याचा आग्रह मला करण्यांत आला आहे. मी लेखक नाहीं किंवा विचारकहि नाहीं. शिवाय, वाचकांच्या उपयोगीं पडेल असें कांहीं देऊं शकेन असेंहि मला वाटत नाहीं. तथापि "अनिच्छन् अपि वार्ष्णेय बलात् इव नियोजितः" प्रयत्न करीत आहें.

## तत्त्वज्ञानाला अनुभवाची कसोटी

जीवनतत्त्वविषयक विचारधारा आपली स्वतःची कां असेना, पण ती सूक्ष्मतेनें समजणें, ती दुसऱ्यास समजावून देणें आणि पटवून देणें या गोष्टी कठिण जातात. विज्ञाना(Science)ची गोष्ट अशी आहे कीं, त्याचा संबंध बाह्य वस्तूंशीं येतो. त्या वस्तू निरनिराळीं माणसें आपआपल्या इंद्रियांच्या शक्तीप्रमाणें परंतु बहुतेक सारख्या रीतीनें पाहूं व समजूं शकतात व त्यांचे एकमेकांचे अनुभव जुळतात. म्हणून विज्ञानविषयक ज्ञान एकमेकांना समजावून देणें सोपें असतें. पण जीवनविषयक विचारधारेची गोष्ट निराळ्या प्रकारची आहे. एक तर ती आपापल्या जन्मार्जित बुद्धीच्या संस्कारावर अवलंबून आहे. शिवाय, स्वतःला तसा कांहीं अनुभव असल्यांशिवाय दुसऱ्याची जीवनविषयक विचारधारा समजणें कठिण जातें. पटणें तर त्यापेक्षांहि कठिण आहे. आणि आचरणावर परिणाम होणें ही वेगळीच गोष्ट आहे.

एक उदाहरण घेऊन हें स्पष्ट करण्याचा प्रयत्न करितों. श्रीशंकराचार्योंनीं लिहिलें आहे:—'सर्वपरिग्रह भोग त्यागः कस्य सुखं न करोति विरागः?' वैराग्यापासून प्रत्येकाला सुख झालेंच पाहिजे, हें किती निश्चितपणें श्रीशंकराचार्योंनीं लिहून टाकलें आहे! केवळ श्रीशंकराचार्योंनींच असें लिहिलें आहे असें नाहीं तर आमच्या बहुतेक तत्त्ववेत्त्यांनीं व साधुसंतांनींहि अशाच तऱ्हेचे विचार प्रकट केले आहेत. पंचदशीकारांनीं तर असें लिहिलें आहे कीं सुख बाह्य वस्तूंमध्यें मुळींच नाहीं; तें मनुष्याच्या मनामध्येंच आहे. मनुष्य त्याचा बाह्य वस्तूंवर केवळ आरोप करितो. अशा विचाराचें सर्व लिखाण केवळ काल्पनिक आहे असें म्हणून तें फेंकून देतां येणार नाहीं. अशा महात्म्यांचें जीवन जगाच्या उद्धाराकरितां होतें. त्यांना तसा कांहीं प्रत्यक्ष अनुभव आला असल्याशिवाय त्यांनीं तसें लिहिलें नसेल.

## बुद्धिपूर्वक विषयत्यागांत आनंद

पण आम्ही जगांत काय पाहत आहों? जरी तोंडानें आम्ही अशा वाक्यांचा उच्चार करीत असलों तरी कृति मात्र हीच आहे कीं बाह्य वस्तूंमध्येंच आम्ही सुख पाहून राहिलों आहों. आणि बाह्य विषयांकरितां आमची एकसारखी धडपड चालली आहे. आम्ही श्रीशंकराचार्योंसारख्यांनीं लिहिलेल्या वाक्याप्रमाणें वागण्याचा निकरानें प्रयत्नच करीत नाहीं, अनुभव घेऊन पाहतहि नाहीं. म्हणून पोपटपंचीप्रमाणें जरी शब्दांचा उच्चार आम्ही करीत असलों, तथापि त्यांचा अर्थ पटवून घेण्याकरितां व त्याप्रमाणें वागण्याचा प्रयत्न आमच्याकडून होत नाहीं. मनुष्याला जिवंत राहण्याकरितां जितकी खटपट करणें








अत्यंत जरूर आहे तितकी केल्यानंतर, बाकीच्या अनावश्यक वस्तूंचा त्याग करण्याचा निश्चय करून त्याप्रमाणें वागल्यासच वैराग्यापासून किती आनंद होतो ह्याचा अनुभव येणें शक्य आहे. मनुष्यांच्या जागृति, स्वप्न व सुषुप्ति ह्या तीन अवस्थांमध्यें सुषुप्ति—अवस्थेंतच सगळ्यांत जास्त शांति व आराम आहेत हें कबूल करावें लागेल. ह्या अवस्थेंत बाह्य वस्तूंचा कोणत्याहि प्रकारें संपर्क नसतो. तेव्हां सुषुप्तीचा विचार करितां आनंद बाह्य वस्तूंवर कां अवलंबून नाहीं हें कोडें आपण समजूं शकतों.

विषय भोगून आपण सुख मिळविलें असें आपण समजत असतों; पण विचार केल्यास सबंध आयुष्यांतलि त्या सुखापैकीं सध्यां किती उरलें आहे ह्याचा जर हिशेब करूं लागलों तर शिल्लक शून्यच राहिलें आहे असें दिसून येईल. स्वप्नांत प्रत्यक्ष वस्तु नसतांनाहि त्या वेळेस तितकेंच सुख भासतें कीं जितकें जागृतीमध्यें विषयांच्या संपर्कानें होतें. तेव्हां विचार केल्यास खरें सुख व काल्पनिक सुख दोन्ही एकाच दर्जावर येऊन पोहोंचतात. असाहि संभव आहे कीं कल्पना जर बलवत्तर केली तर जवळ वस्तु नसूनहि मानसिक सुख तितकेंच मिळूं शकेल. ह्या सर्व विचारसरणीवरून असा अनुभव मिळण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं कीं आमचें सुख बाह्य वस्तूंवर अवलंबून नाहीं.

उलट मनांत कांहीं इच्छा उत्पन्न झाल्यास क्षोभ उत्पन्न होतो व त्या क्षोभाच्या शमनार्थ प्रयत्न करण्यांत प्रथम थोडें सुख वाटलें तरी तें क्षणिकच असतें; पुढें तें मनांत मोह उत्पन्न करून आसक्ति वाढवितें. याप्रमाणें मुळांत कांहीं विशेष नसतांनाहि विषयसुखाच्या मागें लागण्यानें अनर्थपरंपरेस मनुष्य कारणीभूत होतो. जर मुळांत क्षोभच उत्पन्न होऊं दिला नाहीं, तर ही सर्व अनर्थपरंपरा टळेल असाच प्रत्यक्ष अनुभव आमच्या सर्व आध्यात्मिक साधुसंतांना आला असला पाहिजे. आपणांस आलेला अनुभव त्यांनीं लोकांस सांगितला आहे; पण आम्ही खोल विचार करीत नाहीं, अनुभव घेत नाहीं; मग त्या साधुसंतांचे विचार आम्हांस प्रत्यक्ष कसे व्हावे ? मला वाटतें, अनुभव घेतल्यास हें पटेल कीं मनाचा निश्चय बरोबर झाल्यास आणि मनाची ठेवण तशी कायम ठेवल्यास विषयांच्या भोगापासून जें सुख मिळतें, त्यापेक्षां जाणूनबुजून विषय सोडून दिल्यास जास्त आनंद प्राप्त होतो आणि तो आनंद स्वाभाविक असतो.

माझ्या मनांत जे निरनिराळे विचार चालतात त्यांपैकीं दोन खालीं नमूद करितों.

## भविष्यकाळाविषयीं चिंता उगीच

मनुष्याला काय होईल, काय होणार नाहीं, याची बरीच चिंता असते. अर्थात् ही भविष्यकाळाबद्दलच असते. भूतकाळ तर निघूनच गेलेला असतो. चिंता, पुढें काय होईल त्याचीच. मनुष्याला मामुली निर्वाहाकरितां कांहीं कामकाज करावेंच लागतें. तें करणें जरुरीचेंहि आहे. परंतु जास्त प्रयत्न अशाकरितां असतो कीं पुढचा भविष्यकाळ सुखानें जावा. केवळ स्वतःचाच नव्हे तर आपण ज्यांना आपलें मानून घेतलेलें आहे त्यांचाहि. आपल्या पुढच्या पिढ्यांच्या योगक्षेमाचीहि चिंता आपणांस असतेच. हमेशाकरितां आपण व आपले आसिष्ट यांना सुखसोयीनें कसें राहतां येईल याकरितां आपली धडपड चालू असते. इतरांची सुखसोय आपणांला फारशी सतावीत नसली तरी आपल्या देहावसानापर्यंतीं तरी सगळें व्यवस्थित चालावें अशी आपली इच्छा असते. शरीरस्वास्थ्य बिघडेल, म्हातारपण येईल, अनेक संकटें उत्पन्न होतील, असा विचार करून भविष्यकाळाबाबत माणूस चिंतेंत असतो आणि जें दुःख आज नाहीं त्याची कल्पना करून आतांपासूनच तो दुःखी राहतो. म्हातारपण झालेलें असलें, पुढचें आयुष्य थोडेंसेंच उरलें असलें, तरी देखील पुढचा काळ म्हणजे उर्वरित आयुष्य किती तरी लांब आहे असें मानून तो चिंता सारखी वाढवीत राहतो आणि हें काल्पनिक संकट टळावें म्हणून एकसारखी धडपड करीत राहतो, स्वतःला अधिकाधिक दुःखी करून घेतो.

परंतु काळाच्या गतीकडे पाहिलें, तिचें विचारपूर्वक मनन केलें, तर ही भविष्यकालीन काल्पनिक चिंता करण्याचें विशेष कारण दिसत नाहीं. मला सध्यां










अनुक्रमणिका

सहासष्टावें वर्ष चालू आहे. पांच वर्षांच्या वयाचा मी होतों तेव्हांपासूनच्या कांहीं गोष्टी आतांहि मला आठवतात. त्यांवरून गेलेलीं वर्षें मोजूं लागलों तर त्या गोष्टींनंतर साठ वर्षांचा काळ निघून गेलेला आहे असें म्हणावें लागेल. परंतु साठ वर्षांपूर्वींच्या त्या घटनांकडे लक्ष दिलें तर असें वाटतें कीं जणूं काय त्या कालच घडल्या आहेत! बोलतांना सुद्धां आपण असें म्हणतों कीं किती तरी काळ हां हां म्हणतां निघून गेला. अर्थात् निघून गेलेला काळ लांब असला तरी तो अगदीं अल्प होता असा अनुभव येतो.

जर भूतकाळासंबंधानें आपली अशी भावना आहे, तर भविष्यकाळच लांब राहील असें मानून आपण कां चालावें? जर मागचें अर्धशतक सुखांत किंवा दुःखांत, अडचणींमध्यें किंवा आरामामध्यें, आजारीपणांत किंवा आरोग्यांत चटदिशीं निघून गेलें, तर पुढचीं थोडीं वर्षें तरी तितकीच झटदिशीं कां निघून जाणार नाहींत? आणि त्या पुढील काळासंबंधीं नसती चिंता उराशीं धरून इतकी धडपड कां करावी? केवळ वर्तमानकाळाचीच फिकीर ठेवणें योग्य होय.

### व्यक्ति नश्वर, समष्टि अमर

बहुतेक सर्व जण आपआपल्या स्वार्थसिद्धीसाठीं प्रयत्न करीत आहेत. आपण स्वतः किंवा आपला परिवार हें केंद्र समजून त्याचें बरें कसें होईल ह्या दृष्टीनें आपण श्रम करितों. कांहीं थोडे परोपकाराची दृष्टि ठेवूनहि कार्य करीत असतात. परंतु बहुतेक सर्व लोक आपलें हित साधून उरलेल्या शक्तीचा उपयोग दुसऱ्यांकरितां करतात. मनुष्याच्या पुरुषार्थाचें केंद्र समष्टि असावें कीं व्यक्ति हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. व्यक्तीला अर्थात् स्वतःला केंद्र मानणें हें स्वाभाविक आहे व त्याच दिशेनें सर्व खटाटोप चालू आहे.

खोल विचार करून पाहिलें असतां दिसून येईल कीं ज्याला मी माझें समजतों तें आज, उद्यां, केव्हां तरी नष्ट होणार आहे. देह तर जाणारच आहे. संपत्तिहि काळाच्या ओघानें नाहींशी होणार आहे. मुलांबाळांकरितां आपण प्रयत्न करीत असतों, पण तींहि केव्हां तरी नाहींशीं होतीलच. ज्यांना आम्ही आपले मित्र व सोयरे समजतों तेहि एकामागून एक केव्हां तरी जाणारच आहेत. जसें हें माझ्या एकट्यासंबंधानें आहे, तसेंच तें इतर व्यक्तींसंबंधानेंहि आहे. तेव्हां जी वस्तु केव्हां तरी नष्ट होणें निश्चित आहे, तीकरितां इतका अट्टाहास व जिवाचा इतका आटापिटा कां करावा?

सृष्टीकडे पाहिलें तरी हेंच दिसून येईल कीं, तींतील प्रत्येक वस्तु केव्हां ना केव्हां तरी नष्ट होणारच आहे. ती अजीबात नष्ट न झाली तरी तिचें रूपांतर तरी जरूर जरूर होईलच. आजचे मोठमोठे पर्वत दिसत आहेत, ते सुद्धां केव्हां तरी मातींत मिळून नाहींसे होतील. परंतु ह्याच विचाराची दुसरी बाजू अशी आहे कीं जरी माझ्यासकट सृष्टींतील प्रत्येक वस्तु केव्हां तरी नाहींशी होणार असली तरी सृष्टि ही कायम राहणारच आहे. आज ज्या ठिकाणीं पर्वत आहेत तेथून ते नाहींसे झाले तरी नवीन ठिकाणीं नवीन पर्वत उद्भवतील. आजच्या हिंदुस्थानांतील चाळीस कोटी माणसांपैकीं पुढच्या शंभर वर्षांत एकूणएक व्यक्ती नाहींशा झाल्या तरी शंभर वर्षांच्या शेवटीं चाळीस कोटीच काय परंतु ह्यांपेक्षांहि जास्त संख्येनें माणसें असलेलीं दिसून येतील.

नदीच्या प्रवाहांत पाण्याचा प्रत्येक थेंब जरी दर क्षणीं पुढें निघून जात आहे तथापि नदीचा प्रवाह चालूच आहे. सृष्टीचें स्वरूप असें आहे कीं तींतील प्रत्येक अंग बदलत गेलें किंवा तें नाहींसें झालें, तरी सृष्टि म्हणून चालू राहणारच आहे. अर्थात् निष्कर्ष हा निघतो कीं, व्यक्ति नश्वर असली तरी समष्टि अमर आहे. आमच्या पुढें प्रश्न हा आहे कीं आमचे प्रयत्न नश्वर वस्तूंकरितां व्हावे कीं अमर वस्तूकरितां? नश्वर वस्तूंकरितां श्रम केले तर ते फुकट जाणार आहेत. मग असा व्यर्थ प्रयत्न आपण कां करावा? अमर वस्तूकरितां आपण प्रयत्न केले तर ते परिश्रम सार्थ होणार आहेत. समष्टीच्या बऱ्यांत व्यक्तींचें बरें आलेंच.

ह्यासाठीं मनुष्याची प्रवृत्ति स्वार्थाकडे न वळवितां, परोपकाराकडे अर्थात् समाजाच्या, समष्टीच्या कल्याणाकडे वळविणें योग्य आहे. व्यवहार करतांना आम्ही बरेच उणे पडतों, ही गोष्ट वेगळी. परंतु वरील सत्य जर डोळ्यांसमोर असलें तर आमच्या वागणुकीवर, जरूर परिणाम होईल असें मला वाटतें.








# सौंदर्यवाद आणि गूढवाद

[ प्रा० श्रीकृष्ण के. क्षीरसागर ]

[ आधुनिक मराठी वाङ्मयाच्या अभ्यासास आणि आस्वादास पाश्चात्य टीकावाङ्मयांत चर्चिलेल्या Romanticism नामक प्रवृत्तीचा विवेक आवश्यक आहे असें प्रा० क्षीरसागर यांचें मत आहे. त्यांच्या स्वतःच्या टीका-लेखनांत रोमँटिसिझम् ( सौंदर्यवाद ) या संप्रदायाचा व प्रवृत्तीचा उल्लेख बरींच वर्षें येत आहे. सुमारें दीड वर्षामागें त्यांनीं साहित्यपरिषदेच्या व्याख्यानमालेंत ' सौंदर्यवाद ' या विषयावरील आपले विचार व्याख्यानरूपानें मांडले होते. नंतर मुम्बईच्या ' साहित्य ' नामक नियतकालिकांत त्यांनीं या विषयाचें महत्त्व आणि व्याप कथन करण्याकरितां एक प्रास्ताविक लेख लिहिला होता. वाङ्मयीन आणि नैतिक मूल्यांच्या बाबत प्रा० क्षीरसागर यांची एक स्वतंत्र भूमिका आहे व ती त्यांनीं आपल्या एकदोन ग्रंथांत मांडलीहि आहे; पण साहित्यसमीक्षेंतील आणि व्यक्ति-परीक्षणांतील त्यांच्या वेगळ्या दृष्टिकोणाचें मूळ त्यांच्या Romanticismसंबंधींच्या सिद्धान्तांत आहे. सदर सिद्धान्ताच्या वेगवेगळ्या बाजूंचें ( aspectsचें ) विवेचन वेगवेगळ्या लेखांत करण्याचें त्यांनीं योजिलें आहे. भिन्न-भिन्न क्षेत्रांतील विद्वानांचीं प्रमुख प्रतिपाद्यें ( Theses ) ' नवभारत 'च्या द्वारें देणें हा आमचा उद्देश आहे. Romanticism अथवा सौंदर्यवाद हें प्रा० क्षीरसागर यांच्या अनेक वर्षांच्या लिखाणांतील प्रमुख प्रतिपाद्य आहे. ]

—का० सं०

रोमँटिसिझिम् अथवा सौन्दर्यवाद ही एक महत्त्वाची प्रवृत्ति जीवनांत आणि कलेंत दिसून येते. या प्रवृत्तीचें अस्तित्व आणि महत्त्व गृहीत धरून मी माझें वाङ्मयपरीक्षणात्मक आणि व्यक्तिपरीक्षणात्मक लिखाण आज बरींच वर्षें करीत आहें. अनेक वाङ्मयीन संप्रदायांबरोबर या संप्रदायाचाहि अभ्यास होणें जरूर आहे, हें प्रतिपादण्याकरितां मागें १९४६च्या सप्टेंबरमध्यें साहित्यपरिषदेच्या वाद–व्याख्यानमालेंत मीं एक व्याख्यान दिलें व तदनंतर या वादाच्या अभ्यासाचें प्रास्ताविक स्वरूप मीं ' साहित्य ' नामक नियतकालिकाच्या प्रथमांकांत लेखरूपानें मांडलें. या प्रास्ताविक प्रकरणांत (१) या प्रश्नासंबंधीं मराठी अभ्यासकांतील अनास्था, अज्ञान आणि अपसमज, (२) कोणत्याहि आधुनिक वाङ्मयाइतकीच मराठी वाङ्मयालाहि या अभ्यासाची अवश्यकता, (३) या संज्ञेचा युरोपीय इतिहास, (४) या संज्ञेचा वाचक मराठी प्रतिशब्द, (५) रोमँटिक आणि क्लॅसिकल या दोन संप्रदायांतील द्वंद्वांचा इतिहास व (६) या वादाची व्यापकता, इतक्या गोष्टींची प्रस्तावना केली होती.

या प्रास्ताविक विवेचनावरूनहि या वादाचें वाङ्मयीन महत्त्व आणि या संज्ञेच्या अर्थाचा ' अचपळपणा ' ( Elusiveness ) यांची कल्पना वाचकांस येण्यास प्रत्यवाय नाहीं. आणि ही कल्पना देणें हाच माझ्या व्याख्यानाचा आणि प्रस्तावनेचा उद्देश होता. येवढ्या विवेचनानंतर Romanticism या प्रवृत्तीचा अधिक विचार करण्यास हरकत नाहीं.

ज्याला वाङ्मयांत ' रोमँटिक ' म्हणून म्हणतात त्याची व्याख्या करतांना पाश्चात्य विद्वानांनीं हात टेंकले आहेत व अखेर न्यायशास्त्रीय व्याख्येपेक्षां ( Logical definitionपेक्षां ) मानसशास्त्रीय पाया ( Psychological basis ) शोधणेंच








अधिक सोईस्कर आणि फलप्रद होईल असें ठरविलें आहे. पण तो पाया शोधतानांहि या शब्दाच्या धात्वर्थाचें, त्याच्या अर्थांत ( connotationमध्यें ) वेगवेगळ्या कालखण्डांत झालेल्या फरकांचें, आणि तो शब्द आणि त्याचा प्रतिद्वंद्वी 'क्लॅसिकल' हा शब्द यांच्या लढ्याचें दडपण पाश्चात्य विद्वानांच्या मनांवर फार मोठें असतें. या सर्वांचा उपयोग या संज्ञेचा आणि या वादाचा इतिहास कथन करतांना आहे, यांत संदेह नाहीं. पण आज 'रोमँटिक' या शब्दाला जो अर्थ अनेक कालखंडांतील उपयोगानंतर आला आहे, त्याची मीमांसा करतांना पुष्कळदां या अनेक पिढ्यांतील कुळकथेमुळें दृष्टि मलिन होण्याचाहि संभव असतो. दीर्घपरंपरेंतून आलेल्या कोणत्याहि संस्थेचा अगर संज्ञेचा विचार करतांना हीच अडचण अनुभवास येते. आजच्या ब्राह्मणवर्गाच्या घरांतील देवतार्चनाची आणि उपासनापद्धतीची कल्पना येण्यास यज्ञसंस्थेच्या इतिहासानें जितकी सोय होईल तितकीच अडचणहि होईल. तशीच कांहींशी स्थिति Romantic या संज्ञेची आहे. या संज्ञेचा संबंध लॅटिनोद्भव प्राकृत भाषांशीं आणि प्राकृत वाङ्मयाशीं ( Medieval Romances शीं ) असला, तरी आज 'रोमँटिक' वाङ्मयप्रवृत्ति अथवा जीवनप्रवृत्ति म्हणतांच जे गुणावगुण डोळ्यांसमोर उभे राहतात, त्यांतील फारच थोड्यांचा बोध या शब्दाच्या मूळ अर्थावरून अगर मूळ वाङ्मयीन नमुन्यावरून होईल. 'Romantic'च्या आजच्या अर्थाचा संबंध एकोणिसाव्या शतकांतील Romantic Revivalशीं अधिक आहे. एकोणिसाव्या शतकांतील इंग्लिश काव्यांत दिसून येणाऱ्या प्रवृत्तींशीं आजच्या 'रोमँटिक'चा अर्थ अधिक संबद्ध आहे. इंग्लंडमधील शेलि, जर्मनींतील ग्यटे, फ्रान्समधील शातो ब्रियाँ, अमेरिकेंमधील एडगर ॲलन पो व रशियांतील पुष्किन यांच्या मनोरचनेचा आणि काव्यरचनेचा बोध मध्ययुगीन अद्भुत कथांच्या मीमांसेनें फारच अल्प होईल. पण असें असूनहि रोमँटिक कलेची अगर रोमँटिक मनोवृत्तीची मीमांसा करतांना पाश्चात्य विद्वान् मध्ययुगीन अद्भुत कथांच्या प्रकृतीची चिकित्सा प्रथम करतात. याचें एक गमक म्हणजे इंग्लिश चिकित्सकांना रोमँटिक प्रवृत्तीचा विचार करतांना कीट्सकृत "ला बेल दाम..." हें गीत अथवा कोलेरिजकृत 'कुब्ला खान' हें काव्य जितक्या वेळां आणि जितक्या सहज स्मरेल, तितक्या सहज शेलीकृत "One word is too often profaned......" हें गीत आठवणार नाहीं. फार काय, कीट्सच्याहि प्रसिद्ध "Ode to a Nightingale" सारख्या कविता आठवणार नाहींत. हा पंक्तिभेद यदृच्छेचा द्योतक नसून, मूळ प्रवृत्तीचा आणि पूर्वाध्ययनाचा द्योतक आहे. ज्या वाङ्मयचित्रांचा संबंध स्वप्नसृष्टि, यक्षराक्षसयोनि, प्राचीन आणि निर्जन इमारती, निष्ठुर प्रेमवञ्चना, यांशीं असेल तीं चित्रें 'रोमँटिक' वाङ्मयप्रकारांत निरपवादपणें समाविष्ट होतात, अशी ही पंडितीं दृष्टि आहे. कारण, या चित्रांचा संबंध मध्ययुगीन वातावरणाशीं आणि कथा-वाङ्मयाशीं अधिक आहे. परंतु रोमँटीसिझम्च्या अर्वाचीन अवतारांत ( Romantic Revival-मध्यें) यापेक्षां अधिक खोल आणि प्रभावी प्रवृत्तींनीं प्रवेश केलेला आहे. त्यांना हें परंपराभ्यासक पंडित 'रोमँटिसिझम्' मध्यें अन्तर्भूत करीत नाहींत असें नाहीं; पण जेव्हां त्यांना 'निरपवाद सौंदर्यवादी' चित्रांचा आणि वृत्तींचा विचार कर्तव्य असतो, तेव्हां तरी ते प्रथम या प्रवृत्तींचा निर्देश करीत नाहींत.

पण मराठी वाङ्मयाच्या दृष्टीनें या अर्वाचीन प्रवृत्तींचेंच महत्त्व अधिक आहे. इतकेंच नव्हे, तर युरोपीय वाङ्मयचर्चेच्या दृष्टीनेंहि 'रोमँटिक' प्रवृत्तिचें हें उत्तरकालीन स्वरूप अभ्यासणेंच अधिक फलप्रद होईल. कारण त्यांतच रोमँटिक मनोवृत्तीचा प्रकर्ष हातीं लागेल. आणि रोग्याच्या प्राथमिक अवस्थेहूनहि विकोपावस्थेंत त्याचीं लक्षणें जशीं अधिक स्पष्ट दिसतात, तशीं सौंदर्यवादाच्या उत्तरावस्थेंतच त्याचीं लक्षणें अधिक स्पष्ट कळूं शकतील.

आज या प्रवृत्तीचा आणि संप्रदायाचा अभ्यास करतांना व्याख्या, इतिहास, ( क्लासिसिझम्, रिॲलिझम्, यांसारख्या ) तद्विरुद्ध प्रवृत्तींचा अभ्यास येवढ्यानेंच भागत नसून, रोमँटिक हा शब्द उच्चार

1 Decline & Fall of the Romantic Ideal [ F. L. Lucas ]







तांच पाश्चात्य अभ्यासकाच्या मनश्चक्षूपुढें कोणकोणत्या कल्पना उभ्या राहतात त्यांची परिगणना करावी लागते. आणि धात्वर्थ, संप्रदायेतिहास वगैरे साहित्याचा उपयोग करून थकल्यावर आजचे पंडित अखेर या स्फुट परिगणनेचाच आश्रय करतात, व ही पद्धति अपरिहार्यहि आहे आणि शास्त्रशुद्धहि आहे. पण या परिगणनापद्धतीचा उपयोग करतांनाहि पंडितांच्या मनांवर असलेल्या अर्थेतिहासाचा ( Etymology चा ) आणि संप्रदायेतिहासाचा पगडा कायम असतो; व त्यामुळें त्यांचे निष्कर्ष योग्य मर्यादेपर्यंत प्रगति करूं शकत नाहींत असें आढळून येतें.

ॲबरक्रोम्बी यांनीं या पद्धतीचा अवलंब करतांना 'Tis distance lends enchantment to the view!

ही कॅम्पबेल कवीची पंक्ति प्रातिनिधिक म्हणून घेतली आहे. या ओळींत व्यक्त झालेली भावना सर्व सौंदर्यवाद्यांना सुपरिचित वाटेल, आणि या भावनेचें मूळ शोधावयाचें म्हटल्यास सौंदर्यवादी मनाचीं बरींच लक्षणें हातीं लागतील, यांत शंका नाहीं. ॲबरक्रोम्बी यांनीं प्रत्यक्ष आणि ' हस्तगत ' सुखापेक्षां, अप्राप्य सुखावर सौंदर्यवादी मनाचा भर असतो, असा यांतून काढलेला निष्कर्ष रास्तच आहे. पण त्याच्याहि पुढें जाऊन त्यांनीं रोमँटिक मनाला ' अन्तर्गत अनुभवाची ' ( Inner experience ची ) मातब्बरी अधिक असते असें म्हटलें आहे.

एफ. एल. ल्यूकास यांना ' रोमँटिक ' हा शब्द उच्चारतांच ज्या काव्यपंक्तींचें स्मरण होतें त्यांत "The lady of the Lake

Sole-sitting by the shores ...... ",

" 'Forlorn' the very word is like a bell"

यांसारख्या पंक्ती प्रमुख आहेत. तसेंच कीट्सची "La Belle Dame..." आणि वॉल्टर द ला मेरेची "The Listeners" या हि कविता आहेत. या पंक्तींत नजरबंदी, चेटूक, निर्दय प्रेम, भुताटकी, भयाण रात्र, भयाण एकलेपणा वगैरेंचें वातावरण आहे. ल्यूकास यांना आणखी अनेक पंक्ती आठवल्या आहेत. पण ज्या स्वयंस्फूर्त स्मरणपद्धतीचा अवलंब त्यांनीं केला आहे, त्या पद्धतीच्या दृष्टीनें पाहतां प्रथम आठवलेल्या पंक्तींना विशेष महत्त्व असणार हें उघडच आहे. या सहज आठवलेल्या काव्यपंक्तींतील वातावरण मध्ययुगीन अद्भुत कथांच्या वातावरणाला अधिक जुळतेंसें आहे. पण ' रोमँटिक ' या शब्दानें आज सूचित होणारी प्रवृत्ति, या कल्पनांपेक्षां कितीतरी अधिक कल्पनांचा अन्तर्भाव करते. ॲबरक्रोम्बी आणि ल्यूकास या दोघांनीं इतरहि कल्पनांचा निर्देश केला आहे; परंतु ज्याला ते रोमँटिक वृत्तीचा शुद्ध नमुना ( Regular type ) म्हणतील त्यांत कोणत्या लक्षणांचा अन्तर्भाव होतो, हें वरील उदाहरणांवरून लक्षांत येईल.

पण रोमँटिक कवीच्या मनांत घोळणाऱ्या या दृश्यांचें आणि कल्पनांचें ' सामान्य ' सूत्र कोणतें ? भयाणपणा, एकलेपणा, निर्दय प्रेम, चेटूक, नजरबंदी, भीषण आणि तरीहि मोहनी घालणारीं माणसें आणि स्थळें, यांचा ध्यास मध्ययुगीन युरोपीय वाङ्मयानें घेतला आणि अगदीं अर्वाचीन काळांतील कवींच्या काव्यांतहि त्यांचे उल्लेख आढळतात. पण या विचित्र वेडाचें मूळ कशांत आहे ? कीं ग्यएटेनें म्हटल्याप्रमाणें खरोखरच ही एक विकृति ( ' Disease ' ) आहे ?

अनेक वाङ्मयाभ्यासी पंडितांनीं या 'विकारा'चीं केलेलीं निदानें ल्यूकास यांनीं उल्लेखिलीं आहेत.

ह्यूगो, हाइन्, सिस्मॉंडी, जॉर्ज सँड, जॉन्सन्, व्हॉल्टेअर, पेटर, वॅट्स-डंटन् यांसारख्या वेगवेगळ्या प्रवृत्तींच्या साहित्यिकांच्या, एतत्संबंधीं वेगवेगळ्या प्रसंगीं व्यक्त झालेल्या अभिप्रायांवरून हा प्रश्न अत्यंत अचपळ आहे, येवढाच निष्कर्ष काढावा लागेल. व यामुळेंच या वादाची थोडीफार थट्टाहि थट्टेखोर साहित्यिकांनीं केलेली आढळेल. आल्फ्रेड द मसे यानें तर या वादासंबंधीं एक विडंबनात्मक कथाच रचली आहे ! दोघां अजाण माणसांनीं ' रोमँटिक ' म्हणजे काय याचा शोध करण्याचें ठरविलें. त्यांना प्रथम वाटलें, ॲरिस्टॉटलचे साहित्यशास्त्रीय दंडक धाब्यावर बसविणें म्हणजे रोमँटि-











सिझम्; नंतर वाटलें, उदात्त आणि विचित्र ( Grotesque ) यांचें मिश्रण करणें म्हणजे रोमँटिसिझम्; नंतर वाटलें, भुतेंखेतें, विषण्णता, निर्दय प्रेमिक वगैरेंची चित्रें रंगविणें म्हणजे रोमँटिसिझम्. आणि अखेर तर त्यांना असें वाटूं लागलें कीं भडक कपडे घेहेरून आणि केस विखरून भर रस्त्यांतून भटकणें म्हणजेच रोमँटिसिझम्! त्यांनीं कायदेपंडितांचाहि सल्ला या बाबतींत घेण्याचें ठरविलें! पण अगदीं शेवटीं त्यांना असें आढळून आलें कीं रोमँटिसिझम् म्हणजे दुसरें तिसरें कांहीं नसून " प्रत्येक नामाच्या गळ्याभोंवतीं निदान अर्धा डझन् तरी विशेषणें अडकविणें "! आल्फ्रेड द मसे यानें या नाठाळ वादाची ही थट्टा केल्याला शंभर वर्षें झालीं तरी आजहि या संबंधांतील सर्वसाधारण समज फारसे पुढें गेलेले नाहींत, असा अभिप्राय ल्यूकास यानें ( १९३६ सालीं ) व्यक्त केला आहे.

मध्ययुगीन अद्भुत कथांचें वातावरण हें रोमँटिसिझम्चें प्राणभूत लक्षण मानण्याकडे पाश्चात्य विद्वानांचा कल असला, तरी त्यांनीं परिगणित केलेल्या विशेषांवरूनहि रोमँटिसिझमच्या सत्यस्वरूपासंबंधीं कांहीं वेगळाच बोध होणें शक्य आहे. ल्यूकास यांनीं प्रातिनिधिक अशा अनेक रोमँटिक काव्यपंक्तींचें पृथक्करण करून पुढील ' गुणधर्म ' हे रोमँटिक वाङ्मयांत सातत्यानें आढळणारे गुणधर्म म्हणून निवडून काढले आहेतः—

(1) Romoteness, (2) Delight of desolation, (3) Silence, (4) The supernatural, (5) Dreariness, (6) Vampirine love, (7) Stolen trysts, (8) Death of beauty, (9) Horrors and sadistic cruelties, (10) Death, (11) Madness, (12) Holy Grail, (13) Battles on the Border, (14) The love of the Impossible.

यांतील प्रत्येकाला मराठी प्रतिशब्द देत बसणें आपल्या विवेचनाला फारसें आवश्यक नाहीं. स्थूलमानानें असें म्हणतां येईल कीं ( १ ) भयाण एकलेपणा, (२) प्रिय व्यक्तींची निर्दयता; किंवा निर्दय व्यक्तींच्या ठिकाणीं बसलेलें दुर्दैवी प्रेम, ( ३ ) अप्राप्य प्रेयस्, ( ४ ) प्रिय वस्तूचा नाश, ( ५ ) मतिभ्रंश, ( ६ ) प्राणांतिक साहस, ( ७ ) चोरट्या भेटी, यांसारख्या भावनांचा आणि घटनांचा अशा वाङ्मयांत अन्तर्भाव होतो. अशा भावनांच्या आवडीला एक तर वाङ्मयीन विकृति म्हणतां येईल, किंवा प्रथम दर्शनीं विकृत--निदान विचित्र—दिसणाऱ्या या वाङ्मयीन वेडाचें मूळ अधिक खोलांत कोठें आहे कीं काय हें तरी पाहावें लागेल.

" Such are some of the spirits, fair or grotesque called up for me by the word 'Romance'. —Some of the things for which we are told. 'There is no place in literature.' "

या शब्दांत ल्यूकास यांनीं केलेल्या गाऱ्हाण्यावरून युरोपीय टीकाकारांस या विचित्र प्रवृत्तीच्या मीमांसेंत होणाऱ्या यातनांची कल्पना येईल.

एका विशिष्ट कालखंडापासून वाङ्मयांत कांहीं चमत्कारिक वैशिष्ट्यें प्राचुर्यानें आढळूं लागलीं; आदर्श वाङ्मयाच्या आणि निर्दोष विचारांच्या कल्पनांशीं त्यांचा कांहींच संबंध दिसत नव्हता; आणि तरीहि त्यांची पकड मात्र मानवी मनावर असाधारण होती. अशा या मूलभूत प्रवृत्तीची मीमांसा केवळ एका कालखंडांतील वाङ्मयविशेषांच्या अनुरोधानें केल्यास ती अपुरी आणि एकदेशीय झाल्यास नवल नाहीं.

' रोमँटिक ' विशेषांच्या पृथक्करणांतून कांहीं सामान्य मूलप्रवृत्ती काढण्याचे प्रयत्नहि अनेक पंडितांनीं केले आहेत. वर दिलेल्या स्फुट विशेषांच्या यादीहून या मूल प्रवृत्ती अर्थातच अधिक सूचक व मूलगामी आहेत. " Addition of strangeness to beauty " हें पेटर याचें सूत्र प्रसिद्धच आहे. पण सौंदर्यांत वैचित्र्याची आणि अद्भुततेची भर घातल्यानें मानवी मनाची कोणती विशिष्ट भूक भागते, हें या सूत्रावरूनहि लक्षांत येईलच असें नाहीं. उलट मानवी सौंदर्य असो कीं वाङ्मयीन सौंदर्य असो, त्यास रचनाकौशल्य, नियमबद्धता व परंपरापालन यांनींच पूर्णता येते, असें समजण्याकडेहि मानवी मनाचा कल आहे. वॅट्स्डंटन् यांचें " The Renascence of Wonder " हें सूत्र त्याहूनहि सूचक व खोल आहे. कुतूहल व आश्चर्यभावना








यांचा पुनरवतार जर "रोमँटिसिझम्" या प्रवृत्तीनें सूचित होत असेल, तर मानवी जीवनांत आणि कलेंत आश्चर्यभावनेचें स्थान प्रथम निश्चित केलें पाहिजे. सृष्टिसौंदर्य, पराक्रम, विभूतिमत्त्व आणि मानवी सौंदर्य यांच्या दर्शनानें स्तिमित होणें, हें प्रगल्भतेचें लक्षण नसून पोरकटपणाचें लक्षण होय असें मानणारा पक्षहि टीकाकारांत असणारच. तसेंच कलेंतहि परिचित आदर्शांचें स्मरण करून देण्याचें ध्येय कलाकारानें पुढें ठेवावें कीं अपरिचित सौंदर्याच्या दर्शनानें स्तिमित व अस्वस्थ करण्याचें ध्येय ठेवावें हाहि प्रश्न मूलभूत प्रवृत्तींचाच होय. रोमँटिसिझम् हा भावनापूजक संप्रदाय होय तर क्लॅसिसिझम् हा बुद्धिपूजक संप्रदाय होय असेंहि या वादाचें सार काढण्यांत आलें आहे. कोणा[1] विवेचकाला अतिरेक हें रोमँटिसिझम्चें सर्वस्व वाटलें आहे, तर कोणी[2] रोमँटिक वाङ्मयप्रवृत्तीला वाङ्मयीन अहंकाराचा आवेग ठरविलें आहे. जर्मन कवि हाइन् यानें ठरविलेलें "Reawakening of the middle ages" हें स्वरूप इतर अनेकांच्या मतांशीं जुळण्यासारखेंच आहे. पण शेलि, ब्राउनिंग, ग्यटे यांच्या प्रतिभेची मीमांसा या सूत्रानें करणें कठिण आहे.

रोमँटिसिझम्ची व्याख्या करणें अशक्यप्राय आहे असें कबूल करूनहि ल्यूकास यांनीं अखेर पुढील व्याख्या करण्याचें 'धाडस' केलें आहे—

"If I had to hazard an Aristotelian definition of Romanticism it might run—"Romantic literature is a dream-picture of life, providing sustenance and fulfil_ment for impulses cramped by society or reality"

या व्याख्येंत वर्णिलेलें रोमँटिसिझमचें स्वरूप कोणताहि जातिवन्त रोमँटिक मान्य करणार नाहीं. रोमँटिक व रोमँटिसिझम् या शब्दांना त्यांच्या विरोधकांनीं चिकटवलेल्या अनेक अर्थांमध्यें "सत्य-सृष्टीच्या बीभत्सतेला भिऊन स्वप्नसृष्टींत दडून बसण्याची प्रवृत्ति" हा अर्थ प्रमुख आहे. आजच्या कम्युनिस्टाला जेव्हां एकादी राजकीय योजना अगर मतप्रणाली कुचकामाची ठरवावयाची असते तेव्हां तो तिला ("Sheer Romanticism") 'शुध्द स्वप्नवाद' असें म्हणतो. शेलि, कीट्स्, ग्यटे, ब्लेक यांसारखे कवी खोट्या स्वप्नचित्रांत रमून जाऊन, दुःखमय जीवनाचा विसर पडावा म्हणून धडपडत होते, असें म्हणणें म्हणजे त्यांच्या वाङ्मयाचें आणि जीवनाचें रहस्यच नाकारण्यासारखें आहे.

अर्थात् हें मध्ययुगीन वातावरण, हें प्रेमवेड, हें निसर्गप्रेम, हा अहंकार, हा परंपराविरोध, या सर्व बाह्य लक्षणांचें सर्वैकष मूळ दुसऱ्या एकाद्या खोल प्रवृत्तींत असलें पाहिजे. आणि हें खोल मूळ ल्यूकाससारख्यांनीं निवडलेल्या उदाहरणांतूनच काढून दाखविणें अशक्य नाहीं.

रोमँटिक हा शब्द उच्चारतांच ज्या अनेक कव्युक्ती ल्यूकास यांस आठवल्या त्यांत इमर्सनचा पुढील उताराहि आहे:—

"It is an odd jealousy; but the poet finds himself not near enough to his object. The pine tree, the river, the bank of flowers before him, does not seem to be nature. Nature is still elsewhere. This or this, is but outskirt and far off reflection and echo of the triumph that has just passed by and is now at the glancing splendour and heyday, perchance in the neighbouring fields, or, if you stand in the fields, then in the adjacent woods. The present object shall give you this sense of stillness that follows a pageant that has just gone by. What splendid distance, what recesses of ineffable pomp & loveliness in the sunset! But who can go where they are, or lay his hands or plant his foot there-on? Off they fall from the round world for ever and for ever."

1 Blake

2 "Blind wave of literary egotism" Brunnetier








# सौंदर्यवाद आणि गूढवाद

या गद्यकाव्यांत रोमँटिक मनाच्या निसर्गविषयक वृत्तीचें जितकें यथार्थ चित्र रेखाटलेलें दिसेल, तितकें अन्यत्र क्वचितच दाखवितां येईल. ॲबरक्रोम्बी यांनी 'Tis distance lends enchantment to the view!" ही काव्यपंक्ति रोमँटिक वृत्तीचें परिमाण (Measure) म्हणून घेतली आणि तत्पूर्वीच्या वेगवेगळ्या कवींच्या दूरस्थ दृश्यासंबंधींच्या प्रतिक्रिया तोलून दाखविल्या. कॅम्पबेल याच्या या एका ओळींत ॲबरक्रोम्बी यांस रोमँटिसिझमूचा जणूं अर्कच हातीं गवसल्याप्रमाणें भासलें. त्यांच्या मतें रोमँटिसिझमूमधील निसर्गविषयक वृत्ति तरी या ओळींत जितकी केंद्रित झाली आहे तितकी दुसऱ्या कोणत्याहि 'एका' ओळींत सांपडणें कठिण. कारण, रोमँटिक कवींची निसर्गविषयक वृत्ति ही प्रायः दूरस्थ निसर्गदृश्यासंबंधींच्या ('View'संबंधींच्या) त्यांच्या भावनात्मक प्रतिक्रियेंतच अन्तर्भूत होते. आणि दूरस्थ दृश्यासंबंधींची त्यांची वृत्ति त्यांच्या जीवनविषयक दृष्टिकोणाचीहि द्योतक आहे. या वृत्तींतील कॅम्पबेलचा पूर्वगामी जो स्क्लिंग त्याच्या मतें "आपल्या प्रीतीचा विषय झालेल्या वस्तूचा साक्षात् परिचय करून घेण्याच्या भानगडींत पडूं नये, प्रियवस्तूच्या चिंतनावरच भर द्यावा." तदनंतरच्या कॅम्पबेलादि मंडळींनीं त्यांतून पुढील जीवनविषयक सिद्धान्त बसविला: "मन बाह्य विषयापासून परावृत्त करून स्वतःवर केंद्रित केल्यानेंच जीवनांत संतोषाची प्राप्ति होण्याचा संभव अधिक."

ॲबरक्रोम्बी यांच्या मतें मनाला लागलेलें हें वळण ('Habit of mind') म्हणजेच रोमँटिसिझम्. ॲबरक्रोम्बी यांनीं कॅम्पबेलच्या निसर्गविषयक वृत्तींतून काढलेला हा निष्कर्ष भारतीय अभ्यासकाला वैराग्य आणि योगसाधन यांच्या अधिक जवळचा वाटेल.

"योगश्चित्तवृत्तिनिरोधः" या पतंजलीच्या प्रसिद्ध सूत्रांत मानसिक समाधानाचा हाच मार्ग सांगितलेला आहे. सौंदर्यवादी (Romantic) कवी आणि काव्यें यांचा परिचय असणाऱ्या अभ्यासकास मात्र वृत्तिनिरोध आणि सौंदर्यासक्ति यांत मूलतःच विरोध वाटेल. अर्थात् कॅम्पबेलच्या उपरिनिर्दिष्ट पंक्तींत ॲबरक्रोम्बींना भासल्याप्रमाणें रोमँटिसिझमूचें जीवनसर्वस्व उतरलें तरी नसेल, नाहीं तर ॲबरक्रोम्बी यांना कॅम्पबेलच्या दूरस्थ दृश्यासंबंधींच्या वृत्तींत आढळलेला जीवनविषयक दृष्टिकोण तरी चुकीचा असेल.

तथापि ॲबरक्रोम्बी यांनीं निवडलेली, कॅम्पबेलसारख्या सामान्य प्रतीच्या कवीची सुप्रसिध्द काव्यपंक्ति या विवेचनाला अनेक दृष्टींनीं उपयुक्त आहे यांत मात्र शंका नाहीं. दूरस्थाबद्दल हुरहूर व जवळच्याबद्दल भीति अगर अप्रीति ही रोमँटिक मनाची एक प्रसिद्ध आणि परिचित वृत्ति आहे. प्रेमविषयक रोमँटिसिझमूनें मराठींत ज्या कवींच्या काव्यांत परमोच्च शिखर गांठलें, ते माधव ज्यूलियन अगर माधवराव पटवर्धन एके जागीं म्हणतात,

सखये मजपासुनी दुरी  
असशी तूं परि हें न वाउगें.  
दुरुनी दिसतेस देवता  
जवळूनी दिसशील तूं कशी ? ॥

बहुतेक सर्वच आधुनिक मराठी कवींची प्रेमविषयक वृत्ति रोमँटिक् संप्रदायांत मोडणारी आहे; पण इंग्रजी टीकाकारांनीं, विशेषतः ॲबरक्रोम्बी यांनीं केलेल्या रोमँटिसिझमूच्या मीमांसेस माधव ज्यूलियन् यांच्या या ओळी फारच जवळच्या आहेत. तथापि कॅम्पबेलादि कवी प्रिय दृश्यासंबंधीं आणि माधव ज्यूलियनसारखे कवी प्रिय व्यक्तीसंबंधीं ज्या वृत्तींत आणि सुरांत बोलतात त्यांची मीमांसा प्रत्यक्ष त्यांच्या वचनांवरूनहि करतां येणार नाहीं. त्यांच्या पिपासेचें नक्की स्वरूप, त्यांच्या दुःखार्ततेचें नक्की मूळ, त्यांचें त्यांनाहि कळलेलें नसतें. क्वचित् हेच कवी अन्यत्र आपल्या सुखदुःखांचें, आर्ततेचें, आकर्षणविषयाचें स्वरूप अधिक यथार्थतेनें वर्णन करतात, तर क्वचित् आपल्या या आर्ततेंतून एकादा गुजवी जीवनसिद्धान्त काढून मोकळे होतात. माधव ज्यूलियन किंवा कॅंपबेल म्हणजे कांहीं तत्त्ववेत्ते नव्हत आणि त्यांच्या विविध उद्गारांत त्यांच्या जीवनानुभूतीची उत्कटता अगर स्पष्टता सारखीच आढळेल असेंहि नव्हे. 'प्रिय व्यक्तीपासून दोन पावलें दूर असण्यांतच अधिक आनंद !' असा निष्कर्ष

1 "A sort of attar of Romanticism."

माधव ज्यूलियन यांनी[१] उपरिनिर्दिष्ट ओळींत काढला आहे; तर अन्यत्र तेच म्हणतात,

" जर उन्नती तव दर्शनें, जर सद्गती तव चिंतनें।
तर कां भवास वृथा भिणें ? लपणें कुठे गिरिकंदरीं ?"

येथेंहि ॲबरक्रोम्बी यांच्या सिध्दांताप्रमाणें अप्राप्त वस्तूच्या चिंतनापासूनच्या आनन्दावरच भर आहे. तथापि दोन ठिकाणच्या वृत्तींत महदंतर आहे. एका कवितेंत प्राप्तीमुळें भ्रमनिरास होईल अशी भीति व्यक्त केली आहे, तर दुसरींत प्रत्यक्ष प्राप्तीच्या अभावीं नुसत्या चिंतनानेंहि जीवन सफल होईल, वैराग्याची अथवा नैराश्याची गरज नाहीं, असें कवीनें प्रतिपादिलें आहे.

'बालोन्मत्तपिशाच 'वत् गाणाऱ्यावरळणाऱ्या या कवींच्या परस्परविरोधी वृत्तींतलि सामान्य सूत्र काढण्याकरितां त्यांच्या उद्गारांपलीकडे थोडें गेलें पाहिजे. आणि हें कार्य स्वतः रोमँटिक कवि तर करूं शकणारच नाहीं, कारण तो एकेका वेळीं एकेका रंगानें रंगलेला आढळणार; पण हें कार्य स्वतः रोमँटिक नसलेला आणि बाहेरून रोमँटिक वृत्तींचें ( अगर विकृतींचें ! ) निदान करणारा विश्लेषणपटु आधुनिक टीकाकारहि करूं शकणार नाहीं ! व म्हणूनच इमर्सनसारख्या कवितत्ववेत्याच्या उपरिनिर्दिष्ट मीमांसेचें या विवेचनास विशेष महत्त्व आहे.

निसर्गाच्या सान्निध्यांत रोमँटिक कविमनांत कोणत्या वृत्ती उसळतात ? मानापमान नाटकाच्या नायिकेला प्रियकराच्या गळ्यांतील हाराचा जसा राग येतो, प्रत्येक प्रियकराला प्रथम वस्त्रांचा आणि नंतर प्रत्यक्ष पार्थिव शरीराचाहि, निःशेष सायुज्यतेच्या वाटेंत, जसा अडथळा होतो, तसाच कांहींसा राग रोमँटिक कवीला पार्थिव आणि प्रत्यक्ष निसर्ग पाहून येतो असें म्हणावें लागेल. प्रत्यक्ष दिसणारे लतावृक्ष, प्रत्यक्ष समोर दिसणारा नदीकांठ, हे सर्व निसर्गाचे अवयव आहेत, ( किंबहुना अवशेष आहेत ! ) पण निसर्ग कोठें आहे ? ज्याची ओढ या दृश्यांनीं रोमँटिक मनांत अधिक तीव्र होते, त्याचीं हीं केवळ अस्फुट आणि विकृत प्रतिबिंबें होत. प्रिय वस्तूच्या ओढीनें धांवत यावें, तिच्या सान्निध्यांत पोहोचावें, आणि ती वस्तु होती त्याहूनहि दूर भासावी,— अशी ही मायामृगया भासूं लागते व कवीची आर्तता अधिकच वाढूं लागते !

इमर्सनकृत उपरिनिर्दिष्ट मीमांसेंत निसर्गाच्या मृगयेंतलि या चमत्कारिक चुकामुकीचें—या विचित्र वंचनेचें—या " Odd jealousy चें " —केलेलें वर्णन इतर सौंदर्यांच्या आणि आनंदांच्या मृगयेलाहि लागू पडेल.

" The poet does not find himself near enough to his object " या इमर्सनकृत गद्यप्राय प्रतिवृत्तांत रोमँटिक मनाच्या सुखांचें, दुःखांचें, आर्ततेचें, निसर्गप्रीतीचें किंबहुना कोणत्याहि रोमँटिक आसक्तीचें जेवढें रहस्य आढळेल, तेवढें ॲबरक्रोम्बी यांनीं निवडलेल्या कोणत्याहि काव्युक्तींत आढळणार नाहीं.

सान्निध्यांतहि अनुभवाला येणाऱ्या या दूरीभावास, प्राप्तीनंतरहि उरणाऱ्या या असंतोषास आयर्विंग बॅबिटसारख्या अमेरिकन् टीकाकारांनीं " Nostalgia ", " Nympholepsy " " Misery-mongering " वगैरे ठरविण्याचा प्रयत्न केला आहे[१]. ॲबरक्रोम्बी, ल्यूकास, यांसारख्या टीकाकारांनीं रोमँटिसिझम्‌संबंधीं इतका विकृत विद्वेष दाखविला नसला, तरी त्यांनाहि त्यांत प्रत्यक्ष जगतापासून पळ काढून काल्पनिक जगतांत लपणेंरमणें येवढेंच दिसतें.

रोमँटिक कवींच्या आंतरिक ओढीच्या मुळाशीं प्रत्यक्ष जगतासंबंधींची भीति आहे कीं अमूर्त आणि अदृश्य जगाच्या सौंदर्यासंबंधीं आकर्षण आहे, या प्राणभूत प्रश्नाचाच विचार मुख्यत्वेंकरून या विवेचनांत करावा लागेल व त्याकरितां पेटर, हाइन्, क्लॅटियर, ल्यूकास, ॲबरक्रोम्बी, वॅट्स्-डंटन् वगैरे मंडळींची सोबत सोडून देऊन इमर्सननें दाखवून दिलेल्या गूढ प्रकाशमय वाटेनेंच आपणांस थोडें अधिक पुढें जावें लागेल.

१ Rousseau and Romanticism.

स्फुट लेख

# श्री. श्रीकृष्णदास जाजू

आमच्या विनंतीला मान देऊन याच अंकांत एका लेखरूपानें श्री. श्रीकृष्णदास जाजू यांनीं आपल्या जीवनविषयक तत्त्वज्ञानाची थोडीशी कल्पना दिली आहे. श्री. श्रीकृष्णदासजी जाजू हे मुंबई प्रांतांतलि वाचकवर्गाला सुपरिचित नसले तरी ते मध्यप्रांतांत तरी निदान अत्यंत महशूर असे सज्जन आहेत. महात्मा गांधीजींच्या थोर, कर्तृत्व-संपन्न व धार्मिक प्रवृत्तीच्या प्रभावळीमध्यें ज्या थोड्या गृहस्थांची गणना करतां येईल, त्यांत श्रीकृष्णदासजी ह्यांना एक महत्त्वाचें स्थान आहे. मध्यप्रांतांतील विचारवंत सूज्ञांस हें माहीत आहे कीं स्वर्गीय श्री. जमनालालजी बजाज हे जाजूजींस किती मान देत असत. असेंहि म्हणतात कीं, श्री. जमनालालजी यांस श्री. जाजूजी यांजकडूनच सार्व-जनिक सेवेचें शिक्षण आणि स्फूर्ति मिळालेली होती आणि म्हणून कै. जमनालालजी त्यांस गुरुस्थानीं मानीत.

श्री. जाजूजी हे महाराष्ट्र चरखासंघाचे एजंट कित्येक वर्षांपासून आहेत. आणि त्यानंतर ते अखिल भारतचरखासंघाचे सेक्रेटरीहि झाले. कस्तुरबा स्मारक ट्रस्टचे अत्यंत सन्मान्य असे ते ट्रस्टी आहेत. कुष्ठरोगनिवारणसंघाचे अध्यक्षहि अनेक वर्षांपासून ते आहेत. अखिलभारतग्रामोद्योगसंघांतहि त्यांस असेंच महत्त्वाचें स्थान आहे. नई तालीम किंवा वर्धा शिक्षणयोजना ह्यांमध्येंहि त्यांचेंच संचालन चालू आहे. वर्धा येथें गांधीजींनीं सुरू केलेलें असें कोणतेंच कार्य नाहीं कीं ज्यांत जाजूजींना महत्त्वाचें पद नाहीं. गांधीजींच्या सर्व प्रकारच्या प्रवृत्ती आणि जाजूजी ह्यांचें नातें पूर्णपणें अभेद्य आहे.

जाजूजींचें वय सध्यां ६५ वर्षांपेक्षां अधिक आहे. ४० वर्षांपेक्षां कांहीं अधिक काळ सार्वजनिक सेवेंतच त्यांनीं व्यतीत केला आहे. उच्च श्रेणीमध्यें LL.B. झाल्यानंतर १९२१ सालापर्यंत त्यांनीं वकीली केली. हे मारवाडी समाजांतील गृहस्थ, अत्यंत हुशार पदवीधर, निरलस व नेकीनें काम करणारे तरुण असल्यामुळें वर्धा येथें त्यांची वकीली भरभराटलेली असावी यांत मुळींच नवल नाहीं. पण गांधीजींच्या असहकाराच्या चळवळीमध्येंच त्यांनीं वकीली सोडून दिली. ज्याप्रमाणें नागपूरच्या कॉंग्रेसपासून श्री. जमनालालजींनीं गांधीजींची प्रेरणा सर्वस्वीं स्वीकारून देशकार्यासच आपणांस वाहून घेतलें, त्याचप्रमाणें श्री. जाजूजी यांनीं देखील १९२१ सालापासून गांधीजींच्या प्रत्येक विधायक कार्यास स्वतःस वाहून घेतलेलें आहे. स्वर्गीय श्री. जमनालालजी हे श्रीमान् श्रेष्ठींचे पुत्र असल्यामुळें ते श्रीमंत होते. पण जाजूजींची स्थिति श्रीमंतीची नव्हती. श्रीमंत त्यांना होतां आलें असतें. पण श्रीमंत होण्याचें त्यांनीं पत्करलें नाहीं. श्री ह्याचा अर्थ भौतिक संपत्ति न करितां श्री याचा अर्थ आध्यात्मिक संपत्ति असा केला तर श्री. जाजूजी ह्यांच्याजवळ ही संपत्ति भरपूर आहे असें म्हण-ण्यासारखें आहे.

श्री. जाजूजी ह्यांच्या सार्वजनिक सेवेचा मह-त्त्वाचा आरंभ मारवाडी शिक्षामंडळापासून होतो. मारवाडी शिक्षामंडळाचे जाजूजी हे मंत्री व श्री. जमनालालजी हे अध्यक्ष होते. जाजूजी हे मंत्री असतांना वकीली करीत. परंतु त्यांच्या कांटेकोर

पणाची, हिशेबीपणाची अशी आख्यायिका आहे कीं, मारवाडी शिक्षामंडळाची दौत, शाई किंवा लेखणी यांचा उपयोग ते आपल्या वकीलीच्या कामांत कधींच होऊं देत नव्हते. सार्वजनिक धन म्हणजे मुलीची मालमत्ता अशी जाजूजींची धारणा आहे. बापास ज्याप्रमाणें मुलीचा पैसा घेणें म्हणजे अक्षम्य व्यवहार वाटला पाहिजे, त्याप्रमाणें सार्वजनिक पैशाची कवडी देखील घेण्यांत परस्वापहरण केल्यासारखें सार्वजनिक काम करणाऱ्यांस वाटलें पाहिजे असा जाजूजींचा दंडक आहे. आणि ह्या त्यांच्या स्वतःकरितां निर्माण केलेल्या कठोर शिस्तीमुळें सार्वजनिक निधि जाजूजींच्या हातीं देणें म्हणजे त्या निधीबद्दल पूर्णपणें निर्धास्त असणें असा विश्वास त्यांनीं सगळीकडे निर्माण केलेला आहे.

१९२१ सालापर्यंत श्री. जाजूजी यांनीं मारवाडी शिक्षामंडळास महत्त्वाचें शैक्षणिक स्थान मध्यप्रांताच्या शिक्षणसंस्थांमध्यें मिळवून दिलें होतें. पण त्यानंतर जाजूजी ह्यांच्या व्यक्तित्वामधून मारवाडी समाजापुरती असलेली सार्वजनिक सेवेची मर्यादा विशाल झाली. सर्व राष्ट्रच त्या सेवेमध्यें अंतर्भूत झालें. अस्पृश्य समाजाचें कार्यहि ह्या सेवेमध्यें आल्यामुळें श्री. जमनालालजी व जाजूजी हे कांहीं काळ मारवाडी समाजास बहिष्कृतव अपांक्त्य झाले! मारवाडी समाजांत सुधारक म्हणून कै. आगरकरांसारखेंच स्थान श्री. जाजूजी यांना द्यावें लागेल.

श्री. जाजूजी हे मारवाडी समाजासच भूषण आहेत असें नाहीं. सर्वच हिंदुसमाजाचे ते भूषण आहेत, असें आमच्या समाजानें जाणून घेतलं पाहिजे. डॉ० खरे ह्यांचे मंत्रिपदासंबंधीं प्रकरण झाल्यानंतर श्री. श्रीकृष्णदास जाजूजी यांनीं मुख्यमंत्रिपद स्वीकारावें अशी त्यांस अनेक वजनदार लोकांकडून गळ घालण्यांत आली होती असें म्हणतात. ह्या मोहास बळी न पडण्याइतका स्वभावाचा मोठेपणा त्यांच्यामध्यें आहे. मंत्रिपद स्वीकारण्याची पात्रता त्यांच्यामध्यें नाहीं असें नाहीं. सेवेचें मंत्रिपद अनेक वर्षे त्यांच्याकडे आहेही परंतु अधिकाराचें मंत्रिपद त्यांनीं स्वीकारलें नाहीं. अधिकाराकडे व संपत्तीकडे त्यांनीं जाणून बुजून पाठ फिरवलेली आहे.

मारवाडी समाजांत काय किंवा आजकालच्या हिंदुसमाजांत काय संपत्तीस जितका मान आहे, तितका इतर दुसऱ्या कोणत्याहि गोष्टींस नाहीं. 'धनान्यर्जयध्वम्, धनान्यर्जयध्वम्' असा घोष वरपासून खालपर्यंत चालू आहे. परंतु श्री. जाजूजी यांच्या पदीं लक्ष्मी लोळण घालीत असतांना, त्यांनीं तिच्याकडे दुर्लक्ष केलेलें आहे. वैश्य वातावरणांत जन्म झाला असतांहि संपत्तीविषयक कठोर वैराग्य श्री. जाजूजी यांनीं अंगीं बाणून घेतलेलें आहे. ते जन्मानें वैश्य परंतु वर्णानें ब्राम्हण आहेत. आजचीं समाजाचीं मूल्यें बदलविल्याखेरीज स्वतःस आर्य म्हणविणारा आपला समाज उन्नत होऊं शकत नाहीं. हें जाणून घेऊन महात्मा गांधींनीं हीं मूल्यें बदलविण्याचा भगीरथ प्रयत्न चालविलेला होता. म. गांधीजींनीं जागतिक मूल्यें बदलविण्याचा, तीं अधिक पवित्र, उन्नत व अहिंसक करण्याचा जो खटाटोप चालविला होता त्यामध्यें त्यांस श्रीकृष्णदासजी जाजू ह्यांच्यासारख्यांचें साहाय्य आहे. जें सत्र किंवा यज्ञ गांधीजींच्या अधिपत्याखालीं हिंदुस्थानांत चालू झाला, त्यांत श्रीकृष्णदासजी जाजू ह्यांनाहि पौरोहित्य मिळालेलें आहे. श्रीकृष्णदासजी जाजू कांहीं काळ गांधी सेवासंघाचे अध्यक्षहि होते.

जाजूजी यांचा स्वभाव बाह्यात्कारीं कठोर असा वाटतो. पण त्यांच्याशीं परिचय झाल्यानंतर ते अंतर्यामीं मृदु आहेत अशी प्रचीति आल्याशिवाय रहात नाहीं. जाजूजी भक्तिमार्गी नाहींत ते ज्ञानमार्गीहि नाहींत. ते कर्मयोगी आहेत. संपत्तिविषयक जी अनासक्ति, वैराग्य, कठोरवृत्ति, काटेकोरपणा, न्यायनिष्ठुरता त्यांनीं अंगीं बाणून घेतलेली आहे तीच वृत्ति त्यांच्या कर्मयोगांतही दाखीत झालेली आहे. ते वागण्यांत तुटक, व्यवहारी, अलिप्त, कामापुरता संबंध आणणारे, निरलस, असे दिसतात. पण हे स्वभावविशेष देखील त्यांच्या तत्त्वज्ञानाचाच एक भाग आहेत.

—ह. कृ. मोहनी.








# चालूं दे जयनाद—

चालूं दे जयनाद ! मेघपटलें भेदून टाका नभीं
ऐकोनी बुजतील दिग्गज असा आतां झडो दुंदुभी
झाले राक्षस संगरांत विजयी ! चारी युगांची तृषा
झाली शांत. प्रकाश हा हरपला... आतां सुखाची निशा ॥ १ ॥

आतां यापुढतीं उठेल कुठुनी तो क्षीण शांत स्वर !
पूर्वेला उगवेल काय फिरुनी शीतांशु तो भास्कर ?
या आतां—तुडवा खुशाल जगता—मानव्य मारा—चला
उन्मादें ध्वज रक्तलांछित धरा उंचावरी आपुला ! ॥ २ ॥

रक्ताची निववा तहान अपुली—झाल्या दिशा मोकळ्या
आतां ती बिसतंतुगुंफित नसे हातामध्यें शृंखळा !
आक्रोशें नच ऊर्ध्वबाहु कुणिही रोधील याच्यापुढें.
द्वेषाचा जय जाहला—धडधडां रे वाजवा चौघडे !! ॥ ३ ॥

मांडा तांडव—सिंधुला गगनिंचा आतां भिडो चांदवा—
तारूं हें खडकावरी थडकवा किंवा तळीं घालवा—
विश्वस्पर्शि करांत दीप धरुनी कोणी इशारा न दे...
दीपस्तंभ अम्हीं पुरा बुडविला आहे समुद्रामधें ! ॥ ४ ॥

घ्या ही शस्त्रमशाल—पेटवुनि ही लावीत आगी चला
सारी मानवसंस्कृती धडकवा—थांबूं नका आजला !
नाहीं तो मृदु प्रत्यवाय उरला, भेदावयातें ' अणू '
स्फोटांच्याच सुरांत सूर मिळवूं अन् मृत्युगीतें म्हणूं ! ॥ ५ ॥

' निर्मी मातिमधून मानव ' म्हणे ! हा केवढा विक्रम !
आम्ही ' मानवता धुळीस मिळवूं ' ऐसा करूं व्युत्क्रम
आम्ही आज तया पुरून उरलों—झाला पराभूत तो
सूडाची बघतांच चूड—विझला कीं शांतिचा दूत तो ! ॥ ६ ॥

कामक्रोधहि जिंकिले ? परि तयें आम्हां कुठें जिंकिलें ?
त्यानें मत्सर मारिला ? परि अम्ही मारून त्या टाकिलें !
तो सर्वज्ञ कसा ? तया कुटिलता ना आमुची ठाउकी !
मोठा बुद्ध असेल तो—परि जगीं निर्बुद्ध होतांच कीं !! ॥ ७ ॥

शांत्युद्गायक, सत्यदीपक, तसा होता अहिंसाव्रती
प्रेमाचा नवधर्म तैं शिकविला—शत्रू नसे त्याप्रती—
आहे माहित ! या कृतघ्नवर हो—या वीर हो ! या पुढें
बोला रे जय आपुला नि वडवा उन्मत्त हे चौघडे ! ॥ ८ ॥

—वसंत बापट.








# महात्माजी गेले! पण हिंदुस्थानला अमर करून गेले!!

म० म० द. वा. पोतदार.

' सकल पृथ्वी आंदोळली । धर्म गेला । '

गेल्या जनेवारी महिन्याच्या तिसाव्या तारखेस प्रार्थनेला जात असतां महात्मा गांधींच्याच एका देशबांधवानें त्यांच्यावर अघोरी अत्याचार केला आणि गांधीजींचा अंत झाला! आणि एका घटकेंत ' सकळ पृथ्वी आंदोळली! धर्म गेला! ' असा दुःखाक्रोश पृथ्वीच्या कानाकोंपऱ्यांतून उठला!! आजवर कधीं दिसलें नव्हतें असें अद्‌भुत दृश्य दिसलें !!!

## मनूचे अभिमानोद्‌गार सार्थ

या दृश्यानें गांधींची महती आणि लोकप्रियता तेवढ्याच दिसून आल्या असें नाहीं तर ज्या भारताच्या सेवेसाठीं गांधीजींनीं सतत तीस वर्षें काया कष्टविली त्या भारताला जगाच्या बाजारांत किती उच्च पद लोक देऊं लागले आहेत याचें प्रत्यक्ष प्रमाण दिसून आलें. हिंदुस्थानला बाहेरच्या सुधारलेल्या जगांत हिंदुस्थानांतल्या बावांवरून, हत्तींवरून किंवा सापांवरून ओळखण्याचा एक काळ होता. पुढें काश्मीरांतील नंदनवन, हिमालयावरील गौरीशंकर अथवा आग्रा येथील ताजमहाल यांच्यावरून जरा जवळून त्याची ओळख होऊं लागली. पण एकाद्या देशाची खरी ओळख त्यांतील विद्यमान थोर पुरुषांच्या थोरवीची जी उंची जगांत लागते तीवरूनच जग ठरवितें. अलीकडे अलीकडे हिंदुस्थान म्हणजे रवीन्द्रनाथ ठाकुरांचा देश किंवा गांधींचा देश म्हणून कौतुकानें जग हिंदुस्थानची ओळख करून घेऊं लागलें होतें! आज त्याच कौतुकाची आदरांत परिणति होऊन तेंच जग नम्र होऊन गांधींना आणि त्यांच्या भारताला श्रद्धांजलि अर्पण करीत आहे. मोठमोठीं राष्ट्रें त्यांच्या सन्मानार्थ आपलीं निशाणें उतरवीत आहेत! मोठमोठ्या राष्ट्रांचे नायक, पुढारी, विद्वान् आणि धुरीण गांधीजींच्या मृत्यूमुळें मानवतेच्या आणि शांतीचा एक महान् अद्वितीय पुरस्कर्ता हरपला आणि सर्व जगाची मोठी हानि झाली म्हणून शोकोद्गार प्रकट करीत आहेत! हा केवढा चमत्कार ? ही केवढी अपूर्व क्रांति ? हा चमत्कार आणि ही क्रांति यांचा कर्ता महापुरुष म्हटला म्हणजे महात्मा गांधी, हें कोणाहि निःपक्षपाती माणसास मान्य करावेंच लागेल. आतां जगाच्या पटावर हिंदुस्थान पुनः अभिमानानें चमकूं लागला. ता. १५ ऑगस्ट १९४७ रोजीं त्याचें नांव जगाच्या सन्माननीय पटावर दाखल झालें आणि ता. ३० जानेवारी १९४८ रोजीं म्हणजे अवघ्या सहा महिन्यांच्या आंतच महात्माजींनीं आपलें बलिदान केलें! महात्माजी गेले ! पण हिंदुस्थानला अमर करून गेले!! पूर्वी मनूनें जो अभिमानोद्गार एकदां या भारतासंबंधानें काढला होता तो आज सार्थ होणार असा स्पष्ट रंग दिसूं लागला—'स्वं स्वं चरित्रं शिक्षेरन् पृथिव्यां सर्वमानवाः ।'

असा हा चमत्कार गांधीजींनीं अवघ्या तीस वर्षांत करून दाखविला. या काळांत त्यांनीं तीन युद्धें पाहिलीं. पहिलें आफ्रिकेंतील बोअर युद्ध, दुसरें मागचें महायुद्ध आणि तिसरें परवांचें प्रलययुद्ध !! आफ्रिकेंतील काळांतच त्यांच्या विचारांची आणि आचारांची जुळणी झाली. त्यांची जीवननिष्ठा या काळांतच जन्माला येऊन हळूहळू परिणत झाली.








आपल्या अनुभवांना ' सत्याचे प्रयोग ' असें नांव त्यांनीं दिलें होतें आणि हे त्यांचे प्रयोग आफ्रिकेंत सुरू होऊन हिंदुस्थानांत विविध स्वरूपांत आणि विस्तृत क्षेत्रांत त्यांच्या आयुष्याच्या शेवटच्या क्षणापर्यंत चालू होते.

## सर्वोदयाचा साक्षात्कार

या प्रयोगाचे कामीं त्यांस ज्या एका थोर ग्रंथाचें परिणामकारक मार्गदर्शन झालें तो ग्रंथ म्हटला म्हणजे प्रख्यात इंग्लिश ग्रंथकार रस्किन् याचा 'अन्टु धिस् लास्ट' हा ग्रंथ होय. गांधींचे आफ्रिकेंतील मित्र पोलाक यांनीं ' सहज वाटेंत वाचून होईल; तुम्हांला आवडेल ' म्हणून या ग्रंथाची प्रत गांधीजींना वाचावयास दिली. या प्रसंगाचें वर्णन गांधीजी स्वतः आपल्या आत्मकथेंत येणेंप्रमाणें करतातः—

' आ पुस्तकने लीधा पछी हुं छोडीज न शक्यो. तेने मने पकडी लीधो ' !

प्रवास चोवीस तासांचाच होता पण पुस्तक कांहीं हातचें खालीं ठेववेना. वाचल्यावर सारी रात्र त्यांना झोंप आली नाहीं आणि पुस्तकांतील विचार अंमलांत आणण्याचा निश्चय गांधीजींनीं केला. गांधीजी लिहितातः—

**' मारी जिंदगीमां तत्काल महत्त्वनो रचनात्मक फेरफार कराव्यो एवुं तो आ पुस्तकज कहेवाय '**

आपल्या जीवनावर येवढा महत्त्वाचा परिणाम घडवून आणणाऱ्या या पुस्तकाचें भाषांतर गांधीजींनीं ' **सर्वोदय** ' या नांवानें छापून प्रसिद्ध केलें.

रस्किन्च्या प्रेरणेनें 'सर्वोदया'चीं जीं तत्त्वें किंवा जे सिद्धांत गांधीजींनीं निश्चित केले ते पुढीलप्रमाणें:—

' सर्वोदय'ना सिद्धान्तो हुं आम समज्योः—

१ **"बधाना भलामां आपणुं भलुं रहेलुं छे."**

( सर्वांच्या कल्याणांत आपलें कल्याण सामावलेलें असतें. )

२ **"वकील तेमज वाळंद बन्नेना कामनी किंमत एकसरखी होवी जोइए, केमके आजीविकानो हक बधाने एकसरखो छे."**

( वकील असो कीं न्हावी असो, दोघांच्या कामाची किंमत एकसारखी झाली पाहिजे; कारण कीं उपजीविकेचा हक्क सर्वांना एकसारखाच आहे. )

३ **" सादुं मजुरीनुं, खेडूतनुं जीवनज खरुं जीवन छे. "**

( साध्या मजुराचें, खेडवळाचें जीवनच खरें जीवन होय. )

— मूळ गुजराती 'आत्मकथा',
द्वितीय खंड, पृ. ७५.

ज्या वेळीं दृढनिश्चयी आणि कार्यकर्त्या थोर पुरुषांच्या आयुष्यांतील मूलभूत प्रेरणा निश्चित निष्ठेचें रूप पावते तीच त्यांच्या आयुष्यांतील खऱ्या साक्षात्काराची वेळ म्हणण्यास कांहीं चिंता नाहीं. इ. स. १९०४च्या एका सकाळीं वर दिल्याप्रमाणें साक्षात्कार गांधीजींना झाला. कारण, रस्किन्च्या प्रेरणेनें गांधीजींच्या ठायीं 'सर्वोदया'चे वरील तीन स्थूल सिद्धान्त ठाम झाले. ग्रंथ वाचून झाला, पण रात्रभर झोंप आली नाहीं; पुस्तकांतील विचार अंमलांत कसे आणावे, प्रत्यक्षांत कसे उतरवावे, या चिंतनांत सारी रात्र गेली. आणि ' सवार थयुं ने हुं तेनो अमल करवाना प्रयत्नमां पड्यो. ' ज्या सकाळीं हा निश्चय गांधीजींनीं केला त्या पवित्र सकाळलाच आम्ही साक्षात्काराची सकाळ म्हणतों.

रस्किन्च्या ग्रंथानें गांधींचा अन्तरात्मा जोरानें जागृत केला इतकेंच; 'सर्वोदया'चीं तत्त्वें कांहीं नवीन होतीं असें नव्हे किंवा गांधीजींनीं तीं नवीन शोधून काढिलीं असेंहि नव्हे. ते म्हणतात, ( आत्मकथा, द्वि. खं. पृ. ७५. )—

" पहेली वस्तु हुं जाणतो हतो. बीजुं हुं झांखी जोतो हतो. त्रीजीनो में विचारज न होतो कर्यो. "

पहिलें तत्त्व गांधीजींना ठाऊकच होतें. दुसऱ्या तत्त्वाच्या प्रकाशाहि त्यांना स्पर्शून गेला होता. पण तिसऱ्याचा मात्र त्यांनीं यापूर्वीं कधीं विचारच केला नव्हता. वास्तविक पाहतां गांधीजी म्हणतात त्याप्रमाणें " पहेलामां बीजी बन्ने समायेली छे. ए मने ' सर्वोदये ' दीवा जेवुं देखाड्युं. " —पहिल्या तत्त्वांत दुसऱ्या दोन्ही तत्त्वांचा समावेश होतोच.









अनुक्रमणिका

म्हणजे तात्पर्य इतकेंच कीं '**सर्वांचें कल्याण**' म्हणजेच सर्वोदय! "सर्वभूतहिते रता:" हें कांहीं नवें तत्त्व नाहीं. आमच्या धर्मग्रंथांत किंवा आमच्या साधुसंतांच्या उपदेशांत तें सर्वत्र आढळून येतें. ऐकण्यास किंवा बोलण्यास तें अत्यंत सोपें आहे आणि दिसण्यांत तर तें कमालिचें साधें आहे. 'सर्वे भद्राणि पश्यन्तु' ही आमची सहस्रों वर्षांची जुनी मंगल घोषणा आमच्या कानींकपाळीं रोज दुमदुमून राहिलेली आहे! पण ती सांगण्यास जितकी सोपी तितकीच आचरण्यास परम कठिण आहे. ती आचरतांनाच तर गांधीजींना गोळी खावी लागली!!

## गुरूचा शोध

रस्किनचा ग्रंथ वाचून मनाचा कांहीं पालट होण्यापूर्वी गांधीजींच्या मनावर ज्यांचे दृढ संस्कार झाले होते असे आणखी दोन पुरुष गांधीजींनीं सांगितले आहेत. एक काठेवाडांतील कवि रायचंद अथवा राजचंद्र. हे गृहस्थ श्रीमंत व जवाहिराचे व्यापारी असूनहि परम धार्मिक होते. यांच्या शिकवणींची छाप गांधीजींवर पडली तिचें वर्णन गांधींच्याच शब्दांत देतों:—"घणा धर्माचार्योना प्रसंगमां हुं त्यारपछी आव्यो छुं, दरेक धर्मना आचार्योंने मळवानो प्रयत्न में कर्यो छे, पण जे छाप मारा उपर रायचंदभाईए पाडी ते बीजा कोई नथी पाडी शक्या" वारंवार गांधीजी आपल्या आध्यात्मिक शंकांचें निरसन या रायचंदभाईकडून करून घेत. हे झाले एक सत्पुरुष. दुसरे कौंट टॉल्स्टॉय् आणि त्यांचे ग्रंथ. रायचंदभाई, टॉल्स्टॉय् आणि रस्किन् या तिघांबद्दल गांधीजी लिहितात, "मारा जीवन ऊपर ऊंडी छाप पाडनार आधुनिक मनुष्यो त्रण छे!" तथापि कोणालाहि गांधींनीं 'गुरु' मानलें नाहीं. गांधी स्पष्टपणें सांगतात, "हिन्दुधर्मे गुरुपदने जे महत्त्व आप्युं छे तेने हुं माननारो छुं." 'गुरु' संस्थेवर गांधीजींचा विश्वास होता. तथापि त्यांनीं कोणाला गुरु केलें नाहीं. ते गुरूच्या शोधांतच राहिले. "मारी ए शोध आज पण चालु छे."

गांधीजींच्या मनाची घडण कसकशी होत गेली याचा पुष्कळ उलगडा गांधीजींनीं आपल्या 'आत्मकथें'त जागजागीं केलेलाच आहे. टॉलस्टॉय् किंवा रस्किन् प्रभृति पाश्चात्य नीतिपुरस्कर्त्यांचे ग्रंथ किंवा बायबल, कुराण प्रभृति अन्य धर्मग्रंथ, तसेंच भागवत आणि भगवद्गीता इत्यादि भारतांतील धर्मग्रंथ यांचें वाचन व मनन गांधीजींनीं लक्ष्यपूर्वक केलें. या सर्व ग्रंथांत भगवद्गीता (हुं सर्वोत्तम ग्रंथ गणुं छुं'!) सर्वोत्तम असा गीतेबद्दल गांधीजींचा अभिप्राय बनला; आणि तोहि गीतेचा आर्नोल्डकृत इंग्रजी तर्जुमा वाचून! पुढें मग मूळ भगवद्गीता हा ग्रंथ गांधीजींचा एक नेहमींच्या पाठांतला ग्रंथ होऊन राहिला!

## भलेपणा हाच पुरुषार्थ

ग्रंथ वाचूनच गांधीजी राहिले नाहींत. मनावर ठसलेल्या तत्त्वांचा अनुभवहि ते आस्थापूर्वक घेत राहिले. या सर्व अनुभवांचा रोख 'सर्वोदया'वरच होता. सर्वोदय व्हावा अशी जर इच्छा असेल तर सर्वांच्या मनांत भलाईची, कल्याणाची प्रेरणा जागृत झाली पाहिजे. जर स्वतःच्या ठायीं ही कल्याणाची मंगल प्रेरणा जागृत झाली तर मग दुसऱ्याच्या चित्तांतहि ती जागृत होऊं शकेल. यास्तव आपल्या ठिकाणीं ही प्रेरणा जागृत करून दुसऱ्याच्या मनांतहि तीच ज्योत पेटविण्यासाठीं प्रथम आपणच भलेपणा अंगीं बाणवून घेतला पाहिजे. रामदासस्वामींनीं '**भलेपणाचा जीर्णोद्धार**' करावा म्हणून उपदेश केला आहे. ईश्वरावर दृढ श्रद्धा, नम्रता, सत्यपूजा, त्याग, इत्यादि साधनसंपदेची जोड आपण करून घेतल्याशिवाय आपणांस हा भलेपणाचा जीर्णोद्धार करतां येणार नाहीं असा गांधीजींना दृढ अनुभव आला. या भलेपणालाच गांधी पुरुषार्थ समजत लोकमान्यांना उत्तर देतांना गांधीजींनीं म्हटलें आहे कीं, "Purushartha is nothing but a desperate attempt to become Sadhu (साधु) i. e. to become gentleman in every sense of the term" —('Young India' by S. Ganesan, page 781.) म्हणजे गांधीजींच्या मतें सर्वार्थानें वा सत्यार्थानें खरा सभ्य पुरुष होणें म्हणजेच साधु होणें होय. आणि हाच त्यांच्या मतें परम पुरुपार्थ होय.

हा परमपुरुषार्थ, हा भलेपणा, ही सभ्यता म्हणजे










सत्यपूजा होय. सत्य हाच ईश्वर होय. 'न्याय तो देव जाणावा । अन्याय दैत्य बोलिजे ॥' इत्यादि श्रीसमर्थांचीं वचनें या प्रसंगीं आठवल्याशिवाय राहत नाहींत. ही सत्यपूजा करणें हाच गांधीजींच्या जीवनांतील हव्यास, त्यांचें मुख्य सूत्र.

## सकलजीवनव्यापी साधना

पण ही सत्यपूजा किंवा ही ईश्वरसेवा करण्यासाठीं गांधीजींनीं साधना जरी केली तरी ती रानावनांत जाऊन, लोकांना सोडून, केली नाहीं; किंबहुना लोकजीवन संपन्न आणि शुद्ध करणें हीच त्यांनीं ईश्वरसेवा मानली. लोकांचें 'ऐहिक' धड करणें हाच त्यांचा हव्यास ठरला. आणि हा हव्यास पूर्ण करण्यासाठींच त्यांना जीवनाचीं सर्व क्षेत्रें व्यापणें अवश्यक वाटलें.

ते आपल्या 'आत्मकथे'च्या या उपसंहारांत हें रहस्य प्रकट करतांना लिहितात (आत्मकथा, द्वितीय खंड, पृ. ३७८–३७९.),

" **सत्यथी भिन्न कोई परमेश्वर होय एवुं में नथी अनुभव्युं.**

**सत्यमय थवाने सारु अहिंसा एज एक मार्ग छे ......**

**मारी अहिंसा साची तोये काची छे, अपूर्ण छे ..........................................**

तेथी मारी सत्यनी झांखी......सूरजना एक किरण-मात्रना दर्शनरूपज छे. एनुं संपूर्ण दर्शन संपूर्ण अहिंसा विना अशक्य छे. ...................

**आवा व्यापक सत्यनारायणना प्रत्यक्ष दर्शनने सारु जीवनमात्रनी प्रत्ये आत्मवत् प्रेमनी परम अवश्यकता छे. अने ते करवाने इच्छनार मनुष्य जीवनना एक पण क्षेत्रनी बहार नथी रही शकतो. तेथीज सत्यनी मारी पूजा मने राज्यप्रकरणमां खेंची गई छे.**

" धर्मने राज्यप्रकरणनी साथे संबंध नथी एम कहेनार धर्मने जाणतो नथी एम कहेतां मने संकोच नथी थतो, एम कहेवामां हुं अविनय नथी करतो. आत्म-शुद्धि विना जीवनमात्रनी साथे ऐक्य नज सधाय.... पण आ शुद्धिनो मार्ग विकट छे. ...... मारे हजु विकट मार्ग कापवानो छे—तेने सारु मारे शून्यवत् बनवानुं छे. ... "

येथवर गांधीजींच्या वचनांच्या आधारें त्यांच्या निष्ठेची रूपरेषा आम्हीं दाखविली आहे. आफ्रिकेंत त्यांनीं सुमारें वीस वर्षें आपली ही निष्ठा अनुभवानें आणि प्रयोगांनीं विकसित केली. त्यांच्या ठिकाणीं ती दृढ झाली आणि पुढें इ. स. १९१५पासून तीसबत्तीस वर्षें त्यांनीं याच निष्ठेच्या बळावर भारताची अशी अपूर्व सेवा केली कीं साऱ्या दुनियेनें त्यांचा एकमुखानें जयजयकार केला !

## गांधी आणि टिळक

गांधीजी अखेरीस हिंदुस्थानांत आले त्या वेळीं हिंदुस्थानांत सर्वांत प्रभावी आणि लोकप्रिय असे जनसेवक लोकमान्य टिळक हेच होते. दीर्घकालीन कारावासांतून ते परत येतात तोंच महायुद्धाचा डोंब उसळलेला होता ! या नव्या परिस्थितीला अनुसरून टिळकांनीं आपल्या जनसेवेच्या कर्मयोगाची दिशा ठरविली. याच वेळीं गांधीजीहि हिंदुस्थानांत येऊन पोंचले. या दोघां धुरंधर लोकसेवकांची जोडी टिळकांच्या मृत्यूपर्यंत हिंदुस्थानला लाभली. उभयतांना लवकरच दिसून आलें कीं त्यांच्या मूलभूत निष्ठांत महत्त्वाचा भेद आहे. या 'टिळक–गांधी' प्रकरणावर इतकीं भाष्यें झालेलीं आहेत तरीहि गांधीजींच्या पश्चात् त्या विषयाची फेरतपासणी करणें अवश्यच होईल. हीं भाष्यें अनेक झालीं असलीं तरी त्यांत निर्भीड आणि निःपक्षपाती भाष्यें कमीच आढळतील. परवांच गांधीजींच्या वधोत्तर इंग्लंडमधील 'मँचेस्टर गार्डियन्' सारख्या विचारप्रधान पत्रांत जें मतप्रदर्शन करण्यांत आलें आहे तें मामुली पद्धतीचें म्हणतां येणार नाहीं. अशीं विचाराला चालना देणारीं भाष्यें आपणांस यापुढील काळांत अधिक उपयोगीं पडतील.

टिळक आणि गांधी यांच्या मूलभूत निष्ठांत भेद होता ही गोष्ट उभयतांच्या लेखांवरूनच सिद्ध आहे. प्रत्यक्ष गांधीजींनींच "I know that we *fundamentally differed* (Young India, page 680) असें स्पष्ट सांगितलें आहे. "He (टिळक) used to challenge my interpretation of life"










(Young India, page 680. ).असा हा मूलभूतच मतभेद होता. गांधींची 'निष्ठा' कशा प्रकारची होती हें मागें सांगितलेंच आहे. 'अक्रोधेन जिने क्रोधम्' ही गांधींची निष्ठा आपणास मान्य नसून 'ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्' ही श्रीकृष्णांची शिकवण आपणास मानवते असें टिळकांचें म्हणणें. (टिळक–पत्र, 'यंग इंडिया,' पृ. ७८४.) या दोन मूलभूत निष्ठांमधील वाद किंवा भेद हा कांहीं नवा नाहीं. "लोकेऽस्मिन्द्विविधा निष्ठा" या गीतावचनांतहि या पुरातन भेदांचा निर्देश आहे. टिळकांना उभय निष्ठांची महती मान्य होती. "Both methods are equally honest and righteous" असें आपलें मत व्यक्त करून त्यांनीं गांधीजींचा अर्धा दावा स्पष्टपणें मान्य केलाच आहे; पण ते म्हणतात, "But the one is more suited to this world than the other." या "व्यवहारी जगांत या दोहोंपैकीं आपण पसंत केलेला अधिक उपयुक्त" असा त्यांचा अभिप्राय होता.

गांधींनीं यावर उत्तर दिलें कीं, 'अक्रोधेना'दि हें बुद्ध–वचन ("Eternal Principle") चिरंतनतत्त्ववाचक असून 'ये यथा मां०' हें वचन त्याच तत्त्वाचा पालनमार्ग सांगत आहे. 'ये यथा मां०'च्या अनुरोधानें 'शठं प्रति शाठ्यम्' हा उपदेश मान्य करण्यास गांधीजी यत्किंचित्‌हि तयार नव्हते; 'शठं प्रत्यपि सत्यम्' हा त्यांचा बाणा होता. टिळकांनीं या सत्यासत्याची सूक्ष्म मीमांसा करतांना पुढील उदाहरण घेतलें होतें:— एक गाय पळते आहे व तिला मारण्यासाठीं पारधी मागें लागले आहेत. वाटेंत एका ऋषीचा आश्रम आहे. 'गाय कोणत्या रस्त्यानें गेली?' असें पारध्यांनीं विचारलें तेव्हां कोडें पडलें. खरें सांगावें तर गाय मरणार, खोटें सांगावें तर पाप लागणार! या धर्मसंकटांत गांधी सत्यच सांगण्याचा आग्रह धरणार तर टिळक 'पंचानृतान्याहुरपातकानि' या न्यायानें या ठिकाणीं खोटें सांगणें पाप नसून तसें करून गाईचा जीव वांचविणें हेंच योग्य व धर्म्य होय असें म्हणणार! गांधी खरें सांगून आपला जीव पारध्यांना अर्पण करण्यासहि कचरणार नाहींत! येथें हें लक्षांत घेतलें पाहिजे कीं **गाईचा जीव वांचविणें** हा प्रधान व अंतिम उद्देश मात्र उभयतांनाहि मान्यच होता. तो उद्देश धर्म्य होता. साधनांतच काय तो मतभेद! एक, पारध्याच्या अंतःकरणाचा पालट घडवून आणण्यासाठीं प्रसंगीं प्राणहि देणार; दुसरा, त्याच्या पापेच्छेचें प्रायश्चित्त त्याला आपल्याच युक्तीनें देणार! एक गाईचे प्राण रक्षून आपलेहि प्राण रक्षिणार! दुसरा आपले प्राण देऊन गाईच्या प्राणरक्षणाचें कर्तव्य ईश्वरावर सोंपविणार!

वरवर दिसतो तितका हा निष्ठाभेद सोपा व साधा नाहीं. जों जों विचार करावा तों तों तो आपलें मन व बुद्धिहि गुंगवून टाकल्याशिवाय राहणार नाहीं. सिंहगडावर गांधी व टिळक दोघांचाहि मुक्काम असतां या विषयावर उभयतांत कसून व मनमोकळी चर्चा झाली. त्या वेळीं सत्य आणि असत्य ह्या कल्पना सापेक्ष कशा आहेत हें टिळकांनीं प्रतिपादिलें. यावरून टिळकांना मायावादाच्या तळाशीं जावें लागलें हें उघड आहे आणि मग तेथें कांहीं गांधींना त्यांना आडवतां आलें नाहीं ('यंग इंडिया' पृ. ६८० पाहा.) हा तात्त्विक मतभेद मिटण्यासारखा नव्हता आणि मिटलाहि नाहीं; तथापि उभयतांचा प्रेमादर यामुळें यत्किंचित्‌हि कमी झाला नाहीं. टिळक जर आणखी जगते तर जगाला एक अद्भुत दृश्य दिसलें असतें. टिळकांचा आणि गांधींचा मोठा कटु विग्रह झाला असता इत्यादि कल्पना आम्हांला निर्मूल वाटतात. अखेरचें साध्य जें 'जनहित' तें दोघांचेंहि एकच असल्यानें आपापल्या मार्गानें पण शक्य तितका मेळ ठेवून उभयतांनीं भारतीय जनतेची शक्ति आणि आत्मप्रत्यय यांची वाढच केली असती.

गांधींचा अपूर्व कर्मयोग, त्यांची अद्वितीय श्रद्धा आणि त्यांचे अद्भुत प्रयत्न यांपुढें कोणीहि नम्रच होईल. ते विश्ववंद्य कोटींतील एक अग्रेसर पुरुष होत यांत कसलीच अतिशयोक्ति नाहीं; पण प्रश्न मात्र मनांत आल्याशिवाय राहत नाहीं कीं, "समजा, परवांचें महायुद्ध झालें नसतें, तर गांधींना आपल्या मार्गानें हिंदुस्थानचें स्वातंत्र्य विनायुद्ध साधण्याची कितीशी शक्यता होती? उलट त्याच स्थितींत








टिळकांनीं तरी या देशाची इंग्रजांशीं प्रत्यक्ष युद्धाला उभें राहण्याइतपत तयारी आपल्या आयुष्यांत केव्हां व कशी केली असती ?"

## भ्याडपणापेक्षां हिंसाहि श्रेष्ठ

येथें वाचकांस थोडी सावधगिरीची सूचना दिली पाहिजे. पुष्कळांची अशी समजूत आहे कीं गांधींनीं स्वतंत्र भारतांत यौद्धिक यंत्रणा तावडतोब मोडून टाकिली असती. तात्त्विक उत्तर म्हणून तसले उद्गार गांधींकडून थोडे बेसावधपणें एका प्रार्थनामंदिराचे प्रवचनाच्या निमित्तानें त्यांना पकडून चर्चापरिषदेंत विलायतेंत कांहीं धूर्तांनीं काढून घेतले होते; तथापि गांधींनीं तसें त्याच वेळीं केलें असतें कीं ज्या वेळीं सर्व देश म्हणजे त्यांतील बहुसंख्य प्रजा त्यांच्या प्राणार्पणीं अहिंसेनें निश्चित उभी राहील अशी त्यांची खात्री पटली असती ! तो काळ तावडतोब आला आहे असें वाटतें तर गांधींनीं १५ ऑगस्टलाच प्राणांतिक उपवास पुकारून साऱ्या भारती फौजांना रजा देविण्याचा हट्ट धरला असता; पण उलट त्यांनीं भारत-सरकारनें काश्मीरांत फौजा पाठविल्या या कृत्याचें समर्थनच केलें. त्यांचे प्रत्यक्ष उद्गारहि या प्रकरणीं यथार्थ निर्णय करण्यास सादर करतां येतील.

एका ठिकाणी (१९१९–१९२२) ते म्हणतात:

(i) "For under Swaraj too I would not hesitate to advise those who would bear arms to do so and fight for the country." (Young India, page 665.)

(ii) "I do believe that where there is only a choice between cowardice and violence, I would advise violence." (Young India, page 260.)

(iii) "*Hence also do I advocate training in arms for those who believe in the method of violence. I would rather have India resort to arms in order to defend her honour than that she should, in a cowardly manner, become or remain a helpless witness to her own dishonour.*" (Young, India page 260.)

पाकिस्तानी मुसलमानांविरुद्ध युद्ध पुकारण्यासहि गांधीजींनीं संमति दिली असती हें यावरून स्पष्ट होईल. तथापि लष्करी युद्धाचा निश्चय करतांना वास्तविक बलाबलाचा आणि सर्व परिणामांचा शांतपणें विचार करून मगच अखेर निर्णय करावा लागतो. कितीहि प्रक्षोभक कारणें घडलीं तरीहि वेळीं सबुरी करणें भाग पडतें. हिंदुस्थानच्या लष्करी तज्ज्ञांचा खरा सल्ला व अंदाज या प्रकरणीं काय होते हें स्पष्ट व साधार कळल्याशिवाय अखेरचें मत बनविणें योग्य होणार नाहीं. तें कांहींहि असो, तूर्त गांधीजींचें तात्त्विक म्हणणें या प्रकरणीं काय पडलें असतें ते त्यांच्या सुमारें पंचवीस वर्षांपूर्वीच्या (इ.स. १९२०च्या) उद्गारांवरून स्पष्ट होतें:—

(iv) "Let me not be misunderstood. I want both the Hindus and Mussalmans to cultivate the cool courage to die without killing. But if one has not that courage, *I want him to cultivate the art of killing* and being killed, rather than in a cowardly manner flee from danger."

गांधीजींच्या वडील चिरंजिवांनीं एकदां त्यांना प्रश्न केला होता, "इ. स. १९०८ सालीं जेव्हां तुमच्यावर प्राणघातक हल्ला झाला तेव्हां मी जवळ असतों आणि (१) भयानें पळून गेलों असतों किंवा (२) तुमच्या रक्षणार्थ शारीरिक बळाचा उपयोग केला असता, तर तुम्हीं काय पसंत केलें असतें ?" गांधी साफ म्हणतात, "I told him that it was his duty to defend me even by using violence."

## हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचें श्रेय कोणाला ?

आम्ही आतां स्वतंत्र तर झालों. त्यापूर्वी










आमचा मुख्य झगडा गांधीजींच्या नेतृत्वाखालीं त्यांच्या अहिंसात्मक पद्धतीनेंच झाला. युद्ध—मति पक्षाला कांहीं, देशांतील जनता आपल्या बाजूस घेऊन स्वातन्त्र्ययुद्ध लढविण्याची प्रत्यक्ष सिद्धता करतां आली नाहीं; तें काम अवघडच होतें. अशस्त्र प्रजेला अशस्त्र युद्ध करण्याला गांधींनीं उद्युक्त केलें व या युद्धाचें अटळ फळ म्हणून इंग्रजांनीं हरून आणि आमच्या 'चले जाव!'ची दरडावणी ऐकून येथून कूच केलें असा अभिमान पुष्कळच वेळां प्रकट केला जातो. नीट विचार केला असतां त्यांत कांहीं तथ्य निःसंशय आहे; पण संपूर्ण तथ्य मात्र नाहीं. महायुद्धामुळें इंग्रजांची परिस्थिति इतकी बिघडली कीं अशांत आणि विरोधी अशा हिंदुस्थानचें घोंगडें दूर फेंकून निघून जाण्यांतच शहाणपणा आहे हें त्यांनीं ओळखलें आणि सर्व अपमान गिळून, मनांत सोसून, मिळवितां येईल तेवढें दिखाऊ श्रेय पदरीं घेऊन चांगुलपणानें आणि शांतपणें येथून काढता पाय घेतला. हें इंग्रजांचें श्रेय इंग्रजांना न्यायानें दिलेंच पाहिजे. कै० श्री० तात्यासाहेब केळकर यांनीं यांतला न्याय प्रांजलपणानें मान्य केला होता आणि इंग्रजांचा वांटा इंग्रजांच्या पदरीं घातला होता. गांधीजीहि इंग्रजांचें श्रेय इंग्रजांस देण्यास बिलकुल कचरत नाहींत वा भलतेंच श्रेय आपणाकडे संपूर्णपणें ओढून घेत नाहींत. श्रेय त्रिवर्गांचें आहे—इंग्रजांचें, आमचें आणि गांधीजींचें. मानाचा चौथा वांटेकरी आणखी एक धरला पाहिजे व तो म्हटला म्हणजे श्री० नेताजी सुभाषचंद्र. गांधीजींचा आशीर्वाद मागूनच त्यांनीं सेना उभी केली यांतलें मर्म लक्ष्यांत घेण्यासारखें आहे.

## पॉल रिचर्डची पंचवीस वर्षांपूर्वीची भविष्यवाणी

हा वांटा किंवा हें श्रेय इंग्रजांना आज दिलेंच पाहिजे; पण असा प्रसंग येईल असें भविष्य गांधीजींचे —एक मित्र प्रख्यात एम्. पॉल रिचर्ड यांनीं १९२२ त म्हणजे पंचवीस वर्षांपूर्वीं ( यंग इंडियांत ) केलें होतें ही किती कौतुककारी गोष्ट वाटते ! पॉल रिचर्ड यांचा हा छोटा लेख पुनः पुनः वाचावा इतका सुंदर आहे. त्यांत टिळक व गांधी या उभय थोर पुरुषांच्या थोरवीचें मननीय मापन रिचर्ड यांनीं केलेलें आहे. त्यांची भविष्यवाणी अशीः—

" As for freedom of India I have full faith in it. I have unceasingly said that it will come, that it is coming, but perhaps by other ways. *It may come neither by violence nor by non-violence. It may come from England itself*, even as it came to her at the fall of the Roman Empire. For, great changes are impending in England, in Europe, in the whole world. The ways of God are most often the most unexpected ones. It is this way that I expect. What I have always said is that if the national movement does not bring freedom to India, it prepares India for freedom. *It leads to the awakening of the masses; this awakening of the masses to social chaos; this chaos to new creation; this new creation to greatness*—and this greatness will make India ready for and worthy of the freedom which comes to her. "

पॉल रिचर्डची ही पंचवीस वर्षांपूर्वीची भविष्यवाणी अक्षरशः खरी झाली आहे. आमच्याकडून युद्ध होऊन स्वातंत्र्य कांहीं खेंचून आणलें गेलें नाहीं; आमच्या अहिंसक प्रतिकाराला किंवा युद्धाला श्रेय असलें ( आणि तें निःसंशय आहे ) तरी तें मर्यादितच; अखेर स्वातंत्र्याचें उदक इंग्लंडच सोडील असें पॉल रिचर्ड यांनीं म्हटलें होतें व तसेंच झालें. इंग्लंडनेंच तारीख ठरवून तें पुण्य जोडलें !

## 'प्रचंड जनताजागृती'च्या श्रेयाचा मानकरी

आमच्या चळवळी झाल्या आणि महात्मा गांधीजींनीं चाळीस कोटी जनतेचीं हृदयें हलवून सोडलीं ! येवढी प्रचंड जागृति त्यांनीं केली ! या श्रेयाचा










सर्वोच्च वांटेकरी आणि मानकरी तोच महापुरुष! "या प्रचंड जनजागृतींतून प्रथम सामाजिक अराजक उद्भवेल"! आज गांधीजींच्या वधोत्तर हें अराजक आम्ही प्रत्यक्षच अनुभवीत आहों. आणि यापुढें त्याचे नवे नवे पापुद्रे आणि पडदे खुलतील आणि सारी खरूज, सारे खवडे आणि नायटे बाहेर पडतील !! मग मात्र आमचें शरीर दिव्य आणि सुंदर होईल. तेजस्वी आणि जगाला मार्गदर्शक असा नवा भारतीय समाज जगाच्या अग्रभागीं झळकेल— मात्र आज नाहीं, आतां नाहीं—तर उद्यां! महत्पद तेंच ! ! त्या अमरपदावर आमचा हात धरून आम्हांला बसवणारा आणि आम्हांला कृतार्थ करणारा कोण ? तर ज्याच्या नांवानें 'अनामिका सार्थवती बभूव' असें म्हणावें तो, एका वाट चुकलेल्या देशबांधवाच्या गोळीला ज्याचा देह बळी पडला असा सर्ववंद्य महात्मा ! ! !

## हिंदुधर्माचा खरा मार्गदर्शक

असा हा महात्मा स्वतःला 'सनातनी हिन्दु' म्हणवी, हें सकल हिन्दु समाजाचें केवढें भाग्य ! हिंदु समाजाला या महात्म्यानें पुनः सजीव आणि अमर केलें. अवताराचें मर्म सांगतांना तुकोबांनीं एके ठिकाणीं म्हटलें आहे,—

सुख देवी आम्हांसाठीं ।
दुःख आपणची घोटी ॥

या कोटींतला हा धन्य पुरुष म्हणतो,—

"I call myself a Sanatani Hindu because,

(i) I believe in the Vedas, the Upanishads, the Puranas and all that goes by the name of Hindu Scriptures and therefore in avatara and rebirth.

(ii) I believe in Varnashrama Dharma in a sense, in my opinion, strictly Vedic but not in its present, popular and crude sense.

(iii) I believe in the protection of the cow in its much larger sense than the popular.

(iv) I do not disbelieve in idol-worship."

खऱ्या विश्वव्यापक हिंदु धर्माला जर पुनः जगाचें मार्गदर्शन करावयाचें असेल तर महात्मा गांधीजींनीं संपादन केलेले बहुमोल अनुभव, जोडलेली दीर्घ तपस्या आणि जोपासलेली सर्वोदयाची तीव्र आकांक्षा यांचा बहुत उपयोग होईल. सर्व जगाची दृष्टि फिरवून त्यांनीं भारताकडे लावली, ती तेथें स्थिर करणें आपणांकडे आहे. कारण, आतां— महात्माजी गेले !—पण हिंदुस्थानला अमर करून गेले !!

---

## गांधीजींचा मार्ग

नीतिमत्तेच्या दृष्टीनें पाहतां, गांधीजी हे अलौकिक विभूति होत. त्यांचा सत्याग्रहाचा मार्ग हा भावी पिढ्यांना थोर असा वारसा आहे. भांडणें मिटविण्याकरितां त्यांनीं उद्घोषित केलेल्या मार्गामुळें अत्याचाराचा मार्ग मागें पडण्याची नुसती शक्यता आहे येवढेंच नव्हे, तर मानवाच्या विनाश-साधनांच्या वृद्धिबरोबर तो मागें पडलाच पाहिजे. तरच मानवी संस्कृति टिकून राहील.

—सी. ई. एम्. जोड.








# मृत्यूचें मनोगत

आज फारा दिवसांना एक महान् अतिथि येत आहे.

हे अतिथिदेव, तुझें स्वागत असो !

जीवनाच्या सनातन आकांक्षेप्रमाणें माझें हृदय युगानुयुगें तुझी प्रतीक्षा करीत आहे. तरल अशा स्वप्नभूमींतून तूं कितीतरी वेळां माझ्याशीं हस्तांदोलन केलें आहेस;

आणि आज सायंतनींच्या सूर्यप्रकाशांत दृढ आलिंगन देऊन तूं मला पावन करीत आहेस.

तुझ्या रक्तवंबाळ पदयुगलावर विश्व-निश्वासाचें हें अर्घ्य मी समर्पण करीत आहे,

आणि तुझ्या छिन्नभिन्न हृदयाच्या मस्तकावर कोटि सूर्यतेजाचा कीर्ति-मुकुट चढवीत आहे.

हे महात्मन् ! विधि आज कृतार्थ झाला आहे.

बुद्धाच्या विरक्तीनें,

खिस्ताच्या प्रेमधर्मानें,

सॉक्रेटिसाच्या आत्मज्ञानानें,

आणि लिंकनच्या दयार्द्रतेनें

तुझा देह-कमंडलु परिपूर्ण करून तुला भूलोकीं पाठविण्यांत आलें होतें.

पृथ्वीमातेच्या अंकावर विचरतांनाहि तूं 'अहं'ला 'सोऽहम्' म्हणून वाहिलेंस.

आणि आपल्या जीवननिष्ठेनें, भौतिकाच्या बंधनांत जखडून पडलेल्या मानवाच्या आत्म-हंसाला अधिक उंच चढविलेंस.

धुळीनें माखून निस्तेज बनलेल्या मनांना तूं श्रद्धेचा उजळा दिलास,

आणि मानवतेच्या अमूर्त स्वप्नांचें दिव्य-धवल मनोमंदिर उभविलेंस.









## मृत्यूचें मनोगत

हे जीवनवीर ! सद्भावनेचें आवाहन करीत असतां हातीं अमृतकुंभ घेऊन उन्मत्त अधमतेला तूंच आह्वान दिलेंस.

आपल्या क्रूर-विकट हास्यानें धरणीतल कांपवीत अधमतेनें तुझ्यावर झडप घातली;

पण त्या विकट हास्याच्या प्रतिध्वनीनें दचकून ती स्वतःच मूर्च्छित झाली.

हे महामानव ! तुझें देहबंधन आज गळून पडलें आहे !

दिशा धूसर झाल्या आहेत,

आणि मानवतेच्या मुखाची म्लानता आकाशांत पश्चिम-प्रांतीं पसरली आहे.

आणि आतां लवकरच तमाच्या आवरणाखालीं अखिल विश्व बुडून जाईल.

पण ती पहा, मंगल उषा उजळत आहे.

तुझ्या हृदय-कपाटांत बंदिस्थ असलेलें तें दिव्य तेज आपल्या सहस्र धारांनीं इतस्ततः धांवत आहे;

आणि अनेकांच्या हृदयांत तें पुनः बंदिस्थ होईल.

तुझ्या रक्षेच्या कणाकणांतून जीवनाचे असंख्य स्फुलिंग बाहेर पडतील,

आणि तुझ्या स्मृतीचा स्निग्ध नंदादीप मानवतेच्या गाभाऱ्यांत सदैव प्रकाशत राहील.

—र. ग. जोशी

---

## प्रेम हाच जीवनाचा धर्म

गांधीजी सर्व जीवन, सर्व प्राणिमात्र, एक मानतात. त्यांच्या दृष्टीनें जीवनाचें सत्य हेंच होय. प्रेम– सर्व भूतमात्रांविषयीं स्नेहभाव, ऐक्यभावनेचें नियामक तत्त्व– हाच जीवनाचा धर्म आहे. सतत सेवा आणि त्याग यांच्या द्वारा सगळ्यांचें हित साधायचा गांधीजींना ध्यास आणि तळमळ आहे. जेव्हां झगडा उत्पन्न होत असेल, तेव्हां ते सत्याची कांस न सोडितां आत्मक्लेश आपण होऊन स्वतःवर ओढवून घेतात; पण दुसऱ्याला इजा व्हावी असें त्यांच्या मनांतही येत नाहीं. एखाद्या दिशाभूल झालेल्या माथेफिरू बांधवाकडून त्यांस जर मरण येत असेल, तर ते तो आत्म्याचा शरीरावर विजय होय असें मानतील. ते आपल्या मनानें शत्रूचेंही वाईट चिंतीत नाहींत.

श्री. दिवाकर
'गांधीजी' १९४४



अनुक्रमणिका






# क्रांतिकारक धर्मपुरुष म. गांधी

आचार्य शं. द. जावडेकर

" मला जें करायचें आहे, ज्याच्यासाठीं आज तीस वर्षें माझी धडपड चालली आहे, तें म्हणजे आत्मदर्शन, ईश्वराचा साक्षात्कार, मोक्ष हेंच होय. माझी सर्व हालचाल याच दृष्टीनें होत असते, माझें शिक्षण सर्व याच दृष्टीनें चालतें आणि राजकीय चळवळींतहि मी मनोभावानें पडतों तोहि याचसाठीं."

" परमेश्वराच्या व्याख्या अगणित आहेत,... परंतु मी सत्य--स्वरुपी परमेश्वराचाच पुजारी आहें. तो एकच सत्य आहे व इतर सर्व मिथ्या आहे. तें सत्य मला सांपडलेलें नाहीं. मी त्याच्या शोधांत आहें. त्याच्या शोधार्थ मला सर्वांत प्रिय असलेल्या वस्तूंचाहि त्याग करण्यास मी तयार आहें. या शोधरूपी यज्ञामध्यें या शरीराचाहि होम करण्याची माझी तयारी आहे आणि मला शक्तीहि आहे, असा मला विश्वास वाटतो. परंतु त्या सत्याचा साक्षात्कार जोंपर्यंत मला झालेला नाहीं तोंपर्यंत माझ्या अंतरात्म्याला जें सत्यसें वाटतें, त्या भासमान सत्यालाच माझा आधार समजून व तोच मार्गदर्शक दिवा बनवून त्यांच्या आश्रयानें मी आपलें जीवन व्यतीत करीत आहें."

* * *

" माझे प्रयोग संपूर्ण आहेत, असें माझें मुळींच म्हणणें नाहीं. एखादा शास्त्रज्ञ ज्याप्रमाणें आपले प्रयोग अतिशय पद्धतशीर रीतीनें, विचारपूर्वक व सूक्ष्मपणें करीत असूनहि, त्यांपासून काढलेलीं अनुमानें अखेरचीं आहेत असें लोकांना सांगत नाहीं, किंवा त्या प्रयोगांचे हेच निर्विवाद परिणाम आहेत किंवा नाहींत याबद्दल तो साशंक नसला तरी तटस्थ राहतो, तशाच तऱ्हेचें माझेंहि माझ्या प्रयोगांसंबंधीं म्हणणें आहे. मीं खूप आत्मनिरीक्षण केलें आहे, एकूण एक भावना तपासल्या आहेत, त्यांचें पृथक्करण केलें आहे; परंतु त्यावरून निघालेलीं अनुमानें सर्वांच्याच बाबतींत अखेरचीं आहेत किंवा खरीं आहेत किंवा हीं तेवढींच खरीं, असा माझा मुळींच आग्रह नाहीं. हो, येवढें मात्र मी अवश्य म्हणतों कीं माझ्या दृष्टीनें तीं 'खरीं आहेत व तूर्त तरी अखेरचींहि वाटतात."

" माझे लेख कोणी प्रमाण मानूं नये, अशी माझी इच्छा आहे. तशी माझी विनंति आहे. त्यांत दर्शविलेल्या प्रयोगांना दृष्टान्तरूप समजून सर्वांनीं आपापले प्रयोग यथाशक्ति व यथामति चालवावे येवढीच माझी इच्छा आहे."

— म० गांधी ( आत्मकथा : प्रस्तावना. )

वरील उतारे म० गांधींच्या आत्मकथेच्या प्रस्तावनेंतून घेतलेले आहेत. हे उतारे १९२५ सालीं लिहिलेले असून तत्पूर्वी तीस वर्षें आपण आत्मदर्शनाच्या, परमेश्वर-प्राप्तीच्या अथवा मोक्षाच्या शोधार्थ आपल्या सर्व हालचाली करीत असल्याचें ते लिहितात. जग त्यांच्या सर्व व्यवहारांकडे एक संत, एक समाजसुधारक, एक राजकारणी नेता, मुत्सद्दी किंवा क्रांतिकारक राष्ट्रभक्त या दृष्टीनें पाहतें. पण ते स्वतः आपले सर्व व्यापार आत्मदर्शनाच्या अथवा मोक्षप्राप्तीच्या प्रेरणेनें चालू असल्याचें सांगतात. १९२५ सालापूर्वी तीस वर्षें म्हणजे १८९५च्या पूर्वीपासून ते आपल्या जीवनास एका सत्यशोधनाच्या यज्ञाचें स्वरूप देण्याचा प्रयत्न करीत होते आणि या यज्ञांत आपल्या सर्व प्रिय वस्तूंच्या आहुती देतां देतां अखेरीस आपल्या देहाची व प्राणाचीहि आहुति पडावी, अशी त्यांची








थोर मनीषा होती. सॉक्रेटिसाप्रमाणें वा येशू खिस्ताप्रमाणें सत्यनिष्ठेसाठीं आत्मयज्ञ करण्यास ते उत्सुक होते. त्यांना वीरमरण हवें होतें. पण या अद्वेष्ट्या प्रेममूर्तीला भग्न करण्यास कोण तयार होणार? ही एक कठिण समस्या होती. त्यांनीं ज्या ब्रिटिश साम्राज्याविरुद्ध १९२०पासून पंचवीस वर्षे अविरत निकराचा लढा केला, त्या साम्राज्याचे सूत्रधार मुत्सद्दीहि म० गांधींचा वध करण्यास धजले नाहींत! हिंदुस्थानांत हिंदु राज्य स्थापण्याचा व इस्लाम संस्कृति नामशेष करण्याचा दुष्ट हेतु म० गांधींच्या मनांत आहे असा आरोप करणारे पाकिस्तानवाले मुसलमानहि म० गांधींची हिंसा करण्यास प्रवृत्त झाले नाहींत!! पण स्वतःस हिंदुत्वनिष्ठ म्हणवून घेणारा, हिंदुराष्ट्राची संस्थापना करण्याची प्रतिज्ञा करणारा व सशस्त्र क्रांति करण्याचा आव आणणारा एक महाराष्ट्रीय ब्राह्मण हें पाप करण्यास प्रवृत्त झाला!!! अशा प्रकारें म० गांधींना हवें असणारें वीर-मरण त्यांना लाभलें आणि चार तपांच्यावर चालू असलेल्या म० गांधींच्या जीवनयज्ञाची सांगता झाली! त्याच बरोबर हिंदुराष्ट्रवादहि नामशेष झाला.

## ' हिंदु ' साम्राज्यशाही ध्येयाचा अंत

हिंदु-धर्म आणि हिन्दु-संस्कृति यांना जसें एक उज्ज्वल अंग आहे तसेंच त्यांना एक कृष्ण अंगहि आहे, हें आपण विसरतां कामा नये. हिन्दु धर्मावर व हिन्दु-संस्कृतीवर असलेले हे कृष्णकलंक धुऊन काढावे व त्यांचें उज्ज्वल स्वरूप जगापुढें प्रकट करावें यासाठींच म० गांधीचे सर्व प्रयत्न चालू होते. वर्णाभिमान, जन्मजात विषमता, अस्पृश्यता आणि साम्राज्यशाही, हीं हिन्दु संस्कृतीचीं कृष्ण अंगें आहेत. वर्णाश्रम–धर्मांत तीं मुरून गेलेलीं होतीं. आणि म्हणूनच हिन्दु–धर्माच्या अनुयायांना व हिन्दु संस्कृतीच्या अभिमान्यांना प्रथम इस्लामी संस्कृतीचे व नंतर आधुनिक युरोपीय संस्कृतीचे गुलाम व्हावें लागलें. हा इतिहास लक्षांत घेतल्यावांचून हिन्दुस्थानच्या इतिहासाचें कोडें उलगडणार नाहीं. गौतम बुद्धानें हिन्दु-संस्कृतींतील सामाजिक विषमतेविरुद्ध आणि अंधश्रद्धेविरुद्ध प्रथम बंड उभारलें. ही सामाजिक क्रांति अनेक शतकें प्रगतिपर राहिली व भारतीय संस्कृतीची पताका जगभर पसरली. गौतम बुद्धाच्या अहिंसाधर्माचा व सत्यनिष्ठेचा संदेश चीन-जपानपासून इराण-अरबस्तानपर्यंत फैलावला आणि त्यांतूनच येशू खिस्ताचा धर्म निर्माण झाला. कालान्तरानें हिन्दुस्थानांत बौद्ध धर्माचा ऱ्हास झाला व वैदिक धर्माचा पुनरुद्धार झाला. बौद्ध धर्मानें शिकविलेल्या भूतदया व समबुद्धि साधुसंतांनीं वैदिक संस्कृतींत सामावून घेतल्या; पण हिन्दु-संस्कृतींत गौतम बुद्धानें जी क्रांतिकारक वृत्ति निर्माण केली होती, ती पुनः तिच्यांत निर्माण झाली नाहीं. इस्लामी संस्कृतीनें भारलेल्या पण कमी सुधारलेल्या पठाणांपुढें व तुर्की धाडीपुढें हिन्दु राज्यें टिकाव धरूं शकलीं नाहींत. पुढें सतराव्या व अठराव्या शतकांत इस्लामी साम्राज्याविरुद्ध मराठ्यांनीं, रजपुतांनीं व शीखांनीं उठाव केला; पण या वेळेपर्यंत हिन्दु व मुसलमानी या दोनहि संस्कृतींना मागें टाकणारी एक नवी शास्त्रीय संस्कृति युरोपांत उदय पावली होती. या संस्कृतींतून व्यक्तिस्वातंत्र्य, सामाजिक समता, राजकीय लोकशाही व आर्थिक समाजसत्ता हीं ध्येयें पुढें आलीं. हीं सर्व आधुनिक, सामाजिक ध्येयें आत्मसात् करून म० गांधींनीं एक सत्याग्रही क्रांतिशास्त्र निर्माण केलें आणि त्याच्या आधारावर हिन्दी लोकशाही राष्ट्र स्थापन करण्याचा प्रयत्न सुरू केला. म० गांधींचा सत्याग्रह हा जसा ब्रिटिश साम्राज्याविरुद्ध बंड करून उठला होता, तसाच तो हिन्दु संस्कृतींतील वर्णाभिमान, जन्मजात विषमता आणि साम्राज्यशाही वृत्ति त्यांच्याविरुद्धहि क्रांति करीत होता. पण ही आमच्या समाजघटनेंतील क्रांति आणि लोकशाहीचीं व समाजवादाचीं ध्येयें कांहीं हिन्दुत्वनिष्ठांना अप्रिय होऊन आधुनिक युरोपांत दहावीस वर्षें धिंगाणा घालून निजधामास गेलेल्या हिटलरशाहीची वृत्तीच स्पृहणीय व अनुकरणीय वाटूं लागली! या वृत्तीच्या आधारें आपण हिंदुस्थानला केवळ हिंदूंचें राष्ट्र बनवूं आणि मुसलमानांना दंड-सामर्थ्यानें आपणांपुढें नमवूं शकूं अशी भावना ते जागृत करूं लागले. मुस्लिम लीगनें आपल्या धर्मांधतेनें अज्ञान जनतेला रानटी बनवून पाकिस्तान मिळविलें, तसेंच आपल्या समाजास आपण धर्मांध बनवूं, हिन्दी संघ-राज्यांत हिटलरशाही निर्माण करूं व पाकि-










स्तानला जिंकून घेऊं, अशा कल्पना या हिन्दुराष्ट्र-वाद्यांनीं कांहीं अविवेकी, अल्लड व विकारवश तरुणांच्या डोक्यांत भरविल्या. ब्रिटिश साम्राज्याची सेवा करण्यांत गर्क असलेल्या व त्याच्या गुलामगिरींत जीवित वेंचलेल्या पेन्शनरांच्या आशीर्वादानें ब्रिटिश साम्राज्याचा अंत झाल्यावर जें राष्ट्रीय सरकार स्थापन झालें त्याच्याविरुद्ध क्रांति करण्याचें कपट–कारस्थान हिन्दुत्वनिष्ठांनीं रचिलें. ब्रिटिशांच्या गुलामगिरींत धन्यता मानणारे कांहीं राजे, १५ ऑगस्टनंतर जें स्वातंत्र्य मिळालें त्यानें बेहोष होऊन, या कपट–कारस्थानांत सामील झाले. ब्रिटिशांच्या आश्रयानें वाढलेल्या कांहीं धनिकांनीं या कारस्थानास द्रव्यसाह्य दिलें आणि ज्यांनीं म० गांधी व पं० नेहरू यांचा सतत मत्सर तद्वतच द्वेष केला, त्यांनीं या कारस्थानास आपली बुद्धि दिली. अशा प्रकारें विपरीत धर्मनिष्ठा व विपरीत क्रांतिनिष्ठा यांच्या जहरी मिश्रणानें एक हालाहल तयार करण्यांत येऊन म०गांधी, पं०जवाहरलाल आणि मौ०आझाद अशा थोर राष्ट्रपुरुषांचे खून पाडावयाचे व दिल्लींत हिंदुपदपातशाही स्थापन करावयाची असा बेत ठरला. या हिंदु हिटलरशाहीचा सैतान दिल्लींत गेले तीनचार महिने धिंगाणा घालीत होता. दिल्लीचें तख्त काबीज करण्याची आशा त्याला वाटूं लागली होती. पंतप्रधान पंडित नेहरूंची आज्ञा दिल्लींतील सैनिक व पोलीस जुमानीनातसे झाले होते. इतक्यांत म० गांधी दिल्लीस गेले व त्यांनीं तेथील मुसलमानांना अभय दिलें. पं० नेहरूंची आज्ञा प्रभावी झाली आणि म० गांधींनीं हिंदी संघराज्य हें सर्व धर्मांच्या लोकांचें राज्य होईल अशी ग्वाही दिली. सैतान आमच्या हृदयांत सिंहासन मांडूं लागला आहे, त्याला खालीं ओढा आणि आपल्या धर्मभेदातीत लोकराज्याचें ध्येय हृदयसिंहासनावर पुनः स्थापा असा उपदेश करण्यासाठीं म० गांधींनीं प्रायोपवेशन केलें. पं० नेहरूंनीं आपलें ध्येय पुनः जगजाहीर केलें आणि पाकिस्ताननें कोणतीहि नीति आचरिली तरी आम्ही आमच्या राष्ट्रांतील अल्पसंख्याकांचें अभय नष्ट करणार नाहीं अशी ग्वाही दिली. दिल्लींत पुनः हिंदु–मुसलमान ऐक्यानें व विश्वासानें वावरूं लागले. म० गांधींना रामराज्य निर्माण करण्याची पुनः आशा वाटूं लागली आणि आपण आतां पूर्ण १२५ वर्षें जगणार अशी आत्मविश्वासाची भाषाहि ते बोलूं लागले. ही भाषा हिंदुपदपातशाही स्थापन करूं पाहणाऱ्या सैतानाला असह्य झाली आणि त्यानें म० गांधींच्या देहावर झडप घालून तो मातींत लोळविला ! पण ज्याप्रमाणें हुताशनावर झडप घालणारा पतंग जळून भस्मसात् होतो, त्याचप्रमाणें म० गांधींनीं आपल्या देहाची व प्राणाची आहुति देऊन जी ज्योत प्रज्वलित केली, तिच्या प्रकाशानें हिंदी संघराज्यांत प्रवेश केलेल्या हिंदु हिटलरशाहीच्या ध्येयाचा कायमचा अंत झाला. हिंदु राष्ट्र व हिंदु राज्य बनविण्याची भाषा एकदम बंद झाली. हिंदुराष्ट्र निर्माण करणारी राष्ट्रीय स्वयंसेवक सेना उध्वस्त झाली आणि हिंदु महासभेनेंहि आपलें राजकारण थांबविलें. मुस्लिम राष्ट्रीय संरक्षक दलें, खाकसार संघटना आणि मुस्लिम लीगचें राजकारण यांचाहि अंत झाला. म० गांधींना अभिप्रेत असणारें धर्मभेदातीत, जातिभेदातीत व वर्गभेदातीत लोकशाही राष्ट्र निर्माण करण्याचा निर्धार हिंदी संघराज्यांत आतां बद्धमूल झाला आहे. अशा प्रकारें म० गांधींनीं आपल्या जीवनाच्या अहिंसायज्ञाची जी सांगता केली, ती शुभपरिणामी होणार अशींच चिन्हें आज दिसत आहेत. म० गांधींनीं आपल्या जीवनानें व मरणानें जी संस्कृति जगाला दाखवून दिली, तीच खरी हिंदु संस्कृति, तीच खरी भारतीय संस्कृति आणि तीच खरी मानव–संस्कृति असा ध्वनि आज प्रत्येक हिंदूच्या व प्रत्येक मानवाच्या अंतःकरणांत दुमदुमून उठत आहे. गांधीजींचा वध करणारा गोडसे जिला हिंदुसंस्कृति किंवा हिन्दुत्वनिष्ठा म्हणतो, ती हिन्दूंची किंवा मानवांची संस्कृति नसून ती सैतानी संस्कृति आहे हें आतां सर्वांना पटलें आहे. म० गांधींनीं पन्नास वर्षें तपश्चर्या करून जो सत्याग्रह–संग्राम केला त्यानें ब्रिटिश साम्राज्यशाहीचा जसा अंत झाला, तसा त्यांच्या या वीर-मरणानें हिंदु-संस्कृतींत मुरलेल्या वर्णाभिमानाचा, जन्मजात विषमतेचा व साम्राज्यशाही राजकीय ध्येयांचा अंत होईल असा विश्वास ठेवून आपण आपल्या राष्ट्रांत खरी लोकशाही, खरा










अनुक्रमणिका

समाजवाद आणि खरी सत्याग्रही संस्कृति निर्माण करण्याची पुनः प्रतिज्ञा केली पाहिजे.

## आधुनिक भारत व आधुनिक युरोप

आधुनिक युरोपांत जी संस्कृति निर्माण झाली तींतून प्रथमतः बुद्धिस्वातंत्र्य, सामाजिक समता व लोकशाही हीं ध्येयें जगापुढें आलीं आणि या सर्व ध्येयांच्या मागें मनुष्याची सत्यसंशोधनाची बुद्धि, परस्परासंबंधींचा बंधुभाव आणि स्वातंत्र्य--निष्ठा या घृत्ती होत्या. हळूहळू सत्य संशोधनासाठीं मिळविलेलें बुद्धि--स्वातंत्र्य व आत्मोद्धारार्थ संपादिलेलें व्यक्ति-स्वातंत्र्य हीं धन--संपादन व धन--संग्रह या कामीं उपयोगांत येऊं लागलीं. या व्यक्ति -स्वातंत्र्यांतून सामाजिक विषमता आणि वर्गयुद्ध यांचा उद्भव झाला, लोकशाहीला धनिकशाहीचें स्वरूप प्राप्त झालें आणि राष्ट्रनिष्ठेला साम्राज्यनिष्ठेचें स्वरूप प्राप्त झालें. अर्थात् खासगी धनसंग्रह मर्यादित करुन आर्थिक समता स्थापणारा व स्पर्धेऐवजीं सेवावृत्तीवर आर्थिक घटना करूं पाहणारा समाजवाद पुढें आला. पण लोकशाहीला धानिकशाहीचा व राष्ट्रनिष्ठेला साम्राज्यशाहीचा जो विकार जडला होता, तो नष्ट कसा होणार? केवळ मतपरिवर्तनानें, युक्तिवादानें, बुद्धिबलानें धानिक वर्गाचा धनसंग्रह किंवा प्रबल राष्ट्रांचा साम्राज्यविस्तार हिरावून घेणें शक्य दिसत नव्हतें. युरोपांतील कामकरीवर्गाला समाजवादाच्या संस्थापनेस केवळ बुद्धिबल व लोकशाही हीं साधनें अपुरीं भासूं लागल्यावर त्यानें सशस्त्र क्रांतीनें व वर्गयुद्धानें समाजवादाची स्थापना करण्याचा विचार १९२० सालानंतर स्वीकारला व प्रत्येक देशांत रशियाप्रमाणें सर्वंकष कामगारशाही निर्माण करण्याचे प्रयत्न सुरू केले. पण रशियाच्या विशिष्ट परिस्थितींत या सशस्त्र क्रांतींत कामगारशाही निर्माण झाली, तसा इतिहास इतरत्र न घडतां जर्मनी, इटाली व स्पेन या देशांत लोकशाही नष्ट होऊन अनियंत्रित धनिकशाहीच निर्माण झाली आणि सर्व जग पादाक्रांत करण्याची व सर्व जगावर सार्वभौमत्व प्रस्थापित करण्याची महत्त्वाकांक्षा जर्मनी इटाली व जपान या राष्ट्रांना भासूं लागली. त्यांनीं राष्ट्रसंघाला धाब्यावर बसविलें आणि त्याच्या संरक्षणाखालीं निर्माण झालेलीं छोटीं लोकशाही राष्ट्रें पायांखालीं तुडविलीं. अशा प्रकारें पहिल्या महायुद्धानंतर युरोपीय संस्कृतीनें बुद्धिबलाचा, लोकशाहीचा, व राष्ट्रीय स्वयंनिर्णयाचा मार्ग उघडपणें सोडून दिला आणि शस्त्रबलाचा, धानिकशाहीचा व साम्राज्यशाहीचा जाहीरपणें स्वीकार केला. यांतूनच दुसरें महायुद्ध पेटलें आणि त्या वणव्यांत सर्व युरोपीय संस्कृति भस्मसात् झाली.

पण याच काळांत म० गांधींनीं हिंदुस्थानला दुसराच एक मार्ग दाखवून दिला. युरोपप्रमाणें हिंदुस्थानलाहि पहिल्या महायुद्धानंतर आपला राजकीय उद्धार करण्यास बुद्धिबल अपुरें भासूं लागलें. लोकशाही तर या देशांत स्थापनच झाली नव्हती आणि सामाजिक समता तर आमच्या संस्कृतींत कधीं उदयच पावली नव्हती! अस्पृश्यता--निवारण हें आपलें कर्तव्य आहे असें मान्य करणारे लोकनायकहि आपलें राजकारण बिघडेल म्हणून त्या कर्तव्यास हात घालण्यास धजत नव्हते. हिंदु व मुसलमान यांचें तात्पुरतें ऐक्य आम्हीं घडविलें असलें तरी मुसलमानांच्या विभक्त मतदारसंघांना मान्यता देऊनच तें घडविलें असल्यानें पाकिस्तानच्या विषवृक्षाचें बीजारोपण आधींच झालें होतें. संस्थानिक तर लोकशाहीचें नांवहि काढण्यास तयार नव्हते आणि आमची स्वातंत्र्यनिष्ठा जरी जागृत झाली होती तरी ती लोकशाहीचा आकार घेणार, कीं धनिकशाहीचा आकार घेणार, कीं आणखी कोणतें स्वरूप धारण करणार, याचा कोणीं फारसा विचार केला नव्हता. तरीहि बुद्धिबलाचें प्रागतिक राजकारण आमचे प्रश्न सोडवूं शकत नाहीं येवढी आमची खात्री झाली होती. आम्हीं क्रांतीची भाषा बोलूं लागलों होतों व "रणावीण स्वातंत्र्य कोणा मिळालें?" असें म्हणून स्वातंत्र्य--प्राप्तीसाठीं रण करण्यास उद्युक्त झालों होतों. आम्हीं म्हणजे कांहीं क्रांतिकारक असामान्य व्यक्ती सशस्त्र क्रांतीच्या नादीं लागल्या होत्या. पण हा मार्ग आम्हांस व्यवहारतःच असाध्य आहे, याबद्दल सर्व सुविचारी लोकनायकांचें एकमतच होतें. या लोकनायकांनीं आपल्या बुद्धीनें निःशस्त्र क्रांति हाच

आपणांस अनुरूप व साध्य असा मार्ग आहे असें निदान केलें होतें. तथापि या मार्गानें राष्ट्राला नेऊन स्वातंत्र्याचें शिखर गांठण्यासाठीं जे प्रयत्न करावयाचे ते करण्यास लागणारी संयमी न संन्यासी पण झुंजार, कर्मयोगी पण अनासक्त व अहिंसक, आदर्शनिष्ठ पण वास्तववादी व व्यवहारदक्ष, सत्यनिष्ठ पण मुत्सद्दीपणांत निष्णात, भावोत्कट पण निर्विकार, आणि निर्मम व निरहंकार अशा गुणांनीं मंडित अशी विभूति आम्हांस नेतृत्व करण्यास लाभली नसती, तर आमची वाताहतच झाली असती. पण म० गांधींच्या रूपानें अशी असामान्य विभूति आम्हांस लाभली व आम्हीं बुद्धिबलाचा मार्ग सोडून देऊन शस्त्रबलाच्या तामसी मार्गाकडे न जातां, आत्मबलाच्या सात्त्विक मार्गाकडे वळलों. यामुळें युरोप खंडांत अस्त पावलेलीं अथवा अस्त पावूं लागलेलीं बुद्धिस्वातंत्र्याचीं, सामाजिक समतेचीं, लोकशाहीचीं व राष्ट्रीय स्वयंनिर्णयाचीं तत्त्वें व ध्येय आम्हीं आधुनिक भारतांत जतन करून ठेविलीं इतकेंच नव्हे, तर आत्मबलाच्या दृष्टीनें त्यांची वाढहि केली. गेल्या पंचवीसतीस वर्षांत मानव-संस्कृतींत भर टाकणारें नवें संशोधन करण्याचा व मानवाला जीवनाकडे पाहण्याचा एक नवा दृष्टिकोन देण्याचें श्रेय जर कोणत्या एका व्यक्तीस अथवा राष्ट्रास देतां येण्यासारखें असेल, तर तें श्रेय म० गांधींस व त्यांनीं निर्माण केलेल्या आधुनिक भारतासच द्यावें लागेल, असें आम्हांला वाटतें. मानव-संस्कृतीचा दीप युरोपांत मालवत होता, त्याच वेळीं तो आम्हीं भारतांत प्रज्वलित करीत होतों. तथापि याच काळांत हिटलरशाहीचें अनुकरण करून धर्मवार राष्ट्रें निर्माण करण्याची हांव धरणारे, केवळ शस्त्रबलाचाच अहंकार धरणारे, कपट कारस्थानालाच क्रांतिशास्त्र मानणारे आणि व्यक्तिस्वातंत्र्य, सामाजिक समता व लोकशाही या पुरोगामी ध्येयांना चुरडून टाकून आपला राजकीय अहंकार शमविण्यासाठीं अज्ञानी जनतेंत धर्मकलहाचा वणवा पेटविण्याचा प्रयोग करणारे पाकिस्तानवाले व हिंदुत्वनिष्ठ पुढारी निघाले. म० गांधींचा खून करण्याची वृत्ति या भावनेंतूनच निर्माण झालेली आहे हें आपण ओळखिलें पाहिजे. पाकिस्तानवाल्यांनीं आपला संसार स्वतंत्र थाटल्याचा देखावा दिसल्यामुळें, ही तामस धर्मबुद्धि अधिकच प्रखर बनली आणि

अधर्मं धर्ममिति या मन्यते तमसावृता ।
सर्वार्थान्विपरीतांश्च बुद्धिः सा पार्थ ! तामसी ॥

या वर्णनास अनुसरून तिनें म० गांधींचा बळी घेतला ! पण म० गांधींच्या या बलिदानामुळें भारतांत सत्याग्रह-वृत्ति अधिकच दृढमूल होईल असे प्रयत्न आपण करीत राहिलें पाहिजे.

## सत्याग्रही भारत

म० गांधींनीं जे सत्याचे प्रयोग केले त्यांत त्यांची दृष्टि स्वतः आत्मदर्शन घ्यावें हीच होती; तरी 'आपला आत्मा हा विश्वाचा अंतरात्मा आहे' या सत्याचा अनुभव घेण्याचाच तो प्रयोग असल्यानें त्यांच्या दृष्टीनें जगदुद्धार हेंच आत्मोद्धाराचें साधन बनलें होतें. प्राचीन आत्मसिद्धान्तांतून त्यांनीं हा निष्कर्ष काढिला.

पूजितसें मी कवणाला ? तर मी पूजीं अपुल्याला ।
अपुल्यामध्यें विश्व पाहुनी पूजीं मी विश्वाला ॥

असें केशवसुतांनीं म्हटलें आहे तें वर्णन म० गांधींच्या सत्याग्रही जीवनास यथार्थतः लागू पडतें. प्राचीन अध्यात्म-शास्त्राला त्यांनीं जिवंत केलें आणि इतर शास्त्रांप्रमाणें अध्यात्मशास्त्र हेंहि प्रयोगसिद्ध व अनुभवगम्य शास्त्र आहे व बनलें पाहिजे, हें त्यांनीं दाखवून दिलें. आजच्या शास्त्रीय युगांत अंधश्रद्धेला जागा नाहीं, तद्वतच कोणाच्या शब्द-प्रामाण्यालाहि अवकाश नाहीं, हें त्यांनीं वारंवार प्रतिपादिलें आहे. या लेखाच्या सुरुवातीस म० गांधींच्या आत्मकथेच्या प्रस्तावनेंतील जो एक उतारा दिला आहे, त्यांतहि त्यांनीं आपलें शब्द-प्रामाण्य कोणीं मानूं नये असा स्पष्ट इषारा दिलेला आहे. मोठमोठ्या विभूतींच्या जीवनाकडे पाहून आपण स्फूर्ति घेतली पाहिजे आणि स्वतः सत्यनिष्ठेनें प्रयोग केले पाहिजेत. परमेश्वराच्या अनेक विभूतींपैकीं 'सत्य' याच विभूतीचे उपासक म० गांधी बनले यांतच त्यांची आधुनिकता व शास्त्रीय दृष्टि दिसून येतात. या सत्यनिष्ठेसाठींच त्यांनीं अहिंसेचा मार्ग स्वीकारला आणि









अनुक्रमणिका

# क्रांतिकारक धर्मपुरुष म. गांधी

या सत्यनिष्ठेमुळेंच ते सामाजिक व राजकीय क्रांतिकारक बनले. कारण, त्यांना असें दिसून आलें कीं आजच्या जगांतील कोणताहि मानवी व्यवहार सत्यावर अधिष्ठित नाहीं, कोणत्याहि व्यवहारामुळें प्रेमभावनेचा विकास होत नाहीं आणि कोणत्याहि व्यवहारांत संयम, मनोनिग्रह किंवा आत्मोद्धार यांच्याकडे लक्ष देण्यांत येत नाहीं. आजच्या राज्यशास्त्राला व अर्थशास्त्राला नीतीचा आधार नाहीं. आणि म्हणूनच ही संस्कृति नसून विकृति आहे असें त्यांचें मत बनलें. समाजवादाशिवाय लोकशाही ही खरी लोकशाही होऊं शकत नाहीं तद्वतच समाजवादाशिवाय सत्य व अहिंसा यांनाहि स्थान उरत नाहीं हेंहि त्यांना पटलें होतें, म्हणूनच सत्य व अहिंसा यांना समाजवादानेंच मूर्त स्वरूप देतां येईल असें ते म्हणत; पण हिंसेच्या आश्रयानें येणारा समाजवाद त्यांना मान्य नव्हता. त्याचप्रमाणें राजसत्तेचें व अर्थसत्तेचें केंद्रीकरण त्यांना नको होतें. यंत्रकला व भौतिक शक्ति यांच्या उपयोगास त्यांचा विरोध नव्हता; तरीहि त्यांना ग्रामोद्योगांना साह्य करणारीं छोटीं यंत्रें व स्वयंपूर्ण खेड्यांतील विकेंद्रित उत्पादन–पद्धति अभिप्रेत होती. सरकारी सक्तीपेक्षां सहकार्यावर उभारलेला, संयमाच्या योगें भोगलालसेला मर्यादित करणारा, सर्व जमीन व संपत्ति समाजाच्या मालकीच्या आहेत हें ओळखणारा व एकत्र कुटुंबाप्रमाणें समाईक संपत्तींत भर टाकण्याचें कर्तव्य सर्वांस करावयास लावणारा समाजवाद त्यांना हवा होता. समाजांत सरकार सर्वंकष बनूं नये म्हणून, सत्ता व संपत्ति यांची विभागणी व उत्पत्ति या दोनहि बाबतींत देशाचा प्रत्येक विभाग व शक्य तर प्रत्येक गांव स्वयंशासित, स्वयंपूर्ण व स्वावलंबी बनला पाहिजे असा त्यांचा आग्रह होता. ते अधिक जगते, तर त्यांनीं या सत्याग्रही समाजवादाचें मूर्त स्वरूप अधिक विशद केलें असतें. आजपर्यंत राष्ट्रवादाला सत्याग्रही दीक्षा देण्याचें कार्य त्यांनीं केलें. यापुढें समाजवादाला सत्याग्रही स्वरूप देण्याचें कार्य त्यांना करावयाचें होतें. यासाठींच राष्ट्रवाद्यांपेक्षां समाजवाद्यांना ते अधिक निकट करूं लागले होते. पण समाजवाद–सत्याग्रही समाजवाद–हेंहि त्यांचें अंतिम ध्येय नव्हतें; त्यांचें अंतिम ध्येय आत्मराज्य किंवा रामराज्य हें होतें. या आत्मराज्यांत किंवा रामराज्यांत कोणतीहि दंडशक्ति उरणार नाहीं, हें सत्ययुग स्थापन करण्याचा मार्ग सत्याग्रहांतूनच सांपडेल व म्हणून सत्याग्रह हेंच सर्व धर्मांचें रहस्य आहे हा संदेश म० गांधींनी मानव--समाजाला दिला आहे. समाजवाद, लोकशाही, या समाजघटना कालानुसार उदयास येतात व अस्त पावतात, पण त्या सनातन नव्हेत; सत्यनिष्ठा, निर्विकार, निर्भय स्वरूपाची प्रेमभावना आणि सत्यनिष्ठेला सर्व इंद्रियव्यापार वाहून घेण्याची तपश्चर्या हाच मानवाचा सनातन व शाश्वत धर्म आहे, हें म. गांधींनीं आपल्या जीवनयज्ञानें आम्हांस दाखवून देऊन या भरतभूमीचें तपोभूमि हें नांव यथार्थ केलें आहे. जीवनांत व मरणांत त्यांनीं हीच एक दृष्टि ठेविली होती आणि अक्रोधानें क्रोधाला जिंकावें, असाधूला साधुत्वानें जिंकावें आणि असत्याचा पाडाव सत्यानें करावा हा बुद्धाचा उपदेश आत्मसात् करून व त्याच्या आधारें सत्याग्रह–संग्राम करून धर्मराज्याची निर्मिति कशी करावी हें आम्हांस त्यांच्यामुळेंच अंधुकपणें तरी दिसूं लागलें आहे.

---

## जीवित–साफल्य

हौतात्म्याकरितां मी हपापलेला नाहीं. परंतु अहिंसाधर्माच्या पालनार्थ मी माझें एकमेव कर्तव्य करीत असतांना जर तें हौतात्म्य मला प्राप्त झालें, तर मी तें माझ्या जीविताचें साफल्य मानीन.

**महात्मा गांधी**








# जीवनमूल्यें अधिकच तेजस्वी झालीं आहेत

आचार्य स. ज. भागवत

आपल्या देशावर आलेल्या घोर आपत्तीनें आपण केवळ दिङ्मूढच्च झालों नाहीं तर बेभान झालों आहों; केवळ विपण्णच्च झालों नाहीं तर विवेकशून्य झालों आहों आणि आपला आचारहि आपण बिघड-विला आहे. अर्थात्च या वेळीं विचाराची आव-श्यकता आहे.

गांधीजींच्या मरणाचा विचार केला तर त्यांचें जीवन व साधना हीं जितकीं असामान्य, अलौकिक व लोकविलक्षण होतीं तितकाच त्यांचा अंतहि असा-मान्य, अलौकिक व लोकविलक्षण झाल्यामुळें त्यांच्या जीवनावर कळस चढला आहे. त्यांचीं जीवनमूल्यें अधिक तेजस्वी झालीं आहेत.

गांधीजींच्या करवीं जगत्सेवा करवून घेणारी शक्ति इतकी उदार आहे कीं, तिनें त्यांचें मरण सुद्धां वांया जाऊं दिलें नाहीं. यामुळेंच ही शोकसभा असली तरी येथें दुःखाला जागा नाहीं. दुःख ही भावना मानवी हृदयास साजेशी असली तरी गांधीजींचा जीवन–संदेश जाणणाऱ्यांस शोभणारी नाहीं. गांधी-जींनीं मरणाचा स्वीकार नमस्कारपूर्वक निष्ठुर मनानें व हंसतमुखानें केला हें लक्षांत घ्यावयास हवें.

माणसाच्या देहावर आघात होतात, आयुष्यभर मिळालेली संपत्ति नष्ट होते; पण काय नष्ट झालें म्हणजे आपलें खरें नुकसान होतें, याचा विचार माणसानें केला पाहिजे. अर्भकावस्थेंत पिता मरतो, तरुणपणीं कांता मरते व वृद्धपणीं एकुलता एक पुत्र मरतो; पण यामुळें मानवी जीवनाचा नाश होत नाहीं. सर्व प्रकारची भौतिक संपत्ति नष्ट झाली तरी माणूस जगूं शकतो; पण आशा नष्ट झाली, श्रद्धा नष्ट झाली, म्हणजे मात्र माणूस जगूं शकत नाहीं. भौतिक देह नष्ट झाला, भौतिक संपत्ति नष्ट झाली तरी खरें नुकसान होत नाहीं. खरी भीति तेव्हांच असते कीं, जेव्हां माणसाची सत्यावरची श्रद्धा नष्ट होते. ही श्रद्धा मेली नाहीं तर आपणहि मरत नाहीं. मारेकऱ्यानें गांधीजींचा वध केला खरा, पण गांधीजींनीं सत्यावरच्या निष्ठेनें व श्रद्धेनें आपल्या भोंवतालीं जें मंगल निर्माण केलें होतें तें तो मारूं शकला नाहीं.

अर्थात्च गांधीजींच्या वधामुळें दुःखी होणें योग्य होणार नाहीं. पं० नेहरू म्हणाले, ‘ गांधीजी गेले; सर्वत्र अंधकार पसरला. ’ पण लगेच ते म्हणाले, ‘ नाहीं, गांधीजींनीं पेटविलेली ज्योत कधींहि विझणार नाहीं.’ रवींद्र, अरविंद व गांधीजी या हिंदुस्थानच्या लोकोत्तर त्रयीपैकीं हयात असलेले अरविंदबाबू म्हणाले, ‘ ज्या शक्तीनें हिंदुस्थानला स्वातंत्र्य मिळ-वून दिलें, ज्या शक्तीनें गांधीजींना नेलें, ती शक्तीच त्यांचें अपुरें कार्य पुरें करील. ’ मग गांधीजींच्या मरणाबद्दल शोक कशासाठीं करावा ?

गांधीजी ज्या जड देहाच्या जाणिवेनें आपल्या जीवितकार्यास १२५ अगर १३३ वर्षांची मर्यादा घालीत होते, तो जड देह नष्ट झाल्यानें त्यांना आतां अवघा अनंत काळ मोकळा झाला आहे. अल्प आयुर्मानाच्या देशांत गांधी इतकीं वर्षे जगले, हीच ईश्वरी कृपा होय. गांधीजींना मारणाराहि हिंदुच निपजला हीहि ईश्वरी कृपाच आहे. ब्रिटिशां-पासून व ब्रिटिशांनीं रक्षिलेले, मुसलमानांपासून व मुसलमानांनीं रक्षिलेले गांधीजी अखेर एका हिंदु माथेफिरूच्या गोळीस बळी पडावे यांत एक ईश्वरी



अनुक्रमणिका






संकेत दिसतो. यामुळें गांधीजींचें तत्त्वज्ञान यशस्वी होण्याची अधिक शक्यता निर्माण झाली आहे असा विश्वास निर्माण होतो.

गांधीजींचा वध झाला याचा कलंक कोणा व्यक्तीला अगर जातीला नाहीं. जीविताचीं मूल्यें शांतपणें समजून न घेण्याच्या वृत्तीचा, जीवनास आवश्यक अशी एक विचारसरणी समजून घेण्याच्या शक्तीच्या अभावाचा तो एक परिपाक आहे. परंतु या घटनेनें साऱ्या हिंदुस्थानला एक हादरा बसला आहे. कठोर इतिहास असे हादरे देऊनच समाजजागृतीचें कार्य करीत असतो.

या हादऱ्यामुळें वरवरचे द्वेषभाव निमाले आहेत आणि हृदयांतरींचे सद्भाव वर उफाळूं लागले आहेत. तसें पाहिलें तर गांधीजींना गोळी घालणाऱ्यानें ती गोळी आपली संघटना, आपलें तत्त्वज्ञान, त्याचे प्रचारक व त्यामुळें निर्माण होणारे विकृत भाव यांवरच झाडली आहे. आतां हृदयपालट होऊं लागला आहे. या प्रसंगीं आपण द्वेषभाव वा वैरभाव बाळगणें योग्य नाहीं. हा हृदयपालट होण्यास अवसर दिला पाहिजे. त्याचें स्वागत केलें पाहिजे.

गेल्या कांहीं दिवसांत भावनेस बळी पडून आपण विचारशक्तीवरचा ताबा सोडला. भावनावश मनुष्याची चूक समजूं शकते; परंतु त्यास चिथावणी देणाऱ्याचा मात्र धिक्कारच केला पाहिजे.

गांधीजींच्या साधनेस आंतरराष्ट्रीय परिस्थिति अनुकूल झाल्याचा फायदा मिळाला हें मान्य करूनहि असें म्हणावें लागतें कीं, या परिस्थितीचा फायदा करून घेण्याची शक्ति गांधीजींनींच निर्माण केली. हिन्दी जनतेंत हार्दिक ऐक्य निर्माण करण्याचें गांधीजींचें जीवितकार्य मात्र अपुरेंच राहिलें. त्यांच्या या प्रयत्नांत गेलीं पाऊणशें वर्षें विघ्नें आणणाऱ्या ब्रिटिश राजसत्तेनें जो हिन्दु-मुसलमान-वाद निर्माण केला, त्यामुळें देशाची फाळणी झाली. तरीहि देशांत ऐक्यभाव नांदविण्याचा गांधीजींनीं अखेरपर्यंत निकरानें यत्न केला.

आमच्यांतील संघर्ष त्यांच्या मरणानें संपेल व आमच्यांत ऐक्यभाव निर्माण होईल अशीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत.

असें झालें तर गांधीजींचा मारेकरी हिंदुधर्माचा रक्षणकर्ता ठरणार नाहीं, गांधीजींचें तत्त्वज्ञान प्रभावी होईल, तेच हिंदुधर्माचे तारक व रक्षणकर्ते होतील.

आपण गांधीजींच्या अवसानानन्तर जी वृत्ति ठेवूं व जी कृति करूं त्यावर आपलें शहाणपण अजमावलें जाणार आहे. आपला शोक आंवरा आणि मारणारा मेला परंतु गांधीजी अमर आहेत हें सिद्ध करा[1].

[1] पुणें नागरिक-संघटना-समितीच्या विद्यमानें ९-२-४८ रोजीं महात्मा गांधींना श्रद्धांजलि देण्यांकरितां जी शांतिसभा झाली, त्या सभेंत आचार्य भागवत यांनीं केलेल्या भाषणाचा सारांश. का. सं.

---

## सत्याग्रहाचा मार्ग

अनत्याचारी मार्गानें मानवाचें हृदयपरिवर्तन घडवून आणण्याचा जर जगांत कोणता एकच उपाय असणें शक्य असेल, तर तो उपाय म्हणजे गांधीजींचा सत्याग्रहाचा मार्ग होय. जर तो मार्ग विफल झाला, तर मानवाच्या इतिहासांत हिंसेशिवाय दुसरें कांहींच शिल्लक रहाणार नाहीं. म्हणून समाजांत ऐक्य आणि शांति नांदावींत असें ज्यांना मनापासून वाटत असेल, त्यांनीं हिंदुस्थानाला आपलें सर्व सामर्थ्य एकवटून मदत केली पाहिजे.

—रोमाँ रोलाँ








सारसंकलन

# महात्माजी अमर आहेत

## १ गांधीजींचें अखेरचें पार्थिव दर्शन

त्या दिवशीं गांधीजी पटांगणांमधील बगीच्यांत प्रार्थना-सभेला जाण्याकरितां म्हणून ५ वाजून १० मिनिटांनीं खोलींतून निघाले. त्यांची नेहमींचीच मंडळी त्यांच्याबरोबर होती. आभा डाव्या बाजूला आणि मनू उजव्या बाजूला होत्या. दोघींचा आधार घेऊन ते चालत होते. बगीच्याच्या पायऱ्या चढत असतांना ते म्हणाले, 'आज उशीर झाला.' ते सरदार पटेलांशीं बोलत असतांनाच पांच वाजून गेले होते. त्यामुळें नेहमींप्रमाणें एक मिनिटभर विश्रांति न घेतांच ते प्रार्थनेला निघाले. इतक्यांत तो मनुष्य कोठूनसा येऊन अगदीं त्यांच्या जवळ गेला. 'याला बहुतेक इतरांप्रमाणेंच गांधीजींच्या पायां पडायचें असेल' असें वाटून मनूनें त्याला बाजूला सारायचा प्रयत्न केला; पण तो आपलें अंग झटकून मोकळा झाला व त्यानें तीनदां बार काढले. सगळ्या गोळ्या गांधीजींना उजव्या बाजूला छातीवर व किंचित् छातीखालीं लागल्या. गांधीजी एकदम जसे खालीं कोसळले, तशी आभाहि खालीं कोसळणार पण ती गांधीजींचें डोकें कसेंबसें आपल्या मांडीवर घेऊन बसली. गांधीजींचे "राम, राम" असे उद्गार सर्वांनीं ऐकिले. पुरुष व स्त्रिया कपाळांवर हात मारून दुःखानें वेडीं होऊन आक्रोश करूं लागलीं. इकडे गांधीजींनीं आपला शेवटचा श्वास सोडला. त्यानंतर त्यांना घरांत नेईपर्यंत पांच मिनिटें गेलीं असावीं. नंतर अंधारच पडला.

गांधीजींच्या प्राणोत्क्रमणानंतर सुमारें तीस मिनिटांनीं मी तेथें जाऊन पोहोंचलों. त्यांचें शरीर ऊन लागत होतें. जणूं काय त्यांना कांहींच झालें नव्हतें! पण नाडी अजीबात नव्हती. मला यायला उशीर झाला होता. मी बापूजींच्या कानाशीं तोंड नेऊन म्हणालों, "बापूजी, माफ करा, मला उशीर झाला." पण कांहीं नाहीं! पूर्वी त्यांनीं माझे लहानसे अपराध किती तरी वेळां पोटांत घातले होते! आतांहि मला आपली वेडी आशा वाटत होतीच कीं बापूजी माझ्यावर शेवटीं तरी कृपा करतील आणि डोळे उघडून एकदां तरी माझ्याकडे पाहतील. परंतु त्यांचे ओंठ घट्ट मिटलेले होते आणि डोळेहि कायमच्या महानिद्रेंत बंद झाले होते. त्यांच्या मुद्रेवर शांत निश्चय विलसत होता; जणूं काय ते रागानें नव्हे, पण करारीपणानें, आपल्या नेहमींच उशिरां येणाऱ्या मुलाला सुचवीत होते, "नाहीं, मी आपली झोंपमोड आतां यापुढें होऊं देणार नाहीं."

पण जेव्हां त्यांच्या भोंवतीं लपेटलेली शाल आम्हीं काढली—ते ती शाल पांघरूनच प्रार्थना-सभेला गेले होते—त्याचप्रमाणें धार्मिक क्रियेचा एक भाग म्हणून त्यांच्या देहाला स्नान घालण्याकरितां त्यांचे कपडे काढले, तेव्हांचा क्षण मात्र भयंकर असह्य असा होता! त्यांच्या अंगावरील कपडे अगदींच मोजके असून ते कमालीचे स्वच्छ असत. त्या दिवशीं तर ते विशेषच स्वच्छ होते. त्यांनीं जी शाल पांघरली होती तिला बगीच्यांतील ज्या जागीं त्यांच्यावर आघात होऊन ते कोसळले त्या जागे-वरील धूळ आणि गवताच्या काड्या लागलेल्या होत्या. आम्हीं ती धूळ व त्या गवताच्या काड्या








होत्या तशाच राहाव्या अशा बेतानें ती शाल हळुवार हातानें घडी करून ठेविली. शालीच्या घड्यांमध्यें एका गोळीचें रिकामें कवच सांपडलें. त्यावरून गोळ्या अगदीं जवळून झाडल्या होत्या हें स्पष्ट होतें. त्यांच्या छातीभोंवतीं आणि खांद्यांवर जो कपडा लपेटलेला होता त्यावर रक्त वाहून मोठमोठे डाग पडले होते. त्यांची ती सुप्रसिद्ध लुंगी तेवढी कायम ठेवून आम्हीं त्यांचे बाकीचे सर्व कपडे जेव्हां काढून टाकले तेव्हां ते खरोखरींच आपणां सर्वांना सुपरिचित असे 'नंगे फकीर' दिसूं लागले. आतां मात्र आम्हांला राहवेना! ते गुडघे, तें हात, हातांच्या बोटांची ती विशिष्ट 'मुद्रा', ते त्यांचे पाय, सर्व सर्व अगदीं जसेंच्या तसें शाबूत होतें. त्यांचें शरीर मसाला भरून कायमचें जतन करून ठेवावें अशा सूचना आम्हांला कांहींनीं केल्या होत्या. बापूजींकडे पाहून त्या सूचना अव्हेरण्याचा मोह आम्हांला आवरेना! पण छे! हिंदु मनांवरील संस्कार तसें करूं देणें कसें शक्य होतें? आणि आम्हीं कबूल केलें असतें तरी बापूजींनीं आम्हांला त्याबद्दल कधींहि गय केली नसती!

खोलींत सर्वत्र संपूर्ण शोकाचें वातावरण होतें. आम्हीं ती रात्र बापूजींभोंवतीं बसून काढली. मी मनांतल्या मनांत परमेश्वराची करुणा भाकीत होतों, 'देवा, गोळ्यांच्या या भयंकर जखमांवर बापूजींचा देह विजय मिळवील का? सूर्योदयापूर्वीच त्यांचें जीवन परत येईल का?' पण माझी ती आशा किती वेडगळ होती! तासांमागून तास निर्घृणपणें जात होते आणि त्यांच्या महानिद्रेचा भंग होण्याचें चिन्ह मुळींच दिसेना! माझ्या मनांत आलें कीं, सूर्यानेंहि आतां उगवूं नये!

त्यांची छाती उघडी करून ठेवायला मीं सांगितलें. बापूजींच्या इतकी निधडी छाती कोणा शिपाईगड्याचीहि नसेल! आम्हीं त्यांच्या भोंवतीं बसून त्यांचीं आवडतीं स्तोत्रें व धार्मिक पदें म्हणूं लागलों. रात्रभर लोकांच्या झुंडीच्या झुंडी त्यांच्या दर्शनाला येतच होत्या. सकाळीं बापूजींनीं हरिजन-निधीकरितां शेवटचा हप्ता गोळा केला! एकामागून एक येऊन व त्यांना वंदन करून लोकांनीं नाणीं, नोटा आणि फुलें यांची त्यांच्यावर वृष्टि केली. वकिलातींमधील अधिकारी वर्गानेंहि सहकुटुंब येऊन बापूजींना सादर वन्दन केलें. आणि तें वन्दन केवळ औपचारिक नव्हतें. ज्यांना ते पूर्वीं अनेक वेळां भेटले होते आणि त्यामुळें ज्यांची चांगली ओळख झाली होती, त्यांचा ते आतां अखेरचा निरोप घेत होते!

—देवदास गांधी,
नभोवाणीवरील भाषण, ५–२–४८.

---

## २ 'गांधीजींचें सुखस्वप्न सत्यसृष्टींत उतरवूं या'

हिंदुस्थानवर आणि जगावर अकस्मात् एक भयंकर शोकजनक असा प्रसंग येऊन गुदरला आहे. जानेवारी तीस रोजीं संध्याकाळीं पांच वाजल्यानंतर थोड्या वेळानें मानवजातीला अत्यंत मोलाचें असें एक जीवन एका मारेकऱ्याच्या खुनी हातानें खंडित झालें. गेलीं पन्नास वर्षें तें जीवित भारताच्या भाग्याचें जणूं मध्यवर्ति केंद्रच बनलें होतें! महात्मा गांधी—आमच्या राष्ट्राचे जनक, जनतेचे लाडके, अहिंसेचे महर्षि, शांतीचे महान् संत आणि प्रेषित, स्वातंत्र्याचे महान् सैनिक व विशेषतः दीनदुबळ्यांचे, रंजल्यागांजलेल्यांचे वत्सल कैवारी असे महात्मा गांधी—प्रार्थनेला जात असतांना वाटेंतच त्यांची हत्या झाली! त्यांच्या प्रार्थनेला, दररोज संध्याकाळीं त्यांचा संदेश ऐकण्यासाठीं देशबांधवांच्या किती झुंडीच्या झुंडी येत असत! त्या दिवशीं सायंकाळीं राष्ट्रावर गुदरलेला हा शोकजनक हाहाकार बघून सूर्यहि शोकानें दृष्टीआड झाला.

गांधीजींचें शेवटचें महत्कृत्य म्हणजे हिंदुस्थानांतील लोकांत शांति–सलोखा नांदावा म्हणून आपल्या जीविताचा होम करण्याचा त्यांनीं घेतलेला निर्णय. जानेवारी १८ रोजीं, रविवारीं लोकांच्या तर्फें देण्यांत आलेल्या पवित्र आणि गंभीर प्रतिज्ञावचनावरून त्यांनीं आपला उपवास सोडला आणि हिंदुस्थाननेंहि हायसें वाटून सुटकेचा निश्वास सोडला.

भारत मातेचा हा श्रेष्ठतम व अत्यंत उमदा असा












सुपुत्र इहलोक सोडून गेला आहे. जग त्याच्या करितां शोक करीत असून त्याच्या पराक्रमी कर्तृत्वाला आणि देदीप्यमान् आत्म्याला आपली श्रद्धांजलि अर्पण करीत आहे. या दुःखाच्या भयंकर आघाताच्या वेळींहि आपल्या त्या नेत्याविषयीं विचार मनांत घोळत असतां, हिंदुस्थान--सरकारचें हृदय अभिमान आणि कृतज्ञता या भावनांनीं भरून येतें. हाच आमचा नेता कोट्यवधि लोकांचें स्फूर्तिस्थान होता. त्यानेंच त्यांना सदाचाराचा आणि सत्प्रयत्नांचा मार्ग दाखवून दिला. जसें मरणांत तसें जिवंतपणीं ते हंसतमुख, धीरगंभीर, प्रसन्न व सर्वभूत–वत्सल असे असून सत्य आणि अहिंसा या तत्त्वांचा त्यांनीं दिलेला संदेश त्यांच्या ठिकाणीं मूर्तिमंत अवतरला होता. न्यायाची प्रस्थापना व्हावी आणि माणसांमाणसांमध्यें परस्पर–सहिष्णुता नांदावी याकरितां ते जन्मभर झगडले.

महात्मा गांधींच्या उज्ज्वल स्मृतीला आदरपूर्वक श्रद्धांजलि अर्पण करीत असतांना हिंदुस्थान–सरकार आपला असा निश्चय जाहीर करीत आहे कीं गांधीजींचें जीवितकार्य पुरें करावयाची आम्ही पराकाष्ठा करूं. कर्तव्याच्या हांकेला 'ओ' देणें हें गांधीजी आद्य आणि सर्वश्रेष्ठ कर्तव्य मानीत. आज हिंदुस्थानच्या जनतेचें कर्तव्य हें आहे कीं धैर्य, ध्येयदृष्टि आणि श्रद्धा यांनीं प्रेरित होऊन तिनें सत्यपालन आणि सहिष्णुवृत्ति यांचें आचरण केलें पाहिजे.

या राष्ट्राच्या शोक–प्रसंगींहि हिंदुस्थान--सरकार आपल्या देशबांधवाना अशी आग्रहपूर्वक विनंति करीत आहे कीं, सर्वांनीं आपल्या कर्तव्याची आठवण सदैव जागृत ठेवून भविष्यकाळाला निधड्या छातीनें व आपली दृष्टि विचलित न होऊं देतां तोंड द्यावें. आपणांमधील ज्या दुष्ट आणि अत्याचारी शक्तींनीं डोकें वर काढून आपल्या हिंदुस्थानचा विनमोल ठेवा चक्काचूर करून टाकला त्या सैतानी प्रवृत्तींचा निःपात करण्यास सर्वांनीं मदत केली पाहिजे. या आसुरी कृत्यानें गांधीजींच्या आत्म्याचा उदात्तपणा अधिकच उमटून दिसत आहे. त्यांचा उदात्त आत्मा हिंदुस्थानवर आणि मानवजातीवर आज जसा प्रकाशत आहे तसाच सदैव प्रकाशत राहील.

आपल्या हिंदुस्थानवर त्यांचें इतकें निरतिशय आणि उत्कट प्रेम होतें व त्यांनीं हिंदुस्थानची इतक्या अविरतपणें आणि तत्परतेनें सेवा केली कीं जसें जिवंतपणीं तसेंच आतां यापुढेंहि त्यांचा महान् आत्मा हिंदुस्थानचें पालन करील व त्याला सदैव मार्ग दाखवीत राहील. हिंदुस्थान आणि हिंदुस्थानच्या संस्कृतीचा संदेश हीं त्यांच्या भव्य आणि वैभवशाली जीवनांत मूर्तिमंत अवतरलीं होतीं. म्हणून गांधीजी आणि हिंदुस्थान यांच्याशीं आपण सदैव इमानी राहून त्यांच्या सुखस्वप्नांतील हिंदुस्थान सत्यसृष्टींत उतरविण्याकरितां चंग बांधूं या."

—हिंदी मंत्रिमंडळाचा ठराव नं. २,
२ फेब्रुवारी १९४८.

---

## ३ 'भूतकालीन आणि भविष्यकालीन भारताचें उज्ज्वल प्रतीक'

महात्मा गांधींचा खून हें केवळ एका माथेफिरूचें संदर्भशून्य असें सुटें कृत्य नव्हे. ह्या आपल्या देशांत गेलीं कित्येक वर्षें, विशेषतः गेले कांहीं महिने, द्वेष आणि अत्याचार यांचें जें वातावरण पसरलें आहे त्याच्यामधून हें कृत्य उद्भवलें आहे. आजहि आपल्या भोंवतीं तेंच वातावरण सर्व बाजूंना पसरलेलें आहे. त्यानें आपणांस अगदीं वेढून टाकलेलें आहे. गांधीजींनीं आपणांपुढें जें ध्येय ठेविलें आहे, तें जर आपणांस गांठावयाचें असेल तर या वातावरणाला आपण तोंड दिलें पाहिजे, त्याच्याशीं दोन हात करून व झुंज देऊन द्वेष आणि अत्याचार या दुष्ट प्रवृत्तींचा समूळ नायनाट केला पाहिजे.

सरकारविषयीं म्हणाल तर माझी खात्री आहे कीं या दुष्ट प्रवृत्तींचा नायनाट करायला कोणतेंहि साधन वा कोणताहि प्रयत्न तें शिल्लक ठेवणार नाहीं. जर आम्हीं हें केलें नाहीं, जर दुबळेपणामुळें किंवा कोणत्याहि तात्पुरत्या कारणामुळें हा अत्याचार व तोंडीं, लेखी, तसाच कृतींतून चाललेला हा द्वेषाचा प्रचार थांबविण्यास आम्हीं परिणामकारक उपाय योजिले नाहींत, तर सरकारांत राहण्यास आम्ही नालायक ठरूं; स्वतःस महात्माजींचे अनु-










# महात्माजी अमर आहेत

यावी म्हणविण्याची किंवा या दिवंगत: महात्म्यावर स्तुतिसुमनें उधळण्याचीहि लायकी आम्हांस नाहीं, असें सिद्ध होईल.

भावी युगांमध्यें कित्येक शतकांनंतर, कदाचित् वर्षसहस्रानन्तर देखील त्या वेळच्या लोकांच्या मनांत आपल्या या पिढीविषयीं विचार येतील. हा देवमाणूस या आपल्या पृथ्वीतलावर होऊन गेला म्हणून त्यांना हेवा वाटेल. या देवमाणसाच्या पद-रजानें पुनीत झालेल्या जमिनीवर आपणहि—त्याच्या मानानें किती पामर!—चालत आलों, म्हणून त्यांना आपणांविषयींहि हेवा वाटेल. म्हणून आपण महात्माजींना साजेसे अनुयायी बनूं या.

एकादा थोर माणूस दिवंगत झाला असतांना त्याला श्रद्धांजलि अर्पण करणें, त्याची थोरवी वर्णन करून झालेल्या हानीबद्दल शोक-प्रदर्शन करणें हा आपल्या विधिमंडळाचा नेहमींचाच रिवाज आहे. परंतु प्रस्तुत प्रसंगीं मीं किंवा इतरांनीं जास्त भाषण करणें अगदीं औचित्याला धरून होईल कीं नाहीं याबद्दल मला खात्री वाटत नाहीं. कारण, मला व्यक्तिशः त्याचप्रमाणें सरकारचा प्रमुख म्हणून हा आमचा अमूल्य ठेवा आम्ही सुरक्षित राखूं शकलों नाहीं याबद्दल अत्यंत शरमिंधें वाटत आहे. आमच्या हातून हा अपराध घडला आहे येवढेंच काय, पण गेले कित्येक महिने निरपराध अशा किती तरी स्त्रीपुरुषबालकांना आम्ही रक्षण देऊं शकलों नाहीं. अर्थात् त्याचें कारण हेंहि असूं शकेल कीं जी जबाबदारी, जी कामगिरी आमच्यावर येऊन पडली होती ती आम्हांलाच काय पण कोणत्याहि सरकारला पार पाडतां येण्यापलीकडची होती. तरी पण आमचा दुबळेपणा सिद्ध झाला हें खरेंच.

हा असामान्य पुरुष—ज्याच्याविषयीं आम्हांला नि:सीम आदर आणि प्रेम वाटत आलीं आहेत—आमच्यांतून निघून जावा, एका हिंदी मनुष्यानें त्याच्यावर आपला हात उगारावा, ही मला अत्यंत शरमेची गोष्ट वाटते. एका हिंदु मनुष्यानें ही हत्या करावी आणि तीहि हल्लींच्या युगांतील सर्वश्रेष्ठ हिंदी पुरुषाची आणि सर्वश्रेष्ठ हिंदूची, याबद्दल मला शरम वाटते.

आपण थोर लोकांची निवडक शब्दांत स्तुति करीत असतों. ती करितांना आपणांजवळ थोरपणाचें कांहीं मोजमाप असतें; पण प्रस्तुत प्रसंगीं गांधीजींचें गुणगान आम्ही कसें आणि कोणता मानदंड लावून करणार ? कारण ते मुळीं असामान्यच होते ! आपणांप्रमाणें ते साध्या मृत्पिंडापासून बनलेले नव्हते !

ते या इहलोकांत आले, साधारणतः दीर्घायुष्य त्यांना लाभलें आणि आतां ते इहलोक सोडून गेले आहेत. आपण आपल्या विधिमंडळांत त्यांचें गुणसंकीर्तन करावयाची गरज आहे का ? इतिहासांत असा कोणीहि मनुष्य होऊन गेला नाहीं कीं ज्याला जिवंतपणीं इतकें गांधीजींप्रमाणें स्वतःचें गुणवर्णन ऐकावयाला मिळालें ! आणि त्यांच्या मृत्यूनंतर गेल्या दोनतीन दिवसांत तर सबंध जग त्यांचें गुणसंकीर्तन करीत आहे !

जगांतील एक वैभव, एक सुषमा, आज लोपली आहे. ज्या तेजोनिधीनें आम्हांला आजपर्यंत ऊब दिली आणि आमचें जीवन उजळविलें, तो तेजोनिधि आज अस्तंगत झाला आहे ! त्याच्या अभावीं आपण अंधारांत आणि थंडींत कुडकुडत आहों ? पण छे ! असें आपणांला वाटूं लागणें गांधीजींना आवडणार नाहीं !

आणि तसें म्हटलें तर जी सुषमा—जें वैभव इतकीं वर्षें आपण पाहत आलों, त्यानें—दिव्य वन्हि धारण करणाऱ्या त्या महापुरुषानें आपणांला देखील चेतवून, बदलवून, टाकलेंच नाहीं का ? आपण हल्लीं जसे आहों, तसे, त्यांनीं आपणांस ' घडविलें ' असल्यामुळें, आहों. त्यांच्या त्या दिव्य वन्हीपासून आपणांपैकीं पुष्कळ जणांनीं स्फुलिंग–कण घेतले व त्यामुळें आमचें जीवन सामर्थ्यशाली बनलें. त्यांनींच घालून दिलेल्या मार्गानें आम्ही थोडेंफार काम करीत आलों आहों. तेव्हां त्यांचें गुणगान करावयाचें तर आमचे शब्द तोकडे पडतील. त्यांचें गुणगान करावयाचें म्हणजें कांहींसें आपलें स्वतःचेंच गुणगान करण्यासारखें होणार आहे !

थोर थोर माणसांचीं स्मारकें धातूंचीं आणि पाषाणांचीं उभारलीं जाऊन त्यांमध्यें त्या माणसांच्या








स्मृती बंदिस्थ राखिल्या जातात. पण दिव्य वन्हि धारण करणाऱ्या या महापुरुषानें जिवंतपणीं अशी कांहीं किमया करून दाखविली कीं तो कोट्यवधि अंतःकरणांत प्रविष्ट होऊन तेथेंच बंदिस्थ होऊन राहिला आहे ! अत्यल्प प्रमाणांत कां होईना, पण त्यांनीं आपणां सर्वांना आपल्याच पिंडाचे—आपणां-सारखें करून टाकलें आहे ! त्यांनीं आपल्या विशाल जीवनानें अखिल हिंदुस्थान व्यापून टाकला. हिंदुस्थानांतील केवळ कांहीं प्रासाद, कांहीं मोजकीं स्थळें किंवा सभासंमेलनें यांतच नव्हे तर हिंदुस्थानांतील दीनदुबळ्यांच्या रंजल्या-गांजलेल्यांच्या प्रत्येक झोपडींत त्यांनीं प्रवेश केला आहे.

गेलीं तीस वर्षे किंवा त्याहिपेक्षां जास्तच काळपर्यंत गांधीजींनींच या देशाला बहुतांशीं घडविलें आहे. या अवधींत गांधीजींनीं इतक्या परमोच्च कोटीचा त्याग करून दाखविला आहे कीं त्या विशिष्ट क्षेत्रांत तरी त्याला दुसरीकडे कोठेंहि जोड नाहीं. त्यांत त्यांना यशहि लाभलें; पण शेवटीं अशी परिस्थिति निर्माण झाली कीं तीमुळें त्यांना भयंकर दुःख झालें. जरी त्यांच्या स्नेहपूर्ण मुखावरील हास्य लोपलेलें कधींहि दिसलें नाहीं, जरी ते कोणाला कठोर शब्द बोलले नाहींत, तरी त्यांना आपल्या पिढीच्या—ज्या पिढीला त्यांनींच शिक्षण दिलें त्या पिढीच्या—उणिवांमुळें भयंकर दुःख झालें असावें यांत मुळींच शंका नाहीं. कारण, त्यांनीं दाखविलेल्या मार्गापासून आपण च्युत झालों आणि शेवटीं त्यांच्याच एका बालकानें—तो खुनी मनुष्य देखील इतर हिंदी लोकांप्रमाणें त्यांचा बालकच नव्हे तर काय ?—त्यांचा वध केला.

आपण ज्या काल—खंडांतून गेलों आहों त्याचें मूल्यमापन पुढील इतिहास— अनेक युगानंतरचा इतिहास—करील त्या वेळीं या कालखंडांतील यशापयशांचें मूल्यमापन होईल. आपण या कालाच्या इतके जवळ आहों कीं, त्यामधील घटित—अघटितांचा अन्वयार्थ समजण्यास, त्यांचा योग्य तो न्यायनिवाडा करण्यास आपण असमर्थ आहों. आपणांला येवढीच संवेदना आहे कीं, एक सुषमा, एक वैभव होतें तें लोपलें ! आपणांला आज येवढेंच दिसत आहे कीं, या क्षणीं जिकडे तिकडे अंधार पसरला आहे ! पण तें क्षणभरच ! इतका अंधार तो खचित नाहीं ! आपण आपल्या हृदयांत डोकावून पाहिलें तर तेथें आपणांस त्यांनींच प्रज्वलित करून ठेवलेली जागती जिवंत ज्योत दिसेल. जर ही जिवंत ज्योत आपल्या अंतःकरणांत तशीच तेवत राहील तर मग अंधार कोठचा ? गांधीजींची आठवण ठेवून व त्यांनीं उपदेशिलेला मार्ग अनुसरून, आपण त्या ज्योतीनें ही आपली हिंदभूमि प्रकाशीत करूं या. आपण त्यांच्या मानानें कितीहि क्षुद्र असलों तरी त्यांनींच चेतविलेल्या ज्योतीनें आपला देश प्रकाशित करूंच करूं.

गांधीजी हे भूतकालीन भारताचें, आणि मला म्हणावेंसें वाटतें कीं भविष्यकालीन भारताचेंहि, एक अत्यंत उज्वल प्रतीक होते. आपण वर्तमान-कालाच्या भीषण कडेवर—भूतकाल आणि भविष्य-काल यांमधील भयानक सीमारेषेवर—उभे आहों. सगळ्या प्रकारचीं संकटें आमच्या पुढें आ वासून उभीं आहेत. पण सगळ्यांत मोठें संकट असेल तर तें जीवनमूल्यांवरील आपली श्रद्धा निघून जात आहे हें होय. उराशीं जतन करून ठेवलेलीं ध्येयें जेव्हां निष्फल होतात, ज्या मोठमोठ्या गोष्टीं-विषयीं आम्हीं कंठरवानें घोषणा केल्या त्या जेव्हां निरर्थक ठरतात आणि जीवनप्रवाहाला जणूं निराळेंच वळण लागलेलें दिसतें, अशा समयीं आपणांला वैफल्याची जाणीव होते, आपला धीर खचून जातो व ( आत्म्याची ) वीरवृत्ति मलिन होते: हेंच सर्वांत महाभयंकर संकट होय !

पण माझा असा विश्वास आहे कीं, हेहि दिवस निघून जातील. हा देवमनुष्य जिवंतपणीं अत्यंत थोर माहात्मा होताच होता; पण मृत्यूनंतर तर त्याच्या थोरवीवर, त्याच्या माहात्म्यावर कळसच चढला आहे ! आणि ज्या मोठ्या सत्कार्याच्या सेवेंत त्यानें आपलें जीवन व्यतीत केलें, त्याच सत्कार्याची सेवा त्यानें आपल्या मृत्यूनेंहि केली आहे.

त्याच्या निधनामुळें आपणांला नेहमींच दुःख वाटत राहील. कारण, आपण मानवच आहों ! आपल्या गुरूचा आपणांस कसा विसर पडेल ? पण



अनुक्रमणिका






मला हीहि जाणीव आहे कीं, त्यांना आपण असें त्यांच्याकरितां दुःख करीत बसलेलें आवडणार नाहीं. त्यांचीं अत्यंत जवळचीं आणि आवडतीं माणसें मृत्यूनें हिरावून नेलीं असतांनाहि त्यांनीं डोळ्यांत कधीं अश्रु तर येऊं दिलाच नाहीं, पण उलट अंगीकृत थोर कार्यांत खंड न पडूं देतां सारखी सेवा करीत राहण्याचा अधिकच खडतर असा निश्चय ते करीत असत. म्हणून आपण जर शोक करीत राहिलों तर त्यांना राग येईल. त्यांच्या स्मृतीला वंदन करावयाचा मार्ग हा नव्हे. तो मार्ग एकच— त्यांनीं जें कार्य हातीं घेऊन पुष्कळ अंशीं सिद्ध करून दाखविलें, त्याच कार्याला आपणां स्वतःला वाहून घेण्याची पुनः प्रतिज्ञा करणें, तसा निश्चय करणें हाच होय. म्हणून आपण कार्य करीत राहिलें पाहिजे, कष्ट करीत राहिलें पाहिजे, त्याग करीत राहिलें पाहिजे. आणि अशा रीतीनें त्यांचे आपण थोडें फार तरी अनुयायी आहों यावद्दलची पात्रता आपण सिद्ध करून दाखविली पाहिजे. ''

—पं० जवाहरलाल नेहरू, मुख्य प्रधान, हिंदी कायदेमंडळापुढील भाषण, २–२–४८.

---

## ४ गांधीजींचें व्यक्तिमत्त्व

हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचे शिल्पकार म्हणून, हरिजनांचे त्राते म्हणून, हिंदु–मुस्लिम–ऐक्याचे शांतिदूत म्हणून, दरिद्रनारायण म्हणून, फार काय पण हिंदुस्थानचेच नव्हे तर अखिल मानवतेचे सेवक म्हणून महात्मा गांधींना जग ओळखतें. त्यांचें हें कार्य इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेविलें जाईल.

पण गांधीजी एक व्यक्ति म्हणून, एक मनुष्य म्हणून फारच थोड्यांना माहीत असतील. अंगकाठीनें लहानसा दिसणारा हा वामनमूर्ति महात्मा सरोजिनीदेवी प्रेमानें त्यांना ' मिकी माउस ' म्हणत असत— माणूस म्हणून अत्यंत मोठा असून त्याचें जीवन माणुसकीच्या गुणप्रकर्षानें सुसंपन्न झालें होतें. त्यांच्या सांनिध्यांत येणाऱ्यावर त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची जी कांहीं मोहिनी पसरत असे, तिचें विस्मरण त्याला जन्मभर होणार नाहीं.

मीं त्यांना अगदीं जवळून असें पंधरा वर्षांवर पाहिलें असेल. ते काम करीत असतांना, मुलांशीं खेळत असतांना, कोणाशीं बोलत असतांना, लिहीत असतांना, विचारांत मग्न असतांना, थट्टा करीत असतांना, फिरत असतांना, मीं त्यांचें अगदीं जवळून निरीक्षण केलें आहे. पण ते चिडले किंवा त्यांची शांति ढळली असें मला कधींहि दिसलें नाहीं. पुष्कळदां मला ते बोलून दाखवीत, " मीं पुष्कळ गोष्टींवर विजय मिळविला आहे, पण चिडखोरपणावर नाहीं. " पण मीं तरी त्यांना कधीं चिडलेलें पाहिलें नाहीं. त्यांच्या भोंवतीं जणूं शांति आणि सौजन्य हीं दरवळत असत; त्यांच्या भोंवतीं जणूं साधुत्वाचें तेजोवलय निर्माण झालेलें दिसे. त्यांची भेट घेऊन परत येत असतांना आपण पवित्र झालों, एका अपूर्व उदात्ततेचा अनुभव घेतला, असें वाटे.

त्यांच्या प्रामाणिकपणाला सीमाच नव्हती. जर ते कोणत्या एका गोष्टीनें नाखुष होत असतील तर खोटेपणामुळें ! त्यांची फसवणूक करून त्यांच्याशीं आपले संबंध शाबूत ठेवणें शक्यच नव्हतें; पण जर फसवणाऱ्या माणसाला अंतःकरणापासून पश्चात्ताप झाला, तर ते त्याला क्षमा करायला नेहमींच एका पायावर तयार असत व तेहि इतकें कीं ह्या त्यांच्या गुणाला दोषाचें स्वरूप आलें होतें. कारण, पूर्वी चुकलेला पण मागाहून पश्चात्तापानें पोळलेला असा मनुष्य इतर सरळ सदाचारी माणसांपेक्षां त्यांचा अधिक लाडका होत असे.

परमतसहिष्णु तर ते इतके होते कीं, त्यांचा हाहि गुणातिरेक दोषपदवीस पोहोंचला होता... जें विचारस्वातंत्र्य आपण स्वतःला मागतों तें दुसऱ्याला देण्यास ते सदैव सिद्ध असत.

सनातनी जीर्णपणा आणि रूढिप्रियता या गोष्टींचा विरोध त्यांच्या ठिकाणीं मूर्तिमंत अवतरला होता. तरीहि जीवनांतील बारीक–सारीक व क्षुल्लक गोष्टींबद्दलचा बारकावा व काटेकोरपणा त्यांच्या स्वभावाचा एक विस्मयकारक विशेष होता. गचाळेपणा, भोंगळपणा त्यांना बिलकुल खपत नसे.

अर्थाची सूक्ष्म छटा व्यक्त करण्याकरितां अधिक चांगला असा एक शब्द शोधून काढण्याकरितां त्यांनीं तब्बल पांच मिनिटें घालविलीं हें मला








माहीत आहे. दुसऱ्या एका प्रसंगीं लॉर्ड वेव्हेलच्या सेक्रेटरी जार्ज ॲबेल यांना पत्र लिहितांना मायना काय वापरावा याच्या संशोधनाच्या बाबत त्यांनीं आपल्या सर्व सेक्रेटरींची तारांबळ उडवून दिली होती !

त्यांच्या स्वच्छतेच्या संवयी, पूर्ण विचाराअंतीं ठरविलेल्या दिनचर्येचें त्यांचें पालन व त्यांचा वक्तशीरपणा या गोष्टी आपणांपैकीं पुष्कळांना आदर्श म्हणून पुढें ठेवण्यासारख्या आहेत. एकदां राजकोटला त्यांना रेसिडेंटला भेटावयाचें होतें. भेटीची वेळ दुपारीं दोन वाजतांची होती. मोटार—ड्रायव्हर वेळेवर आला नाहीं म्हणून महात्म्याची स्वारी मार्चच्या भर उन्हांत काठी घेऊन पायींच निघाली. वाटेंत एका टांगावाल्यानें " गाडींत बसा, पोहोंचवून देतों " अशी आपण होऊन विनंति केली. पण " बाबा, माझ्याजवळ तुला द्यायला एक कवडीहि नाहीं " असें महात्माजींनीं उत्तर दिलें आणि दीड मैल चालत जाऊन भेटीची वेळ बरोबर साधली.

ते चालणारे तर पट्टीचे होते ! त्यांची अंगकाठी सडसडीत व साधारण उंच होती. हल्लीं वयोमानानें त्यांना किंचित् पोंक आलेसें दिसत होतें. त्यांच्या चालण्यांत स्प्रिंगप्रमाणें टुणटुणीतपणा होता. चालणें, फिरणें हें त्यांचें नित्यकर्मच बनून गेलें होतें.

खासगी जीवनांत असो वा सार्वजनिक कामांत असो, जें करावयाला ते दुसऱ्यांना सांगत तें स्वतःहि करीत. भांडीं घाशीत, कपडे धूत, शरीरश्रम करीत. तुम्हांला ते सूत कांतायला सांगतील तर आपणहि न चुकतां दररोज सूत कांततील. अलीकडे तर त्यांनीं दोन्ही हातांनीं सूत कांतावयाचें सव्यसाचित्व कमाविलें होतें.

एकोणऐंशीं वर्षांचा हा म्हातारा कांहीं बाबतींत तर बालकासारखा होता. त्यांचें अंतःकरण बालकाच्याप्रमाणें निष्कपट होतें. बालकाप्रमाणेंच ते मनापासून हंसत व सहज झोपीं जात. बालकाच्या बुद्धीची तरलता तशीच ग्रहणशक्तीहि त्यांच्यामध्यें होती. एखाद्या शाळकरी मुलाप्रमाणें ते अनेक भाषा शिकले होते. हिन्दुस्थानांतील बहुतेक भाषा व लिप्या त्यांनीं अवगत करून घेतल्या होत्या.

त्यांच्या अंगीं पराकाष्ठेचा काटकसरीपणा बाणलेला होता. उधळपट्टी त्यांना मुळींच खपत नसे—मग ती उधळपट्टी वेळाची असो, शक्तीची असो वा वस्तूंची असो ! कागदाच्या काटकसरीला युद्धकाळीं जोराची चालना मिळाली; पण त्याच्या आधीं कितीतरी वर्षांपासून गांधीजी लिहिण्याकरितां जाहिरातींचीं पाठकोरीं पानें, वापरलेलीं जुनीं पाकिटें आणि वर्तमानपत्रांचीं जुनीं वेष्टनें वापरीत असत. दुसरे लोक ज्या कामाकरितां दहा शब्द योजतील तें काम ते एकच शब्द योजून, आणि तरीहि अगदीं संपूर्ण अर्थ आणून, भागवीत असत.

त्यांच्या पोषाखांत आणि संवयींत त्याप्रमाणेंच त्यांच्या लेखनभाषणांत मूर्तिमंत साधेपणा अवतरलेला असे. साध्या आणि सरळ लेखनपद्धतीचा आदर्श पुढें ठेवून त्यांनीं स्वतःची अशी एक लेखनशैली निर्माण केली कीं तिचा अनेकांना हेवा वाटला आहे. त्यांनीं ' नॉन्व्हायोलन्स ', ' हिमालयन ब्लंडर ', ' क्विट इंडिया ', ' लिओनाइन व्हायोलन्स ' अशा तऱ्हेचे वैशिष्ट्यपूर्ण शब्दप्रयोग निर्माण केले असून ते सर्वांमुखीं झालेले आहेत.

त्यांचा साधा पण शास्त्रशुद्ध आहार, त्यांची साधी राहणी आणि उच्च विचारसरणि, त्यांचा पराकाष्ठेचा निःस्वार्थीपणा व त्यांची आत्मनिवेदनपर अशी परमेश्वरभक्ति या गोष्टींनीं त्यांच्या जीवनाची धारणा झाली खरी; पण यापेक्षांहि विशेष गोष्ट म्हणजे त्यांची विनोदबुद्धि व तिच्याचमुळें पहांटे तीनपासून रात्रीं दहा वाजेपर्यंत मानव--जातीची अविश्रांत सेवा, त्यानंतर हुकुमी झोंप आणि तीमुळें जागें झाल्यावर ताजेंतवानें बनून कामाला लागणें या गोष्टी त्यांना शक्य झाल्या व त्यांना साधारण दीर्घायुष्य लाभलें. विनोदस्थळें शोधून काढण्यांत आणि त्यांचा आस्वाद घेण्यांत ते सदैव जागरूक असत. त्यांच्या हास्यामुळें त्यांचें गांभीर्य अधिकच खुलून दिसे. जीवनभर तर त्यांनीं हास्य कायम ठेवलेंच पण मृत्यूंतहि त्यांचें स्मित कायम आहे. "

—एक माहीतगार,
' संडे न्यूज ', १–२–'४८.







# महात्माजी अमर आहेत

# श्रद्धांजलि

## आमचें सर्वस्व !

" एका वेड्या माथेफिरूनें आमचें सर्वस्व लुबाडून नेलें ! परमेश्वरा, ह्या भयंकर दुःखाच्या समयीं हिंद-भूमीचें रक्षण कर. या आमच्या आवडत्या नेत्याच्या बलिदानानें द्वेष, अविश्वास वगैरे विकार सर्वस्वीं नाहींसे होवोत ! "

—च० राजगोपालाचार्य,
पश्चिम बंगालचे गव्हर्नर.

## विधिमंडळ आणि गांधीजी

" ...महात्मा गांधी कोणत्याहि विधिमंडळाचे केव्हांच सभासद नव्हते. एकदांच त्यांनीं उभ्या जन्मांत विधिमंडळाच्या जागेंत पाऊल ठेविलें व तें म्हणजे रौलट कायद्यावरील चर्चेच्या प्रसंगीं. त्या वेळीं ने० ना० श्रीनिवासशास्त्री यांच्या झालेल्या आवेश-युक्त व वक्तृत्वपूर्ण भाषणाचें वर्णन करून गांधीजींनीं म्हटलें, ' शास्त्रीजींचें भाषण व्हाइसरॉय अगदीं मंत्रमुग्ध होऊन ऐकत होते. व्हाइसरॉय यांची दृष्टि शास्त्रीजींवर खिळली होती. क्षणभर असें वाटलें कीं व्हाइसरॉयांच्या अंतःकरणाला पाझर फुटल्याशिवाय राहणार नाहीं. परंतु शेवटीं सरकारला कायद्याचे शिष्टाचार पाळून केवळ नाटकच करावयाचें होतें, असें सिद्ध झालें ! ' गांधीजींच्या या उद्गारांवरून त्या वेळच्या विधिमंडळाविषयीं गांधीजींचें काय मत होतें हें स्पष्ट दिसून येतें.

आज तर परिस्थिति अजिबात बदललेली आहे. गांधीजींच्याच स्फूर्तिप्रद नेतृत्वामुळें व त्यांच्याच प्रयत्नांनीं हिंदुस्थान स्वतंत्र झाला असून, विधि-मंडळ व सरकार आपलींच आहेत. माझी अशी फार इच्छा होती कीं एकाद्या दिवशीं या आपल्या विधिमंडळांत येऊन महात्माजींनीं सर्व सभासदांना आपले शुभाशीर्वाद द्यावे आणि या विधिमंडळाच्या द्वारा सभासद जें पवित्र आणि जबाबदारीचें कार्य करीत आहेत त्याला मार्गदर्शनपूर्वक यशश्चितन करावें ...... गांधीजींचा आत्मा सदैव आमच्या संनिध असो आणि आम्हांला आमच्या ध्येयाचें मार्गदर्शन करो अशी प्रार्थना आहे. "

—ना० ग. वा. मावळणकर,
अध्यक्ष, हिंदचें मध्यवर्ति विधिमंडळ,
२।२।'४८.

## सॉक्रेटिस आणि जीझस यांच्यानंतर—!

" जीवर कोणाचा विश्वासहि बसणार नाहीं, जिची कोणी कल्पनाहि करूं शकणार नाहीं, अशी गोष्ट आज घडून आली आहे. आपल्या काळांतील ह्या अत्यंत विशुद्ध, अत्यंत उच्च व अत्यंत स्फूर्तिप्रद अशा पुरुषांवर एका माथेफिरूच्या क्रोधाला बळी पडण्याचा प्रसंग यावा ह्या घटनेवरून हेंच सिद्ध होतें कीं सॉक्रेटिस आणि जीझस यांच्या काळांपलीकडे आपल्या संस्कृतीची प्रगति झालेली नाहीं. कारण सॉक्रेटिसला विषप्राशन करावें लागलें आणि जीझ-सला सुळावर चढावें लागलें !

अस्तंगत होणाऱ्या भूतकाळाचें एकमेव प्रतीक महात्मा गांधींच्या मृत्यूमुळें नष्ट झालें आहे. त्यांच्या शरीराची हत्या झाली असेल; पण सत्य आणि प्रेम यांच्या ज्वालेवर लावलेली त्यांची जीवनज्योत विझविणें कधींहि शक्य नाहीं.

या जगांत संतांना केव्हां सुरक्षितपणें नांदता येईल ! अत्याचार, निर्घृणता आणि हाहाकार यांच्या गर्तेत जर आपणांस पडावयाचें नसेल तर महात्मा गांधी ज्याकरितां जगले आणि ज्याकरितां त्यांनीं आपलें बलिदान केलें तो मार्ग आचरण्या-शिवाय गत्यंतरच नाहीं, हा धडा दोन्हीहि वसाहतींनीं आणि जगानें आतां घेतला पाहिजे. "

—सर सर्वपल्ली राधाकृष्णन्.

## दीनांचे अश्रू पुसून टाकणारा गेला !

" मला तर वाटतें कीं आज जग निराधार झालें आहे ! रंजल्यागांजलेल्यांचें त्यांच्या दुःखांत जो सांत्वन करील, त्यांचे अश्रू जो पुसून टाकील असा आतां कोण आहे ? मार्गदर्शनाकरितां








आणि सल्लामसलतीकरितां त्यांच्याचकडे जावयाची आम्हांला संवय झाली होती आणि त्यांनीं आम्हांला कधींच विन्मुख पाठविलें नाहीं.

हिंदमाते, हृदय फुटेपर्यंत अश्रुमोचन कर. कारण सत्य आणि न्याय, मानवजातीबद्दलचें उत्कट वात्सल्य आणि अनाथ दीन दुबळ्यांबद्दलचा असीम करुणाभाव यांचा प्रकाश पसरविणारा तेजोनिधि आज अस्तंगत झाला आहे! त्यांनीं शिकविलेलीं तत्त्वें आपण आपल्या अंतःकरणांत बाळगूं या आणि मानव्य, प्रेम आणि शांति अशा ज्या तत्त्वांकरितां त्यांनीं आपलें बलिदान केलें तीं तत्त्वें सध्यांच्या दुःखनिराशामय परिस्थितींतहि आचरणांत आणण्याचा प्रयत्न करूं या.

माझा तर असा विश्वास आहे कीं, आपण जें कांहीं करतों तें त्यांना दिसत आहे. हिंदु—मुसलमान ऐक्य व्हावें व मानवतेची सेवा करण्याकरितां सर्वांचीं मनें एकात्मभावनेनें भरून जावीं असें सुखस्वप्न ते आपल्या हृदयाशीं बाळगून होते. तें आपण सफल करूं या."

—एच्. एस्. सुऱ्हावर्दी,
माजी पंतप्रधान, बंगाल.

## इस्लाम धर्माचीं तत्त्वें आचरून दाखविलीं

"महात्मा गांधींनीं इस्लामी धर्माज्ञा व इस्लाम धर्माचीं तत्त्वें नुसतीं बोलूनच दाखविलीं नाहींत तर तीं प्रत्यक्ष आचरून दाखविलीं. आपल्या सांघिक प्रार्थनांतून कुराणांतील 'कलमे' सुद्धां ते म्हणत असत, यावरून त्यांची दृष्टि किती व्यापक होती आणि हिंदुस्थानांतील भिन्नधर्मीय लोकांना एकत्र आणून त्यांचा एकजीव करण्याचा त्यांनीं किती कळकळीनें प्रयत्न केला, हें सोदाहरण सिद्ध होतें."

—सर महंमद सादुल्ला,
आसामचे माजी मुख्य प्रधान, २।२।'४८.

## हिंदी मुसलमानांप्रीत्यर्थ बलिदान.

"मला वाटतें, महात्मा गांधी ह्यांनीं हिंदुस्तानामधील मुसलमानांप्रीत्यर्थ आपलें बलिदान केलें आहे, असें म्हटलें तर तें वस्तुस्थितीला धरून होईल. म्हणून हिंदी मुसलमान त्यांची स्मृति कृतज्ञतापूर्वक पाळतील आणि त्यांनीं घालून दिलेलीं तत्त्वें इमानानें आचरून दाखवितील याबद्दल मला बिलकुल शंका नाहीं."

—सर मिर्झा इस्माइल.

## मानवजातीच्या सेवेला वाहिलेलें जीवन

"...हिंदुस्थानच्या आणि मानवजातीच्या सेवेला वाहिलेलें जीवित एका खुनी इसमाच्या भेकड हातानें खंडित व्हावें हें एक भयंकर संकट होय. ... कधींहि भरून न येणाऱ्या या हानीमुळें एकटा हिंदुस्थान देशच नव्हे तर सर्व जग दरिद्री झालें आहे."

—सर झाफरुल्लाखान,
परराष्ट्र-मंत्री, पाकिस्तान.

## गिरिप्रवचनांतील तत्त्वांचा आचार

राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय जीवनाला ज्या भयंकर रोगांनीं ग्रासून टाकलें आहे, त्या रोगांचा नायनाट करण्याऱ्या कामीं (ख्रिस्ताच्या) गिरिप्रवचनांतलि ('सर्मन ऑन दि माउंटमधील') तत्त्वांचा उपयोग करण्याचें भाग्य हिंदुस्थानला लाभलें होतें. महात्मा गांधींच्या या जीवन-विषयक आध्यात्मिक दृष्टीनें मानवजातीला उत्कृष्ट उदाहरण घालून दिलें आहे, ह्या विचारानें आमचें अंतःकरण धन्यवादाच्या भावनेनें उचंबळून येतें.

—'चर्च ऑफ साउथ इंडिया'नें
केलेला प्रस्ताव, ६।२।'४८.

## हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याकांक्षांचा प्रतिनिधि

"महात्मा गांधी हे जगांतील अत्यंत थोर पुरुषांपैकीं एक होऊन गेले. ते जणूं इतिहासाच्या एका निराळ्या कालखंडांत होऊन गेले असें भासतें.

त्यांचें जीवन अत्यंत संन्यस्त वृत्तीचें असून, हिंदुस्थानांतलि लक्षावधि लोक त्यांच्याकडे 'दिव्य ईश्वरी स्फूर्ति घेऊन आलेले संत' म्हणून अत्यंत आदरबुद्धीनें पाहत. स्वधर्मीयांपलीकडे इतरांवरहि त्यांचा प्रभाव पसरला होता. जातीय कलह माजलेल्या हिंदुस्थानांत त्यांची छाप सर्व हिंदवासीयांवर होती.










## महात्माजी अमर आहेत

हाच एक पुरुष असा होऊन गेला कीं गेल्या पाव शतकांत जेव्हां जेव्हां हिंदी प्रश्नांचा विचार होई तेव्हां तेव्हां याच पुरुषाच्या मताचा विचार प्रामुख्यानें करावा लागे. हिंदुस्थानच्या स्वातंत्र्या-बद्दलच्या आकांक्षांचें मूर्तिमंत प्रतीक ते बनले होते. तथापि ते केवळ राष्ट्रवादी मात्र नव्हते.

परकीयांच्या राज्यसत्तेला हिंदुस्थानच्या लोकांचा जो विरोध होता त्याचें जसें ते प्रतीक होते तसेच पाश्चात्यांविरुद्ध झालेल्या पौर्वात्यांच्या प्रतिक्रियेचेंहि ते प्रातिनिधि होते. पाश्चात्य जडवादाविरुद्ध त्यांनीं बंड पुकारलें होतें.

आणि साध्या राहणीच्या समाजरचनेकरितां त्यांनीं सदैव प्रयत्न केला.

पण त्यांचें सर्वांत प्रमुख वैशिष्ट्य म्हणजे त्यांची अहिंसेवरील निष्ठा. अन्याय्य शक्तींविरुद्ध सत्याग्रही निःशस्त्र प्रतिकाराचा अवलंब करणें, यावर त्यांचा दृढ विश्वास होता......"

—क्लेमंट ॲटली, ब्रिटिश पंतप्रधान,
नभोवाणीवरील भाषणामधून, ३१।१।४८.

### अध्यात्मगुणसंपन्न नेता

"गांधीजींचा खून ही केवळ हिंदुस्थानच्याच नव्हे तर अखिल जगाच्याहि दृष्टीनें अत्यंत शोकजनक अशी घटना आहे. ...... त्यांचें व्यक्तिमत्त्व प्रभावी असून शांतिगुणानें संपन्न होतें. हल्लींच्या आणी-बाणीच्या परिस्थितींत त्यांच्या नेतृत्वाला मुक-ण्याची पाळी येणें ही अत्यंत शोचनीय गोष्ट होय. जगांतील भानगडी शांततेच्या मार्गानें मिटाव्या अशी ज्यांची इच्छा आहे त्यांना तर ह्या हानीमुळें फारच खेद होईल....... आपल्या या काळांत इतका मोठा व अध्यात्मगुणांनीं संपन्न असा नेता झाला नाहीं. गांधीजींप्रमाणेंच ज्यांचा आध्यात्मिक मूल्यांवर विश्वास आहे त्यांची तर, महात्माजींच्या मृत्यूमुळें आपली मोठी पिछेहाट झाली असें वाटून, निराशाच होईल."

—सर स्टॅफर्ड क्रिप्स्,
ब्रिटिश अर्थ-मंत्री.

### अशीं माणसें अत्यंत विरळ

"सबंध इतिहासांत अशीं माणसें फारच विरळ कीं ज्यांनीं आपल्या स्वतःच्या चारित्र्यानें आणि उदाहरणानें आपल्या पिढीच्या माणसांवर इतका खोल परिणाम केला आहे."

—लॉर्ड हॅलिफॅक्स,
हिंदुस्थानचे माजी व्हाइसरॉय, (१९२६-३१).

### सौजन्याचा अतिरेक

"सौजन्याच्या अतिरेकांतहि धोका असतो हेंच यावरून दिसतें."

—जॉर्ज बर्नार्ड शॉ.

### एक विराट् पुरुष

"गांधीजींच्या मृत्यूनें मला अत्यंत दुःख झालें आहे. ......एक महान् पुढारी आणि मानवतेचा शिक्षक म्हणून त्यांची छाप केवळ हिंदुस्थानांतच नव्हे तर जगांत सर्वत्र पडलेली आहे. जगांतील सर्व शांतताप्रेमी लोकांना त्यांच्या मृत्यूनें भयंकर हळहळ वाटत आहे.

मानवांतील आणखी एका विराट् पुरुषाचा बंधुभाव आणि शांति यांच्या प्रीत्यर्थ बळी पडला आहे."

—प्रेसिडेन्ट ट्रूमन,
अमेरिकेचे अध्यक्ष.

### मानवजातीची मनोदेवता

"गांधीजी हे मानवजातीच्या सदसद्विवेकबुद्धीचे एक प्रतिनिधि आणि प्रवक्ते होते. ... त्यांच्या मृत्यूनें अमेरिकन लोकांवर दुःखाची छाया पडली असून अमेरिकन लोक आणि हिन्दी लोक यांच्यामधील जिव्हाळ्याच्या संबंधाची ती द्योतक आहे."

—जॉर्ज मार्शल,
सेक्रेटरी ऑफ स्टेट, अमेरिका.

### दंडशक्तीच्या पोटीं आत्मनाश

"या वयोज्ञानतपोवृद्ध पुरुषाचा एका माथेफिरू-कडून खून!—ह्या घटनेइतकी संतापजनक घटना अर्वाचीन इतिहासांत तरी घडून आलेली नाहीं! गांधीजी तर अहिंसेचें प्रत्यक्ष प्रतीकच, शांतीची








प्रत्यक्ष देवताच मानले जात होते. तेच हिंसेला बळी पडावे हा एक भयंकर विपरीत असा योगायोग असून त्यापुढें सर्व तर्कशास्त्र लटकें पडतें.

वादग्रस्त प्रश्नांचे निर्णय लावण्यासाठीं प्रचंड प्रमाणांत दंडशक्ति वापरणें हें मूलतः केवळ चुकीचें आहे येवढेंच नव्हे तर अशा उपायापोटीं मानव-जातीच्या आत्मनाशाचीं बीजेंच सांठविलेलीं असतात असें गांधीजींचें मत होतें. मानवी संस्कृतीच्या विकासक्रमांत अखेरीस केव्हां तरी त्यांचें हें मत सर्वच माणसांना पटल्यावांचून राहणार नाहीं. एरवीं मानवसंस्कृति जिवंत राहणेंच अशक्य आहे. गांधीजी एक असे पुरुष होऊन गेले कीं, त्यांच्या जीवन-प्रवृत्ती त्यांच्या काळच्या प्रवृत्तींच्या भलत्याच पुढें होत्या. ''

—जनरल मॅक ऑर्थर,
जपानमधील दोस्त-सैन्याचे सरसेनापति.

**नराणां च नराधिपः**

" गांधीजींच्या खुनाची बातमी ऐकून मला अत्यंत दुःख होत आहे आणि या दुःखांत सर्व जग वांटेकरी होईल याबद्दल मला खात्री आहे. गांधीजी हे वर्तमानकाळांतील एक थोर पुरुष होऊन गेले. तीस वर्षांवर माझा व त्यांचा परिचय होता. या अवधींत मतें व कार्यपद्धती यांबद्दल आमच्यांत कितीहि मतभेद होत आले असले, तरी माझा त्यांच्याविषयींचा आदरभाव वाढतच गेला आहे.

आपणा मानवांमधील एक पुरुषश्रेष्ठ (a prince-among men ) दिवंगत झाला आहे. हिंदच्या ह्या कधींहि भरून न येणाऱ्या हानीबद्दलच्या दुःखांत आम्ही सहभागी आहों. ''

—जनरल स्मट्स,
दक्षिण आफ्रिकेचे मुख्य प्रधान, ३०–१–'४८.

**पुरुष–श्रेष्ठ**

" गौतम बुद्धानन्तर हिंदुस्थानांत आणि खिस्ता-नंतर सर्व जगांत गांधीजींइतका श्रेष्ठ पुरुष झाला नाहीं. ''

—डॉ० जे. एच्. होम्स, न्यूयॉर्क,
१–२–'४८.

**गांधीजी अमर आहेत**

" महात्मा गांधी सर्व मानवजातीचे एक परम सुहृद् होते. ...... गांधीजी मृत्यु पावले नाहींत; ते जिवंत आहेत, अमर आहेत. देवमाणसें ( Children of God ) अमर असतात. ''

—डॉ० ह्यूलेट जॉनसन्,
डीन ऑफ कँटरबरी, १–२–४८.

**जीवनमूल्यावरील नितान्त निष्ठा**

गांधीजींनीं जगाला मोठें उदाहरण घालून दिलें आहे. अनेक प्रसंगीं त्यांनीं अत्यंत औदार्यपूर्ण विचार आचरण्याचें व्रत अंगीकारिलें. ते विचार आचरणांत आणण्याची जी नितान्त निष्ठा त्यांच्या ठायीं दिसून आली, ती आपणांस इतरांच्या ठिकाणीं क्वचित्च आढळेल. त्या विचारांचा विजय व्हावा म्हणून त्यांनीं आपल्या प्राणांचें बलिदान दिलें आहे. ''

—एम्. फर्नांड हान लॅंगनहोव्ह,
अध्यक्ष, आंतरराष्ट्रीय सुरक्षा–समिति.

---

**युद्धाऐवजीं नैतिक उपाययोजना** ( moral equivalent of war ).

बाहेर येण्याकरितां धडपडणाऱ्या अशा वैयक्तिक स्वकल्पनाजन्य भावनोर्मींना नुसती वाट करून देणें एवढेंच युद्धाचें कार्य नाहीं. युद्धाच्या मार्गानें निर्णायक अशा मोठमोठ्या घटनाहि घडून येत असतात. म्हणून युद्ध जर जगांतून नाहींसें करावयाचें असेल तर तें, युद्धानें ज्या वादांचा निकाल करण्याचा प्रघात आहे त्या वादांचा निर्णय करावयाचे इतर मार्ग शोधून काढून ते संघटित करण्यानेंच होईल.

—वॉल्टर लिपमन.












वर्ष पहिलें
अंक सहावा

# नवभारत

मार्च
१९४८

# औद्योगिक-वृत्त विशेष

( पॅरामाऊंट पब्लिसिटी सिंडिकेट लि. मार्फत )

—**स्वस्तिक रबर प्रॉडक्टस् लि०**, पुणें २, या कारखान्यांतील सर्व मंडळींनीं तसेंच मॅनेजिंग एजन्ट्सनीं आपलें दोन दिवसांचें उत्पन्न सुमारें एक हजार रुपये महात्मा गांधींच्या स्मारक निधीस देण्याचें ठरविलें आहे.

—सुप्रसिध्द "**देवल**" **भांड्यांना** ( ६३१। १३, सदाशिव, पुणें २ ) ग्वाल्हेरच्या प्रदर्शनांत ब्रॉंझ मेडल व सर्टीफिकेट मिळालीं आहेत. सिंगापुरला भरलेल्या प्रदर्शनांत हिंदुस्थान सरकारतर्फें जो निवडक हिंदी माल पाठविण्यांत आला त्यांत "देवल" भांड्यांचा समावेश करण्यांत आला असून मिलान व पॅरिस येथें होण्याऱ्या प्रदर्शनांतहि 'देवल' भांडी सरकारतर्फें पाठविलीं जाणार आहेत.

— **गोरा केमिकल कं० लि०, पुणें २,** यांनीं अमरावती व नागपुर येथें नुकतेच डेपो उघडले आहेत; ह्यामुळें हल्लींपेक्षां त्या बाजूस मालाचा प्रसार जास्त होणार आहे.

— मुंबईचे प्रसिद्ध कापड व्यापारी मे० मावळंकर ब्रदर्स लि०, व श्रीधर भालचंद्र आणि कंपनी यांनीं "**हिंद विजय स्टोअर्स**" या नांवाचें आणखी एक कापडाचें दुकान प्रार्थना समाजाचें नाक्यावर सुरू केलें आहे. सचोटी व ग्राहकांच्या हिताविषयीं दक्षता यांमुळें मिळालेलें यश नव्या उपक्रमाच्या मुळाशीं आहे.

—**बृहन्महाराष्ट्र शुगर सिंडिकेट लि०,** (पुणें) यांचा साखरेचा कारखाना मध्यंतरींचे दंगलीनंतर पूर्ववत् चालू झाला आहे. कारखान्याचे चालकांनीं कामगारांची सभा घेऊन महात्मा गांधींचे स्मृतीस श्रद्धांजलि अर्पण केली.

—**बँक ऑफ महाराष्ट्र लि०, पुणें २,** यांचा गत वर्षाच्या कामाचा डायरेक्टरांचा रिपोर्ट तयार झाला आहे. या वर्षांत बँकेला झाला निव्वळ नफा रु. १,९९,२१७ मागील वर्षाचा या सालांत ओढलेला नफा जमेस धरतां एकूण नफ्याची रक्कम रु. २,४३,९९३ होते. भागीदारांना करमाफ ५ टक्के डिव्हिडन्ड वांटण्याची शिफारस करण्यांत आली आहे. रिझर्व्ह फंडासाठीं आणखी रु. २०,००० काढून ठेवावयाचे असून नफ्यापैकीं रु. ४५,७४३ ची रक्कम १९४८ सालाचे जमाखर्चांत आदा करण्यांत आली आहे. बँकेची ही प्रगति तिला भूषणावह आहे.

— श्री० ग. रा. साने यांच्या विशेष परिश्रमामुळें **दि डेक्कन पॉटरीज अॅन्ड अलाईड इन्डस्ट्रीज, लि०**,(१९६।३०, सदाशिव, पुणें २) या कंपनीची स्थापना झाली असून तिला वजनदार डायरेक्टर बोर्ड लाभलें आहे. कपबश्या, बरण्या, कौलें वगैरे नित्योपयोगी मालाचें उत्पादन कंपनीच्या चिंचवड येथें उभारण्यांत येत असलेल्या कारखान्यांत लवकरच सुरू होईल.

—**श्रीलक्ष्मी टेक्स्टाइल्स लि. भोर** या गिरणीच्या भागिदारांची चवथी वार्षिक सर्वसाधारण सभा नुकतीच भरली. गिरणीनें क्यु प्रेफरन्स शेअरवर ६। टक्के व आर्डिनरी शेअरवर ५ टक्के प्रमाणें नफा वांटण्याचें ठरविलें आहे.

—**दि डेक्कन अॅग्रिकल्चरल इंडस्ट्रीज,लि०,** ( २६१, बुधवार, पुणें २, ) यांनीं ४०० टन ऊस गाळतां येईल अशा साख[illegible]ण्याच्या मशिनरीची ऑर्डर दिली आहे.



अनुक्रमणिका








—माळी नगर येथील **सासवड माळी शुगर फॅक्टरीचे** कामगारांचे वतीनें करण्यांत आलेली पगारवाढीची मागणी मान्य झाली असून डायरेक्टरांनीं ही वाढ चालू महिन्यापासून करण्याचें ठरविलें आहे.

—माधवनगर येथील '**डेक्कन इंजिनिअरिंग, लि०,**'च्या कारखान्यास फलटणचे श्रीमंत राजेसाहेब व अधिकारी मंडळी यांनीं भेट देऊन कंपनीच्या प्रगतीबद्दल समाधान व्यक्त केलें.

—**सेनेक्स फोटो स्टुडियो,** बेलबाग चौक, पुणें २,) यांनीं अस्सल रशियन प्रोसेसनीं नैसर्गिक रंगांत ऑईल पेन्ट पोर्ट्रेट्स् स्वस्त किंमतींत काढण्याचा उपक्रम पुण्यांत प्रथमच केला असून त्याला चांगलीच लोकप्रियता मिळाली आहे.

—दि **नाणेघाट फ्युनिक्युलर ट्राम्वे ॲन्ड ट्रॅन्स्पोर्ट कं०, लि०,** (पुणें ४,) यांनीं पांच लक्ष रुपयांचे नवें भांडवल विक्रीस काढलें आहे.